# संस्कारक्षम आनंदी घर



लेखक
डॉ. बाबा नंदनपवार
एम.ए., एम.एड., पीएच.डी.

दीपस्तंभ
प्रकाशन

संस्कारक्षम आनंदी घर

**लेखक**
**डॉ. बाबा नंदनपवार**


**प्रकाशक**
दीपस्तंभ प्रकाशन
४२, हाउसिंग सोसायटी, सहयोग क्रिटिकल केअर हॉस्पिटलजवळ, जळगाव.
दूरध्वनी : ०२५७-२२४२२९९

**पुस्तक मागणीसाठी संपर्क :** ९९२२० ०४१८२, ९१५८३ २३६६०

**या आवृत्तीचे विशेष हक्क लेखक डॉ. बाबा नंदनपवार व मूळ आवृत्तीचे प्रकाशक श्री. अशोक मानकर यांनी दीपस्तंभ प्रकाशनाला दिलेत. त्या बद्दल त्यांचे आभार!**

**मुद्रक**
इमेज क्रिएशन
२१४, तळमजला, नवीन बी. जे. मार्केट, जळगाव.
दूरध्वनी : ०२५७-२२४१५९९

**अक्षरजुळणी व मुखपृष्ठ**
श्री. अमोल महाजन
इमेज क्रिएशन, जळगाव

**दीपस्तंभ अभियान आवृत्ती - सप्टेंबर २०१३**

**सवलत मुल्य : ₹. १००/-**
दीपस्तंभ प्रकाशनाने हे पुस्तक 'दीपस्तंभ आत्मविश्वास व प्रेरणा अभियाना'साठी विशेष सवलतीत उपलब्ध करुन दिले.

# रोप अमृताचे...

पालक मित्रांनो,

निसर्गाने आपल्या मुला मुलींच्या रुपात जणू एक अमृताचे रोपच आपल्या दारी पाठवले आहे. रोप मोगऱ्याचे असेल तर त्यावर गुलाबाचे फूल येणार नाही हे जितके खरे तितकेच आपल्या मुलाच्या अंगभूत गुणांपेक्षा आणि क्षमतेपेक्षा त्याने वेगळे काही करण्याची आपली अपेक्षा असणे हे देखील चुकीचेच नव्हे का? माळी ज्या कुशलतेने एखाद्या रोपाची देखभाल करतो त्या कौशल्याने आपणही आपल्या या अमृताच्या रोपाची निगा राखायला हवी. कुशल माळी रोपाला योग्य वातावरण देतो. योग्यवेळी खत-पाणी देतो. कडक उन असेल तर रोप सावलीत आणतो. अंधारात रोप असेल तर प्रकाशात ठेवतो. रोपाला आधाराची काठी लावतो. कुसंगतीची कीड लागत असेल तर फवारणी करतो आणि वाकड्या वळणाने वाढत असेल तर क्वचित प्रसंगी छाटणीही करतो. पण रोपाच्या वाढीच्या प्रत्येक टप्प्यावर तो निसर्गाच्या या किमयेचा आनंदही घेतो. सुजाण पालक देखील असाच असतो !

प्रत्येक मूल वेगळं असतं! एक स्वतंत्र व्यक्तिमत्त्व म्हणून वाढण्याचा त्याला अधिकार असतो. हा बालक हक्क आपण जपायला हवा. 'आपण मुलांचे पालक आहोत मालक नाहीत !' हा विवेक कायम जागा ठेवायला हवा.

दीपस्तंभच्या अभिनव उपक्रमाच्या निमित्ताने मा. बाबा नंदनपवारांच्या पुस्तक वाचनातून सुजाण पालकत्त्वाचा आपला सजग प्रवास सुरु होत आहे. आपल्या या प्रवासात 'अमृताचे रोप' दशदिशांना फुलो ही शुभेच्छा!

**डॉ. संजय मालपाणी**
चेअरमन, ध्रुव अकॅडमी, संगमनेर

# पालक संवाद

नोकरी... व्यवसाय... धावपळ, अडचणी, पैसा, वस्तू यांच्या भाऊगर्दीत आपलं एक स्वप्न असतं. आपलं स्वत:चं एक घर असावं....
घरात सर्व प्रकारच्या सुखसोयी व वस्तू असाव्यात.

हे सर्व मिळविण्यासाठी प्रत्येकजण खूप कष्ट घेतो. स्वत:चं घर आणि सर्व वस्तू येऊनही ते घर मात्र आनंदी, समाधानी, सुखी होत नाही. कारण आपण विसरून गेलो आहोत, की घर आपलं असो की भाड्याचं, मोठं असो की छोटं, सर्व सुखसोयींयुक्त असो, की साधं घरात आनंद, सुख, समाधान हे त्या घरातल्या संस्कारांनी मिळते, वस्तूंनी नव्हे. त्यासाठी घराची निश्चित मूल्ये, संस्कार, पद्धती ठरलेल्या असाव्या लागतात. घरासाठी तसा वेळ द्यावा लागतो. त्याचे काही नियम ठरवावे लागतात.

आजकाल घर म्हणजे छान छान वस्तू विशेष म्हणजे टी.व्ही, सोफा, चकचकीत टाईल्स असाच घेतला जातो. सर्व पाश्चात्त्य शैलीप्रमाणे घर बांधण्यात व सजविण्यात सर्व रममाण असतात आणि टी.व्ही. मुळे त्याच प्रकारची पाश्चात्त्य संस्कृती आपल्या घरात येते.

खरं म्हणजे कुटुंब व नातेसंबंधाबाबत भारतीय संस्कृती व कुटुंब सर्व जगात अद्वितीय व आदर्श मानली जाते. मात्र जुनी व कालबाह्य समजून (गैरसमजातून) अनेक कुटुंबांनी ती समजून घेण्याचा व जगविण्याचा प्रयत्न केलेला नाही.

त्यासाठी आम्ही दीपस्तंभ अभियानात डॉ. बाबा नंदनपवार यांच्या या पुस्तकाची निवड केली आहे. ही पुस्तके तुम्ही एकांतात वाचा तसेच याचे कुटुंबात एकत्रित बसून सामूहिक वाचन करा. त्यानुसार टप्प्या-टप्प्याने काही चांगल्या गोष्टींना सुरवात करा... काही चुकीच्या गोष्टी थांबवा.

आपली सर्वांचीच घरे सुसंस्कारीत, आनंदी व सुखी व्हावीत, या मन:पूर्वक शुभेच्छा!

**यजुर्वेंद्र महाजन**
कार्यकारी संचालक
दीपस्तंभ

**डॉ. के. बी. पाटील**
माजी कुलगुरु,
उ.म.वि., जळगाव

हे पुस्तक छापण्यासाठी डॉ. बाबा नंदनपवार व श्री. अशोक मानकर यांचे सहकार्य लाभले. तसेच संकलन व निर्मितीसाठी श्री. अनिल भोळे, सौ. सविता भोळे, अमोल महाजन यांनी परीश्रम घेतले.

# प्रस्तावना

दीपस्तंभ खरोखरच शिक्षणक्षेत्रात फार मोठे परिवर्तनाचे व मूलभूत काम करीत आहे. एक लाखापेक्षा जास्त शिक्षण घटकांपर्यंत विशेषत: पालकांना समाविष्ट करून त्यांच्या क्रियाशील सहयोगासाठी अभियान राबवीत आहे. या निमित्ताने या प्रक्रियेला साथीदार होणाऱ्यांचे मनापासून अभिनंदन करावेसे वाटते.

ही अभियान कल्पना अतिशय वैशिष्ट्यपूर्ण व अफलातून आहे. सक्षम व समृद्ध समाजमन तयार करण्याचा मानस या पाठीमागे आहे. घराला घरपण संस्कारामुळे येते. आमची घरे Home न राहता Compartment बनत चालली आहेत. आमच्या शिक्षण व्यवस्थेला बाजारी स्वरूप प्राप्त झालेले आहे. शिक्षणाचा आत्मा तर हरवलाच आहे. शरीरही कुपोषित होत चालले आहे व त्यात रोगांनीही प्रवेश केला आहे. त्यांचे थैमान चालू आहे. या अवस्था दूर करण्याचा एक प्रयत्न या अभियानात अंतर्भूत आहे. 'घर' शाळा व्हावी हे पालकांना समजावे व 'शाळा' घर व्हावी हे शिक्षकांना समजणे आवश्यक आहे. त्यामुळे या प्रयत्नांचा महत्त्वाचा भाग म्हणजे हे अभियान व त्याअंतर्गत वरील गाभा स्पष्ट करणारे मा. बाबा नंदनपवार लिखित हे संस्कारक्षम आनंदी घराची कल्पना मांडणारे संस्कारधनरूपी पुस्तक!

गर्दीत माणसं एकटी होत चालली आहेत. घरातला आनंद दिसेनासा होतो आहे. कर्तव्याला ओलाव्याची झालर विटकी होताना दिसते आहे. मुलांनी चांगले व्हावे, व्यक्तिमत्त्व विकसित करावे, समाजाप्रती ममत्वाने ते समर्पित करावे हा संस्कारच दिसत नाही, कारण घरांमध्ये 'अर्थाची' चर्चा आहे, 'मूल्यांची' नाही. त्यामुळे घरेच नव्हे, तर सारे समाजाचे चित्र विपरीत, दुर्दैवी, भयभीत, क्रौर्यात्मक होताना दिसते.

असे सारे असले तरी संवेदना, भावना, करुणा, औदार्य टिकावे, असे वाटणारी मंडळी देखील आहे. दीपस्तंभ विविध अभियाने यासाठीच राबवीत असते. गोवर्धन तेव्हाच उचलला जातो जेव्हा अनेक हात पुढे येतात. कुटुंब सुस्थिर व संस्कारीत झाले तरच समाज बलशाली होईल व ''बलसागर भारत होवो'' हे प्रत्यक्षात साकार होईल. याकरिता पालकांनी विशेष दृष्टी ठेवून प्रयत्नांची पराकाष्ठा करावी, असे वाटते. या चिंता वाटणाऱ्या परिस्थितीत चिंतन करून संस्कार सुहृद होण्यासाठी पालकांनी अग्रभागी राहिले पाहिजे, याकरिता पोटापेक्षा हृदय मोठे व महत्त्वाचे असते. याचे दिशादर्शन स्वत:पासून पालकांनी केले पाहिजे. संस्कार नकळत होतात म्हणजे जे ठरवून करावे लागत नाही व तेच रुजतात हे कृतीने समोर

येतात. पालकांची कृती अंतरीची आध्यात्मिक होत जाईल, तशी सात्विकता, सज्जनता, कणखरता, नम्रता बाह्यरूपात प्रगट होईल. पण हा भाव कृतीत दिसणे आवश्यक आहे.

या अभियानाची प्रेरक शक्ती या पुस्तक रूपाने आपल्यापर्यंत येते आहे. वाराणसीला न जाता गंगा दाराशी आल्यावर तरी गंगाप्राशन आपण करणार की नाही, हे गंगाजल समाजबलवृद्धीसाठी मनापासून ग्रहण करावे म्हणून हा प्रपंच आहे.

ध्येयप्राप्तीसाठी जे जे करावे लागेल ते आपण करूया, तोपर्यंत थांबायचे नाही. ''कारवा बनता जाएगा'' हा विश्वास आहे.

सर्व सहयोगी मंडळींचे मनापासून कौतुक.

धन्यवाद!

**प्रकाश पाठक**

सहकार्यवाह, भोसला मिलेटरी स्कूल, नाशिक

# अनुक्रमणिका

# १.आत्मभान विसरलेली दोन शक्ती केंद्रे

वृत्तपत्रातून वाचायला मिळालेल्या दोन वृत्तांनी मी खूपच अस्वस्थ झालो. एक बातमी होती - एका छोट्या मुलानं अतिशय वाईट वर्तन केल्यानं त्याचे आई-वडील त्याच्यावर रागावले. त्याला त्यांनी शिक्षा केली. याचा परिणाम त्या मुलात बदल व्हावा, असा अपेक्षित होता. परंतु मुलानंच आई-वडिलांविरुद्ध तक्रार नोंदविली आणि न्यायालयानं देखील त्याच्या तक्रारीची दखल घेऊन आई-वडिलांना शिक्षा ठोठावली. ही बातमी (घटना) परदेशातली होती. दुसरी बातमी आपल्या देशातीलच होती. आपल्याकडे एक नवा कायदा येतो आहे. शिक्षकांनी मुलाला शिक्षा केल्यास त्यांना गजाआड केलं जाईल, असं त्या कायद्याचं प्रारूप आहे. या बातम्यांनी अस्वस्थ होण्याचं कारण असं, की प्रत्येक आईत एक शिक्षक आणि प्रत्येक शिक्षकात एक आई विद्यमान असते. मुलाची आई ही त्याची पहिली गुरू आणि दुसरा गुरू म्हणजे शिक्षक असं आपण मानतो. त्यामुळं या शिक्षा गुरूला आणि वत्सलभावनेला आहेत, असं वाटलं.

खरं म्हणजे मुलाचा व्यक्तिमत्त्व विकास करणं, त्याला उत्तम संस्कार देणं, त्याच्या क्षमता शोधून त्या विकसित करण्याची संधी उपलब्ध करून देणं, त्याला एक चांगला माणूस, जबाबदार नागरिक बनवणं ही जशी कुटुंबाची म्हणजे आज आई-वडिलांची जबाबदारी आहे तशीच ती शाळेची म्हणजे पर्यायानं शिक्षकाची आहे. ही जबाबदारी आजची नाही जेव्हापासून कुटुंब व्यवस्था, समाज व्यवस्था, शिक्षणप्रणाली, शिक्षण व्यवस्था निर्माण झाली तेव्हापासून ती त्यांच्याकडेच आहे. मुख्य म्हणजे ही जबाबदारी कुणी लादली नाही तर एक निष्काम कर्मयोग म्हणून ती स्वीकारली गेली. आजही तीच धारणा समाजात आहे. सामान्यपणे मुलाच्या आयुष्यातील ६ ते १४ हा कालखंड (वयोगट) अत्यंत संवेदनशील व संस्कारक्षम असतो. त्यामुळं याच काळात मुलाच्या मनाला व शरीराला वळण लावण्याचं काम आईचं असतं, तर शाळेत शिक्षकांनीही हे दायित्व 'बुद्ध्याचि वाण धरिले' या वृत्तीनं स्वीकारलेलं असतं. मुलांना उत्तम सवयी लावणं, त्यांच्या आरोग्याची काळजी घेणं, त्याला आहार कोणता द्यायचा, कोणता टाळायचा हेही आईला ठरवायचं असतं. मुख्य म्हणजे या वयोगटातील मुलांचं भावविश्व समृद्ध करण्याचं कामही आईलाच करायचं असतं आणि आईच हे करू शकते. कारण- दहा उपाध्याय जे काम

करतील ते एक आचार्य करतो. शंभर आचार्य जे काम करतील ते एक वडील करू शकतात आणि एक 'आई' हजार वडिलांचं काम करते. म्हणूनच ती मुलाची पहिली गुरू असते असं म्हटलं जातं. ६ ते १४ हा मुलांचा वयोगट असा असतो की एकदा संस्कार ओंजळीतून सुटला की पुढे प्रयत्न करूनही अपेक्षित बदल घडून येत नाही म्हणून या संवेदनशील गटाला घडविताना आई आणि शिक्षकाला अतिशय सावध असावं लागतं. प्रसंगी कठोरही व्हावं लागतं.

आर्य चाणक्य सांगतो - 'लालयेत पंच वर्षानी । दशवर्षानी ताडयेत्।' पाच वर्षापर्यंत मुलाचं लालनपालन प्रेमानं करा, त्याचे लाड करा, कौतुक करा परंतु ६ ते १४ या वयोगटातील मुलांना घडविताना थोडं कठोर व्हा! ताडयेत् म्हणजे केवळ मारणे, असा अर्थ अभिप्रेत नाही लाड आणि प्रेम यातल्या सीमारेषा आईला ओळखता आल्या पाहिजे, मुलांच्या कोणत्या गोष्टीला टोकायचं, कोणत्या गोष्टीचं किती आणि कसं कौतुक करायचं, याचं भान आईनं ठेवलं पाहिजे. दुसऱ्या शब्दात आईत असलेला शिक्षक आईपेक्षा प्रभावी असायला हवा. मुलांच्या आयुष्याला वळण लावण्यासाठी कठोर व्हावं लागतं, त्याला शिक्षाही (शिक्षेचं स्वरूप वेगवेगळं असू शकतं) करावी लागते. यशोदेनं कृष्णाला उखळाला बांधून ठेवलं, ही पुराणातली गोष्ट बाजूला ठेवली तरी मुलगा उद्धट बोलला, किंवा एखादी चूक केली, प्रेमानं सांगूनही तो ऐकत नसेल तर त्याला उपाशी ठेवण्याची, धपाटे घालण्याची शिक्षा घराघरातून आजही आई करीत असते. शिक्षक देखील विद्यार्थ्यांमध्ये अपेक्षित बदल व्हावा म्हणून कधी रागावतात, कधी ऊठबशा काढायला लावतात तर कधी छड्याही मारतात.

पूर्वीच्या काळी देखील गुरू शिष्याची परीक्षा घेतल्याशिवाय ज्ञानदान करीत नसे. धौम्य ऋषींनी आरुणीला शेताला पाणी देण्याचं, बैदला शेत राखणं, गाडा ओढणं हे काम दिलं. आजच्या संदर्भात ही फार मोठी शिक्षा झाली. परंतु त्यावेळी शिष्यांना ती दिली आणि गुरूंनीही त्यांना भरभरून ज्ञान दिलं. आईनं मुलाला किंवा शिक्षकांनी विद्यार्थ्याला शिक्षा करणं यात नवीन आणि आक्षेप घ्यावं असं काहीही नाही. साध्या औषधानं जर गुण येत नसेल, तर जरा पावरफुल औषध घ्यावं लागतं. पण हे औषध किंवा शिक्षा करण्यामागं आई आणि शिक्षक यांचा हेतू एकच असतो मुलाचा विकास व कल्याण. अशा परिस्थितीत आईनं किंवा शाळेत शिक्षकांनी मुलांना शिक्षा केली म्हणून त्यांना शिक्षा देणारा कायदा करणं कितपत योग्य आहे? अशा कायद्याची आवश्यकता आहे का आपल्या देशात? या संदर्भात आजचं वास्तव काय?

मुलांच्या घडणीत आई-वडील आणि शिक्षक या दोघांचीही भूमिका महत्त्वाची असते. कारण आई व शिक्षक हे मुलांचे गुरू आहेत. हे गुरू ज्या प्रकारचे संस्कार देतील तशी मुलं घडत असतात. ग. दि. माडगूळकर गुरूचं वर्णन करताना म्हणतात - ''कुंभारासारखा गुरू नाही रे जगात। वरी घालतो धपाटा, खाली आधाराला हात।।'' धपाटा घालण्याचा दुसऱ्या शब्दात शिक्षा करण्याचा अधिकार त्यालाच असतो ज्याचा एक हात शिक्षा सहन करणाऱ्याला आधार देत असतो, वाटत असतो. आधार न देता केवळ धपाटाच घालण्याची वृत्ती असेल तेव्हा त्या धपाट्यानं आकार मिळण्याऐवजी वेडीवाकडी निर्मिती होते. आजचं वास्तव काहीसं असंच नाही का? गुरू म्हणून ज्या आईचा उल्लेख करतो तिला मुलाकडे बघायला, त्याच्याशी गप्पा, संवाद करायला वेळ आहे? आपल्या मुलाला समजून घ्यायचा, त्याला नेमकं काय हवयं हे जाणून घेण्याचा किती आईचा प्रयत्न असतो? आपल्या मुलाचं भावविश्व समृद्ध करण्यासाठी रामायण, महाभारत, थोर पुरुष, क्रांतिकारक यांच्या कथा सांगणारी आई खरंच घरात दिसते का?

'दूरदेशी गेला बाबा, गेली कामावर आई
नीज दाटली डोळ्यात, परी घरी कुणी नाही'

अशीच काहीशी अवस्था आजच्या मुलांची बघायला मिळते. साने गुरुजींच्या श्यामच्या भावविश्वात आईची जी प्रतिमा, जे स्थान होतं ते आजच्या श्यामच्या भावविश्वात आहे का?

'चारा मुखी पिलांच्या, चिमणी हळूच देई
गोठ्यात वासरांना, या चाटतात गाई
वात्सल्य हे पशूंचे मी रोज रोज पाही
पाहूनी अंतरात्मा व्याकूळ मात्र होई'

असा अस्वस्थ होणारा श्याम आज बघायला मिळतो का? आजतर घरातली चिमण्यांची घरटंच हरवली आहेत. घराचेच गोठे झाले आहेत. आपल्या अपेक्षांचं ओझं मुलांच्या पाठीवर लादून त्यांचं बालपण ओरबडून टाकणारे आई-वडील गुरूची भूमिका, आई-वडिलांचं दायित्व कशी काय निभावू शकतील? ६ ते १४ या वयोगटातील मुलांना सुरक्षित वाटतं ते आपल्या घरात, आईच्या कुशीत, वडिलांच्या आधारात, पालकांच्या प्रेमळ छत्राखाली. आई-वडिलांनी पैशासाठी स्वतःच्या मुलीला विकल्याची एक बातमी प्रसिद्ध झाली. संतापाच्या भरात एका आईनं ७ व्या मजल्यावरून आपल्या मुलाला खाली फेकून दिल्याचं वृत्तही एका वृत्तपत्रात वाचायला मिळालं. यापेक्षाही बापानंच मुलीवर बलात्कार केल्याची घटना मानवी सभ्यतेला काळीमाच फासत नाही तर संस्कृतीचच हनन करणारी आहे.

अशा घटना वाचल्या की नाती, कुटुंब, घर या शब्दांवरचा विश्वासच उडून जातो. स्वतःच्याच मुलाशी असा क्रूर व्यवहार करणाऱ्या पालकांना शिक्षा करणारा कायदा असायलाच हवा. त्यांना शिक्षा व्हायला हवी असं वाटून जातं.

मुलांचे दुसरे गुरू म्हणजे शिक्षक. ६ ते १० या वयोगटातील विद्यार्थ्यांचा स्वतःच्या आई-वडिलांपेक्षाही अधिक विश्वास शिक्षकांवर असतो. प्राथमिक, माध्यमिक स्तरावर शिकविणारे शिक्षक मुलांच्या कायम स्मरणात राहतात आणि त्यांनी दिलेले संस्कार मुलाच्या प्रकाशवाटा उजळतात. परंतु आज रोज शिक्षकाविषयी वृत्तपत्रात येणाऱ्या वार्तांनी आपण सारेच अस्वस्थ होत आहोत. ज्ञानोबा माऊली शिक्षण प्रक्रिया कशी असते हे सांगताना - 'हृदया हृदय येक जाले। ये हृदयींचे ते हृदयी घातले। द्वैत न मोडता केले। आपण ऐसे अर्जुना। किंवा आई जशी मुलाला हळूवारपणे भरवते तसं हसत-खेळत, हळूवारपणे ज्ञानदानाची प्रक्रिया झाली पाहिजे यासाठीच विनोबा म्हणायचे, की शिक्षक हा मातृहृदयी असायला पाहिजे. विद्यार्थी परायणता, ज्ञानपरायणता, मातृहृदयी या निकषांवर उतरतील असे किती शिक्षक बघायला मिळतात? विद्यार्थ्यांच्या विश्वासाचे, श्रद्धेचे धनी असणारे किती शिक्षक आहेत? गुरू साक्षात परब्रह्म असं गुरूचं वर्णन केलं जातं. समाजदेखील गुरूकडे अतिशय आदरानं बघतो. राजाही गुरूपुढे नतमस्तक व्हायचा. समाजापुढे गुरूची हीच प्रतिमा आहे कां?

प्राचीन काळी जी गुरुपरंपरा होती तशी ती आज नसली तरी शिक्षकांकडे बघण्याचा समाजाचा दृष्टिकोन फार बदलला असं नाही. शिक्षकच मुलांना उत्तम संस्कार देऊ शकतात. त्यांच्या जीवनवाटा उजळू शकतात यावर समाजाचा विश्वास आहे. परंतु आज शिक्षकांविषयी समाजाला जे वाचायला मिळत आहे त्यामुळं समाज मन अस्वस्थ झालं आहे. शिक्षकांनी एका साध्या चुकीसाठी विद्यार्थ्याला इतकं मारलं, की त्याचे हात फ्रॅक्चर झाले. परीक्षेत पास करण्याचं प्रलोभन दाखवून शिक्षकानं विद्यार्थिनीचा विनयभंग केला. आश्रमशाळेतील शिक्षक-मुख्याध्यापक यांनी विद्यार्थिनीवर बलात्कार केला. अपवादात्मक का होईना पण असं वर्तन करणाऱ्यांना शिक्षा व्हायलाच पाहिजे, यात दुमत असण्याचं कारण नाही. पण केवळ 'शिक्षा' कायदा यांनी बदल होणार नाही. संभवतही नाही. विनयभंग, बलात्कार करणाऱ्या, हातपाय तुटेपर्यंत मुलांना शिक्षा करणाऱ्या शिक्षकांची संख्या बोटावर मोजण्याइतकी असेल. कदाचित आज ती संख्या ४-२ ने अधिक झाली असेल पण त्यांचा परिणाम शिक्षण क्षेत्र गढूळ होण्यात झाला आहे. विद्यार्थ्यांचा, पालकांचा, समाजाचा विश्वास शिक्षक आणि शिक्षणावरून उडायला लागला आहे. हे वास्तव नाकारता येणार नाही. आपल्याकडे गुरु-शिष्य परंपरा फार मोठी आहे. म्हणूनच महापुरुषांची चरित्रे वाचताना त्यांच्या व्यक्तिमत्त्व विकासात त्यांच्या आई आणि त्यांना शिकविणारे शिक्षक यांनी केलेल्या संस्काराचा वाटा फार मोठा आहे, हे आवर्जून लक्षात येतं.

आज घराघरांत असलेल्या दूरदर्शनवरून ज्या मालिका दाखविल्या जातात, चित्रपट असो वा बातम्या यातून ज्या अश्लीलतेचे प्रदर्शन केलं जातं, फेसबुक, इंटरनेट, मोबाईल अशी जी विविध संवाद, प्रचार प्रसारमाध्यमे सहजपणे उपलब्ध झाली आहेत त्यामुळं आजची पिढी बिघडली आहे. ती स्वैर झाली आहे असं म्हटलं जातं. जो तो या नव्या साधनांकडे बोट दाखवून स्वतःची सुटका करण्याचा प्रयत्न करतो. खरं तर आजची पिढी हुशार आहे, बुद्धिमान आहे, सृजनशील, धाडसी, कर्तृत्ववान आहे; परंतु त्यांच्या या बुद्धिमत्तेला, सृजनशीलतेला, कर्तृत्वाला मूल्यांचं, संस्कारांचं अधिष्ठान देण्यांत आपण कमी पडतो आहे हे कबूल केलं पाहिजे. येणारा काळ अतिशय आव्हानात्मक असणार आहे. त्यामुळंच घराची संस्कारक्षमता, घराचं घरपण, आईचं आईपण, आईतलं गुरुपण हरवणं, शिक्षकांचा त्यांच्यातला आचार्य, गुरू यांचा विसर पडणं ही आपली सांस्कृतिक हानी ठरेल. आई आणि शिक्षक ही शक्ती आणि संस्कार केंद्र आहेत. सामाजिक परिवर्तन घडवून आणण्याचं सामर्थ्य या केंद्रांमध्ये आहे. घराघरांतून, रांगण्याच्या, उमलण्याच्या उंबरठ्यावर असणाऱ्या, अतिशय संवेदनशील व संस्कारक्षम अशा वयोगटांतील मुला-मुलींना संस्कारांचं पाथेय देऊन त्याच्या जीवनवाटा प्रकाशित करण्यासाठी आई आणि शिक्षक या दोन्ही आदरणीय गुरूंना स्वसामर्थ्याचा साक्षात्कार व्हावा एवढीच प्रार्थना करू या!



**डॉ. बाबा नंदनपवार, नागपूर**

शिक्षण समीक्षा (एप्रिल ते जुलै १३) नियतकालिकेतून मधून संकलीत

# २. प्रकाशपूजा

रोज उगवणारा सूर्य काही वेगळा असतो का? सूर्य तोच असतो पण त्याचं उगवणं, त्याचा उदय, त्याचा प्रकाश हा साऱ्या चराचर सृष्टीचा प्राण असतो. सूर्य रोज उगवताना सोबत घेऊन येतो आपल्यासाठी एक नवी उमेद, नवी आशा, नसानसात, गात्रागात्रात नवचैतन्य भरणारी ऊर्जा, म्हणूनच या सूर्यनारायणाचं स्वागत करायला सारी सृष्टी आतूर झाली असते.

आपली संस्कृती देखील प्रकाशपूजक आहे. 'तमसोऽमाऽज्योतिर्गमय।' ही आपली दिशा आहे. प्रकाशाचं, सूर्योदयाचं स्वागत करण्याची आपली परंपरा आहे. पूर्वी कोंबडा आरवला की घराला जाग यायची. घरातली कर्ती, वडिलधारी माणसं जागी व्हायची, जात्यावरच्या ओव्या, भूपाळ्यांचे स्वर कानावर पडायचे. अंगणांत सडा पडायचा, दारांत रांगोळ्या रेखल्या जायच्या, उंबरठे पुसून त्यावर कधी रांगोळी, कधी हळदी-कुंकवाची बोटं उमटवली जायची. सारं घर शुचिर्भूत होऊन 'या हो सूर्य नारायणा माझ्या अंगणात' अशी प्रार्थना करीत त्या तेजोनिधी भास्कराचं स्वागत करायला सिद्ध असायची. कोवळ्या किरणात एकदाचं चिंब भिजलं की वारा प्यालेल्या वासरासारखं शरीर आणि मन उत्साहानं दैनंदिन कामाला लागायचं. असं या सूर्योदयाचं मानवी जीवनात असाधारण महत्त्व. 'वेळेवर जागं होणं' हा एक महत्वाचा संस्कारही यातून घडायचा.

आता आपली जीवनशैलीच बदलली आहे. 'लवकर निजेल तो लवकर उठे' किंवा 'Early to bed and early to rise, makes a man healthy, wealthy and wise' अशा कविता परीक्षेसाठी पाठ करायच्या. जीवनाशी त्याचा काही एक संबंध नाही. या नव्या जीवनशैलीच्या विकासात दूरदर्शनही मोलाची भर घालत आहे. घराघरांत चित्र दिसतं ते रात्री उशिरापर्यंत दूरदर्शनवर चित्रपट वा मालिका, फॅशन शोसारखे कार्यक्रम बघणं आणि निद्रादेवीची आराधना करीत तिच्या आधीन होणं. अपरात्री जी घरं जागी असतात ती सूर्योदयापूर्वी उठणार कशी? अशी घरं बाळसावलेलीच असणार आणि अशा घरात वाढणाऱ्या मुलांवर संस्कार होणार तेही आळशी होण्याचे, वेळेवर जागं न होण्याचे.

शहरापासून दूर असणाऱ्या खेड्यापाड्यातील घरं आजही बऱ्याच प्रमाणात सूर्योदयापूर्वी जागं होण्याचा वसा सांभाळीत आहेत. प्रकाशपूजक संस्कृतीचं जतन करीत आहेत, पण तिथंही हळूहळू ही नवी जीवनशैली आपला प्रभाव निर्माण करीत आहे. पण शहरातून मात्र घरंच हरवली आहेत. सिमेंटच्या जंगलात आडोसा म्हणून बांधलेल्या घरांना जागही सूर्योदयानंतर येते. अपरिहार्यता म्हणून जी घरं जागी होतात त्या घरातील माणसं यंत्रासारखी कामं उरकून 'ड्युटी'वर जाण्याच्या घाईत असतात. प्रकाशाच्या स्वागताला लागणारं, पंच पंच उषःकालची प्रसन्नता अनुभवायला लागणारं शुचिर्भूत मन नसतं.

काळ बदललेला आहे. एका गतीमान युगात आपण वावरतो आहोत. विज्ञान-तंत्रज्ञानानं जग जवळ आलेलं आहे. आपल्याही जीवनात प्रचंड क्रांती घडून आली आहे. ५० वर्षांपूर्वीची गावं, घरं, कुटुंब पद्धती, व्यापार-उदीम सारं काही आज बदललेलं आहे. बदल होणं आवश्यक, अपरिहार्य आहे आणि हा बदल आपण स्वीकारलाही आहे. पण बदल स्वीकारणं म्हणजे आपल्या संस्कृतीपासून दूर जाणं, तिचा त्याग करणं नव्हे, सूर्याचं उगवणं, प्रकाश देणं अनंतकाळापासून तेच आहे. त्याच्या उगवण्यातून तीच ऊर्जा, प्रसन्नता, तेच सौंदर्य आजही अनुभवायला मिळतं. पण या अनुभूतीसाठी हवी आहेत शुचिर्भूत घरं. घरातल्या सर्वांनी सूर्योदयापूर्वी जागं व्हावं, प्रकाशाचं स्वागत करावं. ओव्या भूपाळ्या म्हणणारी माणसं नसतील घरात पण कॅसेट तर उपलब्ध करुन दिली आहेत विज्ञानानं, 'घनश्याम सुंदरा' किंवा सुब्बा लक्ष्मीनं गायिलेल्या एखाद्या स्तोत्राची कॅसेट लावता येईल. सर्वांचा प्रयत्न सकाळ प्रसन्न करण्याचा असला पाहिजे.

हे सारं कशासाठी करायचं? आपल्या घरात रांगतयं एक बाळ, दुडूदुडू धावणारं एक चैतन्य, किलकिल्या डोळ्यानं बघणारा घनःश्याम जो उद्या आपल्या समाजाचं नेतृत्व करणार आहे. त्याला घडवायचं असेल तर त्याच्या मनाला, शरीराला चांगल्या सवयी जडवाव्या लागतील. प्रारंभ आपल्या घरापासून करू या! सूर्योदयापूर्वी आपण जागं होऊ या! आपल्या घरातील घनःश्यामाला, श्रीधराला अतिशय हळूवार प्रेमानं जागं करू या! आपण नंद-यशोदा होऊ या! कृष्ण आपल्याच घरात वाढतोय!



# ३. अन्न हे पूर्ण ब्रह्म

अन्न ग्रहण करने से पहले विचार मनमें करना है
किस हेतुसे इस शरीर का पालन पोषण करना है
हे परमेश्वर एक प्रार्थना नित्य तुम्हारे चरणो में।
लग जाये तनमन धन मेरा मातृभूमिकी सेवा में।

जेवायला सुरवात करण्यापूर्वी म्हणायची ही एक प्रार्थना। एक सुंदर विचार आणि संस्कार संक्रमित करणारी.

आता जेवायचं, अन्न ग्रहण करायचं ते कशासाठी? शरीराचं पोषण व्हावं म्हणून म्हणजे जगण्यासाठी. पण जगायचं कशासाठी? डॉक्टर, इंजिनिअर, मंत्री, पत्रकार, शिक्षक होण्यासाठी का? हे होणं हेच जगण्याचं उद्दिष्ट आहे कां? हे सारे व्यवसाय, अन्न मिळविण्याची साधनं. जगायचं कशासाठी? हे स्वप्न पडतं कां कधी आपल्याला? हा विचार कधी अस्वस्थ करतो कां आपल्याला? परमेश्वरानं हे मानवी शरीर दिलेलं आहे त्या शरीराचा, जीवनाचा समाजासाठी, देशासाठी उपयोग झाला पाहिजे. अन्नामुळं शरीराचा विकास होतो. सेवेसाठीही शरीर विकसित झालं पाहिजे. अविकसित फूल देवाला आवडत नसतं. पूर्ण विकसित झालेलं, सर्वत्र सुगंध दरवळणारं फूल पूजेसाठी लागतं. 'देव हा देश असे माझा' असं आपण म्हणतो. मग या देशरूपी देवाची पूजा बांधायची तर शरीर सुदृढ व सुंदर मन असणारं झालं पाहिजे. त्यासाठीच अन्न ग्रहण करायचं 'मन करा रे प्रसन्न, सर्व सिद्धीचे कारण।' असं तुकोबा म्हणतात. प्रसन्न मन सुदृढ शरीरातच राहू शकतं. प्रसन्न मन आणि सुदृढ शरीर यांचं पोषण अन्नावरच अवलंबून असतं म्हणून ते केवळ 'उदरभरण नोहे' तर ते एक 'यज्ञकर्म आहे'. अन्न ग्रहण करण्याच्या प्रक्रियेला एकदा का यज्ञाची उपमा दिली की मग संस्कार, काही नियम हे ओघानं आलेत. भोजन केव्हा, कसं, किती घ्यावं? बुद्धीजीवी, श्रमजीवी यांचा आहार असा असावा? समतोल आहार, सात्विक आहार म्हणजे काय? या साऱ्या गोष्टी या नियमात येतील, पण आज दुर्दैव असं आहे, की आमची 'अन्न ग्रहण करण्याचीच प्रक्रिया प्रदूषित झाली आहे.'

घरातली सर्व माणसं एकत्र जेवायला बसली आहेत. पानात सर्व काही वाढून झालेलं आहे. मग सर्वांनी मिळून मंत्र म्हटला जायचा 'वदनी कवळ घेता नाम घ्या श्रीहरींचे' जेवायला सुरवात व्हायची. पूर्वी घरात हे दृष्य दिसायचं. पण हल्ली अशी घरं अपवादानं दृष्टीस पडतात. आता तर जेवायलाही लोकांना वेळ नसतो. धावपळीत प्लेटमध्ये जे असेल ते घ्यायचं उभ्या उभ्याच जेवायचं. जेवता जेवता दूरदर्शन वा वृत्तपत्रातील हेडिंग वाचायचं. अशा उदरभरणातून जगण्याला मदत होईल पण जगण्याचा हेतू विसरलेला असेल.

आता नव्या पिढीत एक नवीन प्रकार बघायला मिळतो. तो म्हणजे बाहेर कुठंतरी हॉटेल वा धाब्यावर आठवड्यातून एक दिवस चेंज म्हणून जेवायला जायचं. मग घरातल्या अन्नापेक्षा तेच अन्न रुचकर वाटायला लागतं. मग ती सवय होते आणि पोट भरणं, जिभेचे चोचले पुरवणं एवढाच हेतू त्यामागं उरतो. जेवणाचा अनुभवही अफलातून असतो या हॉटेलमधला. इथं एकावेळी साऱ्या वस्तू कधीच टेबलावर आणून ठेवल्या जात नाही. हळूहळू एक एक पदार्थ येतात. जेवणाऱ्यांनाही संयम नसतो. पापड आले करा खायला सुरवात. सलाद ठेवलंय उचला काकडी मुळ्याच्या फोडी. वाट बघणं जमतच नाही कुणाला. हीच सवय घरीही मुलांना लागते. जे वाढलं पानात तेच खायला सुरवात करतात. 'अन्न हे पूर्ण ब्रह्म' म्हणायला वेळ कुठं असतो या पद्धतीत? सत्त्व, रज, तम या त्रिगुणाचं पोषण देखील अन्नावर अवलंबून असतं. शाकाहारी माणसाची वृत्ती आणि मांसाहारी माणसाची वृत्ती यात खूप फरक असतो. विद्यार्जन करणाऱ्याचं लक्षण सांगताना 'मिताहार' हे एक सांगितलं जातं. उपमन्यू खूप आहार घ्यायचा म्हणून त्याच्या स्मरणात राहत नसे अशी कथा पुराणात आहे. थोडक्यात अन्नावरच माणसाची वृत्ती, प्रवृत्ती आणि प्रकृतीही निर्भर असते.

वृत्तीवरून आठवण झाली. अन्न तयार करणाऱ्याच्या वृत्तीचाही अन्नावर परिणाम होत असतो, असं शास्त्र सांगतं. अन्न ग्रहण करताना जसं मन प्रसन्न असलं पाहिजे तसं अन्न शिजवताना, स्वयंपाक करतानाही करणाऱ्याचं मन प्रसन्न पाहिजे. गृहिणी स्वयंपाक करताना तिच्या मनात नेमका कोणता विचार असतो? घरातल्या सर्वांनी, आवडीनं आणि पोटभर जेवावं. निरपेक्ष प्रेम असतं त्यात. आईच्या हातचं जेवायला अधिक आनंद का वाटतो? तिचं मन वत्सल भावानं, प्रेमानं भरलेलं असतं. हे प्रेम अन्नातही नकळत उतरत असतं, कृष्ण सांदीपनीच्या आश्रमातून बाहेर पडताना आचार्यांनी विचारलं, कृष्णा, काय आशीर्वाद देऊं तुला? कृष्णानं काय मागितलं? 'मातृहस्तेन भोजन्' आयुष्यभर आईच्या हातचं जेवायला मिळावं. एखाद्या दिवशी भाजीत मीठ अधिक झालं तर आजोबा आजीला विचारायचे 'बरं नाही का आज?' आजी काय ते समजायची. अन्न शिजविणाऱ्याची मनःस्थिती नीट नसेल तर अन्नाच्या चवीतही फरक पडतो. हॉटेलमध्ये अन्न तयार करणाऱ्याची

मनोवृत्ती कशी असते? अधिक पोळ्या अधिक पैसे, जेवणारे अधिक तर पैसे अधिक, सर्वच बाबतीत तो 'कमर्शिअल' विचार करेल. मग खाणाराही आपला खिसा बघून थाळी मागवेल. आईचा विचार शुद्ध सात्विक प्रेममय म्हणूनच तिच्या हातची मीठ-भाकरीही अमृताशी स्पर्धा करणाऱ्या चवीची असते. घरातील अन्नाला कधीही नाव ठेवू नये, असं म्हटलं जातं. जे वाढलं त गोड करुन घेतलं पाहिजे.

आज जीवन अत्यंत धावपळीचं, गुंतागुंतीचं झालं आहे. या धावपळीत अनेकदा ढाबा, हॉटेल्समध्येही जेवण घ्यावं लागेल, फिरस्तीची नोकरी करणाऱ्याला तर खानावळींशिवाय पर्याय नसतो. काळाप्रमाणे बदलायलाच हवं. घरी देखील सर्वांनी एकत्र बसून भोजन करायला बसणं हेही कदाचित जमणार नाही. आपण ह्या सर्व गोष्टी गृहित धरु या. पण कुठंही जेवण केलं तरी ते ग्रहण करतांना 'अन्न हे पूर्ण ब्रह्म' म्हणायला काय अडचण आहे? घरातल्या लहान सहान गोष्टींचे संस्कार मुलांवर होत असतात. म्हणून ज्या घरात प्रसन्न मनानं अन्न शिजवलं जातं ते पूर्ण ब्रह्म आहे असं सांगितलं जातं. अन्नाला नावं ठेवली जात नाही. जिथं सात्विक आहार घेतला जातो अशा घरात वाढणारं मूल देखील याच संस्काराचं पाथेय घेऊन उंबरठ्याबाहेर पडेल. घराइतकी सुंदर पाठशाळा मुलांना कुठंच मिळणार नाही. ही पाठशाळा अधिक अर्थपूर्ण करण्यासाठी घरातील वडील माणसांनीच प्रयत्न करायला हवेत. उत्तम नागरिक, उत्तम माणूस माझ्याच घरांत घडणार आहे या मनोवृत्तीतून आपण उभं झालो तर आपल्या घरातील नरेंद्र उद्याचा विवेकानंद म्हणून उभा राहील, यात शंका नाही.



# ४. अबोल झाली घरं

आपण एखाद्या परिचित अथवा अपरिचित घरात पाय टाकला तर कोणता अनुभव यायला हवा? त्या घरातील माणसांनी किमान 'या' असं म्हणावं. पेलाभर पाणी द्यावं. अपरिचित असू तर कोण? कुठले? काय काम आहे? अशी साधी चौकशी करावी. परिचित असू तर परस्परांचं कुशल विचारावं ही अपेक्षा असते. बरं घर म्हटल्यानंतर त्या घरातील माणसांच्या बोलण्याचा, हसण्याचा, मुलांच्या रडण्या ओरडण्याचा, भांडणाचा आवाज तरी कानावर पडायला नको का? पण हल्ली घरात आवाज असतो तो दूरदर्शनचा. घरं कशी अबोल झाल्यासारखी वाटतात. आलेल्या माणसाचं स्वागत करताना कपाळावरील आठ्या उसणं हसू आणून लपविण्याची केविलवाणी धडपड करताहेत माणसं हे सहज लक्षात येतं. घरात माणसं असूनही एक वेगळीच शांतता जाणवते या शांततेला कुठला चेहरा आहे हेही अनाकलनीय असतं. आपली घरं गोडाऊन तर झाली नाहीत ना? गोडाऊनमध्ये प्रवेश केला की काय जाणवतं? बंद हॉल, अपुरा प्रकाश, भरलेल्या पोत्याची थप्पी, सटर फटर वस्तू बाकी शांत, शांतता हा शब्द जरी एक असला तरी अनुभवाच्या संवेदना मनावर वेगवेगळ्या अर्थाच्या मुद्रा उमटवीत असतात. मंदिराच्या गाभाऱ्यात जाणवणारी शांतता, ध्यान विपश्यना अशा साधनेत अनुभवायला मिळणारी शांतता, प्रचंड दडपणाखाली निर्माण झालेली शांतता किंवा एखाद्या वनराईतून संथपणे वाहणाऱ्या नदीकाठची शांतता या प्रत्येक प्रसंगात आणि क्षणात जाणवणाऱ्या शांततेला तिचा स्वतःचा एक चेहरा आहे, हे आवर्जून जाणवतं. पण घरात माणसं असूनही निर्माण झालेली शांतता अनुभवताना तिचा चेहराच एकदम अनोळखी वाटायला लागतो.

आठवणीतल्या घरातलं मला माझं लहानपण आठवतं. आमचं घर-घर कसलं वाडाच होता... कौलारु असला तरी. दोन काका, काकू, आजी आजोबा, एक विधवा आत्या, दोन तीन वर्षांचं अंतर असणारे आम्ही ७, ८ सख्खे, चुलत भावडं-१५-२० जणांचं मोठं कुटुंब. घर कसं भरलेलं वाटायचं. आम्हा मुलांची भांडणं झालीत, की आम्ही आजोबांच्या कोर्टात जायचे. आई-बाबा याकडे फारसं लक्ष देत नसत. आम्हा सर्वांचे हट्ट पुरवायचे ते आजी आजोबांनीच. अंगणात टिक्कर बिल्ला,

लंगडी, कंचे, चिंचोक्याची लपवा लपवी. त्यात होणारी लुटीपुटीची भांडणं काकू, आजी, आत्या ओटीवर बसून बघायच्या. त्यांच्या गप्पात त्या गुंग असायच्या. संध्याकाळी 'शुभं करोति' ला आमच्यापैकी कुणी आलं नाही की त्याला धपाटा बसलाच म्हणून समजा. त्यामुळं 'शुभं करोति' म्हणजे घरातील मुलांच्या हजेरीची वेळ. आमच्याकडून संस्कृतातील अनेक श्लोक, स्तोत्र पाठ करवून घ्यायची जबाबदारी आजोबाकडे आणि अनेक कथा सांगून मुलांचं रंजन करण्याची जबाबदारी आजीकडे. पाहुण्यांची ये जा तर विचारूच नका. कधी आईकडील कधी काकूकडील कधी आत्याकडील असं कुणी ना कुणी सारखं येत असायचं. गोडधोड व्हायचं. रात्र रात्र गप्पा रंगायच्या, हास्याची कारंजी उडायची. घरात माणसं असल्याचं जाणवायचं. घर चैतन्याचं आवार वाटायचं. आता अशी घरं आठवणीत गेलीत. पूर्वी घरात 'आम्ही' होतो आता घरात 'मी' वास्तव्य करताना दिसतो. 'मी' 'मी' मध्ये संवाद कसा होणार? गप्पा कशा रंगणार? या 'मी' सोबत दूरदर्शननेही आपलं बस्तान पक्क केलेलं. त्यामुळं बोलत असतात, ओरडत असतात ते दूरदर्शनवरील माणसं. घरात एखादं दुसरं मूल. तेही कार्टून चॅनल बघत जमिनीला चिकटून बसलेलं नाहीतर कुठल्यातरी क्लासला, व्यक्तिमत्त्व शिबिराला- त्याला पाठवलेलं असतं. घरात व्यक्तिमत्त्व विकास वगैरे गोष्टींना वेळ कुठं असतो. आपल्या मुलांचं व्यक्तिमत्त्व कुणी तरी बाहेरच्यांनी पैसे देऊन घडवायचं. गंमत आहे.

या 'मी' मुळं हल्ली शेजार धर्मही उरला नाही. आपल्या मुलांनी बाजूच्या घरात जाऊ नये. शेजारच्या मुलांनी आपल्याकडे येऊ नये. फ्लॅट पद्धतीत आपल्या आजूबाजूला, वरखाली घरं असली तरी त्या घरांचा आपल्या घराशी संपर्क नसतो. माणसांची सलगी नसते. नावही माहिती नसतात. फक्त जाता येता बळजबरीनं हसायचं. ओळख असल्याचं दाखवायचं. शेजारधर्म हा माणसा-माणसातला एकोपा वाढवणारा असतो. सुख-दुःखात सहभागी व्हायला शिकवणारा असतो, सहकार्याची भावना जागवणारा असतो, माणसा-माणसातील नात्याची वीण घट्ट करणारा असतो. पण साऱ्याच घरात 'मी'. दोष कुणाला द्यायचा? 'मी' 'मी' चं नातं, मैत्र झालंय का कधी? 'मी' ला 'आपण' मध्ये विरघळून जायला हवं तेव्हाच 'मैत्र' निर्माण होतं. पूर्वीच्या घरात भरपूर माणसं होती आणि प्रत्येकाला 'मी' बाजूला ठेवून परस्परांच्या सुखासाठी झटायचं शिक्षण मिळायचं. दुःख कुटुंब लहान झाल्याचं नाही दुःख माणसातला 'मी' बळावल्याचं वाटतं. घर एका खोलीचं की दहा खोल्यांचं याला महत्त्व नाही फक्त त्यात माणसं असावी. माणसामाणसात आत्मियता, जिव्हाळा असावा. घरातून बाहेर गेलेल्याला घराची ओढ वाटावी. इतरांच्या सुखासाठी स्वतःतला 'मी' विरघळविण्याची सवय असावी. अशी माणसाला माणसांची ओढ, माणसाला घराची ओढ, घरांना घरांची ओढ निर्माण झाली, की 'हे विश्वचि माझे घर' म्हणणारा, ज्ञानोबा एखाद्या घरातून विश्वकल्याणाचं स्वप्न घेऊन बाहेर पडेल. कुणी सांगावं?



# ५. शुभंकर व्हावी कातरवेळ

संध्याकाळ झाली, की का कुणास ठाऊक पण मन उदास वाटायला लागतं. सूर्य अस्ताला गेला असला तरी त्याचा अंधूक प्रकाश रेंगाळत असतो. रात्र व्हायची असली तरी तिचा अंमल सुरू होत असल्याच्या पाऊलखुणा मनाला विचित्रपणे खुणावत असतात. आपल्याच लांब लांब पडणाऱ्या सावल्या आपली मनं कुरतडच असल्याचा भास होतो. एक अनामिक भीती, अनामिक हूरहूर मनावर स्वार झाल्यासारखी वाटते. शरीरच नव्हे तर मनही थकल्यासारखं, चोळामोळा झाल्यासारखं वाटतं. अनेक उलट-सुलट, अशुभ विचारांचं काहूर मनात घोंघावत असतं. निसर्ग आणि वातावरणात होणारा हा बदल अस्वस्थता वाढवणारा, दुबळेपणाची जाणीव करून देणारा, माणूस किती असहाय आहे असं वाटायला लावणारा असतो. म्हणूनच संध्याकाळी मनाला ओढ असते ती घराची, माणसांची, माणसंच कशाला? पशू-पक्षीही घरटे जवळ करीत असतात. निसर्गातील बदलाच्या या संधीरेषेला 'कातरवेळ' असा शब्द ज्याला सूचला तो खरोखरच कल्पक असला पाहिजे.

संध्याकाळ झाली की मला अनेकदा पुराणातील हिरण्यकश्यपूची गोष्ट आठवते. हिरण्यकश्यपू राक्षसानं शंकराची आराधना करून वरदान प्राप्त केलं होतं. कोणता वर? त्याला माणूस आणि प्राणी तसंच शस्त्र यापासून मृत्यू येऊ नये. शिवाय दिवसा वा रात्री मृत्यू येऊ नये. थोडक्यात अजरामर होण्याचाच वर होता तो. मग या राक्षसाला ठार करण्यासाठी देवाला युक्ती करावी लागली. त्यानं तोंड सिंहाचं नि शरीर मानवाचं असं नरसिंह रुप धारण केलं आणि दिवसही नाही आणि रात्रही नाही अशी कातरवेळ. संध्याकाळ निवडली. हिरण्यकश्यपूला ठार केलं. ही कथा मला आवडली कारण या कथेतूनच जी सूचकता जो संकेत मिळतो तो आपल्यासाठी महत्वाचा असतो. संध्याकाळी मनात जी अस्वस्थता असते, राक्षसी, अशुभ विचाराची आवर्त फेर धरत असतात त्यांना नष्ट करण्यासाठी ईश्वरी विचाराची म्हणजे शुभ, शिव सुंदर अशा विचाराच्या अविष्काराची आवश्यकता असते. हाच संकेत तर नाही ना? सर्वांचं कल्याण व्हावं, सर्वांना आरोग्य लाभावं, धन संपदा लाभावी, दुष्ट प्रवृत्तीचा नाश व्हावा. मन शुद्ध सात्विक विचारानं भरावं म्हणून तर संध्याकाळी घरा-घरातून दीपज्योतीला 'शुभं करोति कल्याणम्' ही प्रार्थना केली जात नसावी?

प्रार्थनेवरून आठवण झाली ती बालपण घालवलेल्या घराची. त्यालाही अर्धशतकापेक्षा अधिक काळ लोटला. भरपूर माणसांनी गजबजलेलं घर. घरात आजोबांचा दरारा. त्यांच्या धाकामुळे घरातल्या सर्वांनाच संध्याकाळी काही गोष्टी, नियम पाळावेच लागायचे अन्यथा बोलणी खावी लागायची. आम्हा मुलांना तर चक्क मारच पडायचा. नियम तरी कोणते? संध्याकाळी, तिन्ही सांजेला कुणीही झोपायचं नाही. आजाऱ्यांनाही यावेळी जरा उठून बसायचं. जेवायचं नाही दिवे लागण्यापूर्वी मुलींनी, स्त्रियांनी घरी परतायलाच हवं, कुणी परतलं नाही तर सारं घर अस्वस्थ व्हायचं.

**अजून कसे येती ना परधन्या राजा**
**किरकिरती रातकिडे झाल्या तिन्ही सांजा**

आज अशी लोकगीत वाचताना वाटतं की अशी अस्वस्थ होणारी घरं त्या काळात सर्वत्र होती. आमच्यावरच ही बंधनं होती असं नाही. बरं हे नियम काही आजोबांनी केलेले नव्हते. परंपरेनं ते चालत आले होते. झोपायचं का नाही? जेवायचं का नाही? हिंमत नव्हती कुणाची विचारायची.

तिन्ही सांजा होण्यापूर्वीचा कार्यक्रम घराघरात ठरलेला असायचा. दिवस ढळायला लागला की घरात स्त्रियांची धावपळ सुरु. अंगण, घर झाडून स्वच्छ करायचं. वेणी फणी करायची. कपडे बदलायचे. ७० वर्षांच्या आजीलाही यातून सूट नसायची. झाडांना, तुळशीला पाणी घालायचं. सर्वांचा प्रयत्न असायचा घर प्रसन्न ठेवायचा. अपशब्द, धुसफूस या काळात कटाक्षानं टाळायची. दिवे लागण होईस्तोवर मुलांनी बाहेर खेळायचं. सांजेला पत्ते, सारीपाट अशा खेळांना बंदी असायची. आजोबा देवदर्शनाला जायचे. बाहेर गेलेली माणसं घरी परतायला लागायची. आजीचं दिवा घेऊन समोरच्या देवळात जाणं आणि आजोबांचं घरात येणं जवळपास एकावेळी व्हायचं. आजोबा घरात आले की दिवे उजळलेले असायचे. ही वेळ म्हणजे लक्ष्मीचं घरात आगमन होण्याची. सर्वांनी 'शुभं करोतिला' असायचं. सामुहिकपणे म्हणायचं. हाही रिवाज जुनाच. लक्ष्मी म्हणजे काही पैसा नाही. घर सद्भावानं, प्रसन्नतेनं, परस्पर प्रेमानं भरलेलं असावं. हाच त्यामागचा भाव असतो, हीच घराची श्रीमंती असते. कातरवेळी मनात आलेली अशुभांची जळमट दीपज्योतीच्या प्रकाशात जाळून जावीत, घर आनंदाचं आवार व्हावं याचसाठी हा संस्कार असतो. असा संस्कार पूर्वी घरातून व्हायचा.

घरातल्या या नियमांना विज्ञानाचा काही आधार आहे कां? हा प्रश्न कधी मी माझ्या आजी आजोबांना विचारला नाही आणि विचारण्याचं धाडसही झालं नाही.

आजही त्यात काय विज्ञान आहे हे शोधण्याचा प्रयत्न केला नाही. पण इतकं जरूर वाटतं की त्या अंधश्रद्धा नव्हत्या. काळ कितीही समोर गेला असला तरी तिन्ही सांजेला माणसांना, पशू-पक्ष्यांना वाटणारी घराची ओढ कमी झालेली नाही. कातरवेळी मनाची होणारी घालमेल आजही थांबली नाही.

आठवणीतली घरं आता संपली आहेत. हल्ली संध्याकाळी घराघरातून कोणतं दृष्य बघायला मिळतं? मुलं दूरदर्शनजवळ बसून एखादा सिनेमा वा मालिका बघत असतात. अनेक घरात मुलं सकाळी बाहेर पडलेल्या आई-बाबाची कधी येतात म्हणून वाट बघत असतात. घरात आल्या आल्या मुलं मागं लागलीत की त्यांच्यावर आईबाबा अनेकदा ओरडत असतात, चिडत असतात. तिन्ही सांजेला जेवायला बसणारी घरंही काही कमी नाहीत. तुळशीजवळ, देवाजवळ दिवा लावायचा असतो, 'शुभं करोति' म्हणायचं असतं याची आठवणही नसते. अंधार पडण्यापूर्वी सर्वांनी घरी परतलं पाहिजे हा दंडकही आता उरला नाही. घराची ओढच कमी होत चालली आहे. काळाप्रमाणे बदल होणं अपरिहार्य आहे. कातरवेळ मात्र बदललेली नाही. म्हणून या हळव्या वेळी किमान आपल्या मुलांना दूरदर्शनपासून दूर ठेवणं, काही चांगल्या कथा सांगणं, 'शुभं करोति'सारखी एखादी प्रार्थना म्हणवून घेणं, स्वतःला, घराला प्रसन्न ठेवणं हे तर आपल्या हाती आहे! जे हाती आहे ते जर आपण करू शकलो नाही तर आयुष्याच्या संध्याकाळी ही मुलं तुम्हा आम्हाला साथ कशी देतील, हाथ कशी देतील? आणि जी मुलं स्वतःच्याच आई-वडिलांना हात देणार नाही त्यांच्या सुख-दुःखाचा विचार करणार नाही ती समाजातील तळागाळातील माणसांच्या सुख-दुःखाचा विचार कसा करतील त्यांना हात कसा देईल? आपल्या आयुष्याची संध्याकाळ आणि रोज संपणारी संध्याकाळ ही शुभंकर व्हावी, आनंददायी व्हावी, सात्विक समाधानानं उजळावी हीच तर इच्छा असते ना आपली?



# ६. माणसांची नातीगोती

माझी आजी मोठी विलक्षण होती. डी.एड., बी.एड. असं कुठलंही प्रशिक्षण तिनं घेतलेलं नव्हतं. पण नातवंडांना कसं आणि काय शिकवायचं याची उत्तम जाण तिला होती. आज मला तिची जेव्हा आठवण होते तेव्हा वाटतं आजीनं आम्हाला जे शिकवलं आणि ज्या पद्धतीनं शिकवलं ते आजच्या शिक्षकालाही जमणार नाही. पेलणार नाही. एकदा आजीनं आम्हा लहान मुलांना बसवून कोडी घालायला सुरवात केली. म्हणाली, ''सासू-सुना नणंदा-भावजया, मायलेकी अशा सहा जणींत तीन लाडू वाटायचे आहेत. लाडू फोडायचे नाहीत. सर्वांना सारखे मिळायला हवेत. सांगा बरं वाटणी कशी करायची ती?'' दिवसभर आमचं विचारचक्र सुरु असायचं. तीन लाडू न फोडता सहा जणीत कसे वाटायचे? याला विचार, त्याला विचार असं उत्तर शोधण्यासाठी आमची धडपड चाले. पण कुणी-अगदी आईसुद्धा उत्तर सांगेना. घरात असता, शोधा उत्तर. हेच सर्वांचं पालुपद. कोडं काही सुटेना. शेवटी आजीच उत्तर सांगायची पण ते उत्तरही ती आमच्याकडून काढून घ्यायची. आई-आजी-आत्या ह्या तीन व्यक्ती अनेक नात्यानं कशा बांधल्या होत्या हे कळायचं. आणखी एक लक्षात यायचं की नाती माणसा माणसांना बांधून ठेवतात. विविध कोड्यातून आजी आम्हाला नाती उलगडून दाखवायची. हे काका, हे मामा, ही आत्या, ही मावशी हा आतेभाऊ, हा मामेभाऊ, ह्या आक्का अशी नाती त्या माणसांना दाखवून समजाऊन दिली जायची. यातला कुणीही भेटला की मायेनं चौकशी करायचा. तो आपला वाटायचा. पूर्वी एकत्र कुटुंबपद्धती असल्यानं आणि परिवारही मोठा असल्यानं ही नाती समजायची. नात्यातली माणसं भेटायची. त्यांची ये जा असायची आणि परिवार आणखी मोठा वाढायचा.

आई रागावली तर आजीकडे जायची सोय होती. बाबा रागावले तर तक्रार करायला आजोबांची जागा होती. मावशीचा जिव्हाळा तर विलक्षण होता. 'माय मरो पण मावशी जगो' अशी उंची या नात्याला लाभली होती. या नातेसंबंधामुळे कधी मावशीकडे, कधी मामाकडे कधी आत्याकडे राहायला जायला मिळायचं. इतरांच्या घरी कसं वागायचं हे शिकायलाही मिळायचं. येण्या-जाण्यामुळे आत्मियता वाटायची. एकमेकांच्या सुख-दुःखाच्या वेळी माणसं हाक न देताही धावून यायची. त्या काळात रक्ताची नाती जशी घट्ट होती तशी शेजाऱ्यांशी, मित्रांशी, घरात कामाला असणाऱ्या गड्यांच्या घराशी देखील कुठलं ना कुठलं नातं असायची. अशी

ही नाती गोती घरांना घरपण द्यायची. घरं श्रीमंत करायची.

आज दुर्दैवानं ही नातीच हरवली आहे. असलेली ठिसूळ झाली आहे. घरात एकच मुलगा व मुलगी ना त्याला रक्ताचा भाऊ ना बहीण. आईला बहीण नसेल तर मावशी हरवलेली, भाऊ नसेल तर मामा. घरात माणसंच तीन तर नाती सांगणार, समजणार कशी? आईच्या बहिणीला मावशी म्हणतात. आईच्या भावाला मामा म्हणतात असं पुस्तकात पाठ करून का कधी नाती कळत असतात? त्या नात्यातली आशय घनता का प्रत्ययाला येऊ शकते? नाती समजण्यासाठी माणसात राहावं लागतं आणि नाती टिकवून ठेवण्यासाठी काहीतरी त्यागावं लागतं. आज तर काळच विचित्र आलाय. रक्ताची नातीच जिथं पाण्यासारखी पातळ होत चालली आहे तिथं शेजाऱ्यांशी ती जुळणार तरी कशी? आता तर अनेक घरात मुलं वडिलांना डॅडी, आईला मम्मी, आईची बहीण असो, मैत्रीण असो, काकू असो वा आत्या या सर्वांना आँटी या एकाच शब्दानं संबोधू लागले आहेत. गंमत अशी की घरातल्या माणसांनाही यात काही गैर वाटत नाही.

नाती विस्कटली, की त्यातलं प्रेम, आत्मियता, जिव्हाळा सारंच संपत जातं मग उरतो तो दिखाऊपणा. यातून दिसतात मुखवटा घातलेली माणसं. मुखवट्यांमध्ये कधी संवाद होतो का? माणसा-माणसातील संवाद हरवला की घराचा कोंडवाडा होतो. कोंडवाड्यातून आदर्श नागरिक, चांगला माणूस बाहेर पडेल कां? घडेल कां? आपल्या घरात वावरणाऱ्या चैतन्याच्या फुलांना एक वेळ सासू-सुना, नणंद-भावजया, साडू, आक्का ही नाती समजली नाही तर फार बिघडणार नाही पण माणसा-माणसात एक नातं असतं हे कळणं आज फार महत्त्वाचं आहे. माणसा-माणसातलं नातं आज ठिसूळ झाल्यामुळं अनंत प्रश्न, अनंत समस्या निर्माण झाल्या आहेत. एकनाथाला माणसा-माणसातलं नातं कळलं होतं म्हणून वाळवंटात रडत पडलेल्या तान्हुल्याला-तो कुठल्या जाती-धर्माचा आहे याचा विचार न करता त्यांनी उचलून घेतलं. आपल्या देशातील हजारो लोकांच्या अंगावर कपडे नसताना आपल्याला सुटबुटात राहण्याचा अधिकार नाही, असं ठरवून एक धोतर आणि उपरणं वापरणाऱ्या मोहनदास गांधींना हे नातं कळलं होतं. देशबांधवांची आठवण आल्यामुळे अस्वस्थ मनानं मखमली गादीचा त्याग करुन एका सतरंजीवर झोपणाऱ्या स्वामी विवेकानंदांना हे नातं कळलं होतं. असं माणसा-माणसातील नातं मुलांना घरात बघायला मिळालं पाहिजे. असं माणसा-माणसात नातं जोडायला त्याला शिकवलं पाहिजे. हे नातं घट्ट होण्यासाठी काही सोडावं लागतं हा संस्कार दिला गेला पाहिजे. अशा संस्कार असणाऱ्या घरातच गांधीही जन्म घेत असतो.



# ७. जतन संस्कृतीचं

घरं एकसंध होती, नाती उथळ झालेली नव्हती, तेव्हाची गोष्ट, आषाढी अमावास्या म्हणजे जिवती, दीपपूजेचा सण. आई, मुलांच्या आरोग्यासाठी, सुखासाठी, आयुष्य वर्धनासाठी दीप पूजा करायची. भिंतीवर लाल गंधानं काढलेल्या कसल्याशा चित्रांची पूजा केली जायची. दुसऱ्या दिवशी श्रावण. 'आला श्रावण श्रावण रंग गुच्छाचे घेऊन' असा श्रावण.

**''श्रावण मासी हर्ष मानसी हिरवळ दाटे चोहीकडे।**

**क्षणात येते सर सर शिरवे, क्षणात फिरुनी ऊन पडे।''**

असा अनुभूती देणारा श्रावण. श्रावण म्हणजे सण, उत्सव, व्रतवैकल्ये यांची गर्दी असलेला महिना. नागपंचमी, कृष्णाष्टमी, रक्षाबंधन, मंगळागौर असे एक ना अनेक सणच सण. लग्न झालेल्या मुली माहेरी आलेल्या असायच्या. गावातल्या देवळात भागवत सप्ताह सुरु व्हायचा. घरातली मुलापासून तो वृद्धापर्यंत सारी माणसं कामात असायची. आम्हा मुलांना सकाळी उठून ताईच्या गौरीसाठी फुलं तोडायचं काम. आजी आजोबांना देवळात जायची घाई घरातल्या १५-२० लोकांसाठी वडा पुरणाचा स्वयंपाक करण्यात स्त्रिया गुंतलेल्या. कामातून सूट असायची ती फक्त माहेरवासिनींना. त्यांच्या मैत्रिणींशी चालणाऱ्या गप्पा, त्यांचं हसणं खिदळणं. नाव घेण्याचा एकमेकीला केला जाणारा आग्रह. उखाणे, फुगड्या, गाणी. घर कसं उल्हास, आनंदानं गच्च भरल्यासारखं वाटायचं.

पोळ्याला बैलांना वडा पुरणाचा नैवेद्य व्हायचा. 'अतिथी देवो भव' म्हणून त्यांची पूजा व्हायची. श्रावण भाद्रपदाला आनंदाचा वसा देऊन निरोप घ्यायचा. कळायचंच नाही गौरी गणेशाचं आगमन व्हायचं. गणेशोत्सवाचे दहा दिवस आनंदाची पर्वणी. आजोबांच्या खड्या आवाजातील गणपती स्तोत्र, अथर्वशीर्ष, सकाळ-संध्याकाळच्या आरत्या, चढत्या आवाजात म्हटली जाणारी मंत्र-पुष्पांजली. रात्री भजनं, प्रसादाची चंगळ. घराला आणि माणसांना फुरसतच नसाची या उत्सवामुळं. आम्हा मुलांना अनेक आरत्या सहज मुखोद्गत व्हायच्या. गजाननाच्या वास्तव्यानं घराला एक अधिष्ठान मिळायचं. पितृपक्ष संपला की घट मांडला जायचा. देवीचं नवरात्र सुरू व्हायचं. नवरात्रातील वातावरणच वेगळं. नवरात्रात आरत्या म्हणताना चढाओढी चालायच्या, मंत्रपुष्पांजली व्हायची, गोंधळ व्हायचा पण सारं कसं शिस्तीत. साऱ्या घरानं जणू अनुष्ठान मांडलेलं. पारणं झालं

की विजया दशमी. घराघरांत जाऊन सोनं द्यायचं, वडीलधाऱ्यांना वाकून नमस्कार करायचा. माणसं माणसांना भेटायची. प्रेमाची देवाण-घेवाण व्हायची. दसरा संपला, की चार-पाच दिवस घराघरांतून सायंकाळी आवाज यायचा तो भुलाबाईंच्या गाण्याचा, 'अडकीत जाऊ खिडकीत जाऊ, खिडकीत होता बत्ता, भुलोजीला मुलगा झाला, नाव ठेवा दत्ता'. लहान-लहान मुलींचं भावविश्व संपन्न करणारी ही भुलाबाई देखील हरवून गेलीय आज. मग दिवाळी यायची. चार पाच दिवस चंगळ असायची. दिवाळीनंतर सण-उत्सवाची गर्दी ओसरली तरी महिना रिकामा गेला असं कधी व्हायचं नाही. होळीपर्यंत सतत काही ना काही सुरू असायचंच मग तो सण असो, उत्सव असो नाही तर एखादं व्रत असो.

आपल्या पूर्वजांनी वर्षभर साजऱ्या करावयाच्या सण, उत्सव, व्रतवैकल्य यांची रचना आणि योजना इतक्या कल्पकतेनं केली आहे की जगाच्या पाठीवर माणूस, समाज घडविण्याची इतकी शास्त्रशुद्ध पद्धती क्वचितच बघायला मिळेल. हेच तर आपल्या भारतीय संस्कृतीचं वैशिष्ट्य आहे. निसर्गाविषयी कृतज्ञता पशू-पक्ष्याविषयीची आत्मियता, माणसा-माणसांतील एकोपा अखंड टिकावा, मूल्यांधिष्ठित अशीच समाजधारणा व्हावी हेच तर या सण उत्सवामागील प्रयोजन. या निमित्तानं सणावारामागं असणाऱ्या कथा कानावर पडायच्या, उत्सवामुळं माणसामाणसांतील सहकार्याची अपरिहार्यता लक्षात यायची, व्रतवैकल्यानं मनाला आणि घराला सात्विकतेची एक बैठक मिळायची. संस्कार शाळा काढायची गरजच नव्हती. कारण घर हेच संस्कार केंद्र होतं. समाजजीवनाची पाठशाळा होती.

आता सारंच बदललंय. गावाचं गावपण, घराचं घरपण, माणसातलं माणूसपण असं खूप काही हरवल्यासारखं वाटतं. गुढीपाडवा वर्षाचा प्रारंभ. नववर्षाची सुरवात. सूर्योदयाला शूचिर्भूत होऊन विजयाचं प्रतीक असणाऱ्या गुढ्या उभारून आपण या नववर्षाचं स्वागत करायचो. आता ३१ डिसेंबरला शहरातील, गावागावांतील घरं जागी असतात. नाच गाणी, संदलच्या तालावर तरुण तरुणी नृत्य, फटाक्याची आतषबाजी काय करतात, हॅपी न्यू इयर म्हणून शुभेच्छा, स्वागत काय करतात. सारंच विचित्र. आपली संस्कृती प्रकाशपूजक आहे. 'असतोऽमा सद्गमय। तमसोऽमा ज्योतिर्गमय। मृत्युर्मा अमृतम् गमय।' अशी आपली प्रार्थना आहे. मध्यरात्री, अंधारात कां आनंदोत्सव साजरा करायचा असतो? निशाचरांची संस्कृती आहे कां आपली? आपल्याला स्वातंत्र्य मिळालं १४ ऑगष्ट रोजी रात्री बारा वाजता. पण आपण आनंदोत्सव साजरा केला तो १५ ऑगष्ट रोजी सूर्योदयाला. याचाही विसर पडावा? मुळात ३१ डिसेंबर किंवा १ जानेवारी हा काही भारतीय कालगणनेनुसार वर्षारंभ नाही. मग आनंद कशाचा साजरा करायचा? रक्षाबंधन हा सण बहीण-भावाच्या अतूट व निरपेक्ष प्रेमाचं प्रतीक. बहीण भावापुरताच केवळ तो मर्यादित नाही, नव्हता तर स्त्रीकडे बघण्याचा एक उदात्त, पवित्र दृष्टिकोन देणारा. माणसांच्या वर्तनाची उंची वाढविणारा सण आहे तो! पण रक्षाबंधनाच्या दिवशी तरुण-तरुणींमध्ये, मुलांमध्ये जेवढा उत्साह दिसणार नाही तेवढा तो 'व्हॅलेंटाईन डे' ला दिसतो. घरानंच ही संस्कृती स्वीकारली तर माणसं, मुलं तशीच वागणार की नाही?

परवा माधवराव भेटले. आपली व्यथा सांगत होते ते. त्यांना मुलं तीन. मोठा पुण्याला, मधला परभणीला तर लहान अकोल्याला आणि माधवराव म्हातारीला घेऊन नागपूरला. एका घराची चार घरं झाली. माणसे विभागली गेली. मुलांनी म्हणे सणही वाटून घेतलेत. मोठ्याकडे महालक्ष्मी, मधल्याकडे गणपती तर लहान्याकडे घटस्थापना. देव लहानाकडे गेले ना वाटणीत. माधवराव अगतिकतेनं सांगत होते. सणवार, देव यांची वाटणी झाली... आमची तेवढी व्हायची राहिली. हे दुःख माधवरावचं नाही. सत्तरी गाठलेल्या, ओलांडलेल्या असंख्य माधवरावचं ते दुःख आहे. सण, उत्सव ही तर माणसं जोडायची, एकत्र आणण्याची माध्यम आहे. ती अशी वाटून घ्यायची वस्तू आहे कां? संस्कृतीचं संगोपण, संवर्धन आणि संक्रमण आतापर्यंत या सणवाराच्यामुळंच झालेलं आहे. पण आम्ही सणांचा कुळाचार करून टाकला, व्रतवैकल्यांना अंधश्रद्धा म्हणून घरातून हद्दपार केलं.

आपण घराच्या इमारती करून बसलो. वाड्यांचे बंगले झाले. या बंगल्या-इमारतीतून भुलाबाईंची गाणी का ऐकू येणार आहेत? आजोबांच्या उच्च स्वरातील मंत्रपुष्पांजली का ऐकायला मिळणार आहे? सण, उत्सव, व्रतवैकल्य ही शेकडो शतकांच्या अनुभवानं तयार झालेली आपल्या संस्कृतीची असाधारण अशी निर्मिती आहे. आजच्या गतीमानतेत पारंपारिक पद्धतीनं हे सण, उत्सव, व्रतवैकल्य नाही करता येणार. तसा कुणाचा आग्रहही असण्याचं कारण नाही. पण त्यातली आशयघनता, त्यातलं संस्कार मूल्य लक्षात घेऊन ते नव्या पिढीत रुजवणं, संक्रमित करणं ही घराची जबाबदारी नाही? स्वरूप बदलेलं, पद्धती बदलतील पण घरातून सणवार, व्रतवैकल्य यांनाच घालवून दिलं तर घरांची खंडहर होतील. माणसं हैवानासारखी वागायला लागतील. एकमेकांच्या गळ्याला नख लावायलाही मागंपुढं पाहणार नाही. वृत्तपत्रातून रोज वाचायला मिळणाऱ्या बातम्या त्याचीच चाहूल देणाऱ्या नाहीत का? संस्कृती जपणारा माणूसच सुसंस्कृत माणूस मानला जातो. आपल्या घरातून सुसंस्कृत माणूस, मूल्यांची जपवणूक करणारा माणूस निर्माण व्हावा हीच तर आपल्या सर्वांची इच्छा आहे. त्यामुळं संस्कृती आपण हरवली तर जगाच्या पाठीवर आपल्या सारखे दरिद्री, करंटे दुसरे कुणीही असणार नाही.



# ८. हरवलेली दानत

पूर्वी सकाळ झाली की, 'वासुदेव आला हो वासुदेव आला' ओरडत, घुंगरांच्या काठीच्या तालावर नाचत वासुदेव दाराशी यायचा. आजोबा आवाज द्यायचे 'सूनबाई, वासुदेव आला' आई, गहू, तांदूळ, काही ना काही घेऊन यायची. त्याच्या झोळीत घालायची. श्रीमंत असेल तो सुपानं द्यायचा झोपडीत राहणारा मुठीनं पण देणं हा घराचा स्वभाव होता. वर्षभरात कितीतरी मागणारे दाराशी यायचे. कधी नंदीबैलवाला यायचा, कधी माकडवाला, अस्वलाचा खेळ करणारा यायचा, बहुरुपी यायचे, अभिनयानं गावकऱ्याचं रंजन करायचे. कधी कोल्हाट्याचा खेळ करणारे, कधी जोगवा मागणारे. किती माणसं मागायची. मात्र प्रत्येकाच्या वेळा कालखंड ठरलेला असायचा. या सर्वांना प्रत्येक घर ऐपतीप्रमाणं काही ना काही दिल्याशिवाय राहत नसे. आपल्याजवळ जे आहे ते सर्वांचं आहे. ज्याचा वाटा त्याला दिला पाहिजे. मुंग्यांना साखर, चिमण्यांना दाणे टाकायला सांगावं लागायचं नाही घराला. स्वयंपाक झाला की प्रथम देवाला, गायीला नैवेद्य दाखवला जायचा. देव नैवेद्य - पूर्वीही खात नव्हता आताही खात नाही. हे कां पूर्वीच्या लोकांना माहिती नव्हतं? प्रथम दुसऱ्याला द्यायचं मग आपण ग्रहण करायचं असा विशाल उदात्त विचार आणि संस्कार या कृतीमागे होता. वैश्वदेव करायचा म्हणजे अग्निदेवतेला घास द्यायचा. एखादा अतिथी असेल, भुकेला असेल त्याला भोजन द्यायचं. या सर्व संकल्पनेमागं हेतू एकच 'सहनाभवतु-सहनो भुनक्तु' घराघरातून हा संस्कार सहजपणे मुलांच्या मनात रुजायचा. ग्रहणाच्या दिवशी 'दे दान सुटे गिऱ्हाण' आरोळी ठोकत काही लोक दान मागायला यायचे. थोडं धान्य, जुने कपडे आजी अगोदरच काढून ठेवायची आणि आम्हा मुलांच्या हातानं द्यायला लावायची. घराला आपल्यातलं थोडं दुसऱ्याला द्यायची सवय असल्यानं समाजातील अनेकांना जगणं सोपं व्हायचं. दान मागणारे काही भिकारी नव्हते. गरजवंत होते. गरजवंताला मदत करणं हा माणसाचा धर्म, प्रत्येक घर हा धर्म पाळायचा त्यावेळी. शेजारच्या काकू यायच्या कधी पीठ उसणं मागायच्या. दिलं जायचं. बांगड्या भरणारी यासिन काकू यायची हक्कानं चहा मागायची. मोलकरीन मावशी आजीला सांगायची 'मालक तापानं फणफणले होते. आता बरं आहे पण तोंडाला चव नाही.' आजी काय ती समजायची लिंबाचं वाटीभर लोणचं तिला दिलं जायचं. देणं हा घराचा स्वभाव होता. आजच्या सारखी घरं दरिद्री नव्हती.

आता घरं हा धर्मच विसरली. सकाळच्या वेळी वासुदेव येत नाही. नंदीवाला आशीर्वाद द्यायला दारापुढं उभा राहात नाही. बंदरवाले मदारी आता खेळ करीत मागायला येत नाही. ग्रहणाच्या दिवशी 'दे दान' आरोळी कानावर पडत नाही. भोजन तयार करता करताच जेवणं सुरू केलं जातं तिथं देवाला, गायीला प्रथम द्यायचं असतं याची आठवणही कुणाला येत नाही. दाराशी याचक येत नाही म्हणून देण्याचा संस्कार हरवून जावा कां? आज आपल्या घरात असलेल्या मुलांना आपण त्याला हवं ते देतो. पण दुसऱ्याला दिलं पाहिजे हा संस्कार मात्र देत नाही. लहान मुलांना आज हवं ते मिळतं. मिळालं नाही तर ते घर डोक्यावर घेतात. जे हवं ते येनकेन मार्गानं मिळवतात. 'गरजांचा विस्फोट' असा शब्द हल्ली वापरला जातो. माणसांच्या गरजा, अपेक्षा प्रचंड वाढल्यात त्या पूर्ण करण्यासाठी मग विविध मार्ग शोधले जातात. मला जे हवं आहे ते मिळालंच पाहिजे या वृत्तीतून निर्माण होतो अत्याचार, भ्रष्टाचार, बलात्कार, जबाबदार आपलीच घरं असतात. आपल्यापेक्षा दुसऱ्याची गरज महत्त्वाची म्हणून त्याला प्रथम दिलं पाहिजे हे शिकवलंच जात नाही घरातून. दुसऱ्याला ओरबाडून, हिसकावून घ्यायची वृत्ती म्हणजे विकृती, पशूवृत्ती, राक्षसी वृत्ती, तीच हल्ली वाढत आहे. नका देऊ नंदी बैलवाल्याला, माकडाचे, अस्वलाचे खेळ करणाऱ्याला, नका देऊ 'दे दान' म्हणणाऱ्याला पण एखाद्या अपंगासाठी काम करणाऱ्या संस्थेला, महापूरानं सारे सर्वस्व हरवून बसलेल्याला, भूकंप पिडीताला, अनाथाश्रमाला. वाढदिवसाच्या निमित्तानं जमलेले पैसे देऊं या असा संस्कार मुलांना देता येणार नाही का? हाही फार मोठा विचार झाला. आपल्या मुलांनी गरीब मुलांना आपली पुस्तक द्यावीत. चपलांचे तीन जोड आहेत मुलांना. मोलकरणीचा मुलगा अनवाणी येतो त्याला एक जोड देऊ या, मुलाच्या वाढदिवसाला एखाद्या गरीब मुलाला स्वेटर देऊन आनंद साजरा करू या, असा विचार रुजवता येणार नाही कां आपल्याला? आपणच कुणाला काही देणार नसूं, घराला देण्याची सवय नसेल तर घरात उमलणाऱ्या मनाला तरी लागणार कशी? कर्णाची कथा असो वा राजा हरिश्चंद्राची, चिलिया बाळाची असो अथवा दधिचिची या कथा खऱ्या खोट्या याला महत्त्व नाही महत्त्व आहे त्या कथेतील केंद्रबिंदूला. तो केंद्रबिंदू होता दान, दानत्. दुसऱ्याला, समाजाला, देशाला देण्याची वृत्ती- नव्या काळात नवा विचार देणारी घरं तयार झाली पाहिजे. रक्तदान करुन आपल्याला कर्ण होता येईल, देहदान करुन दधिची होता येईल, नेत्रदान करुन एखाद्याला संजय करता येईल. फक्त घराघरांतून मुलांमध्ये आपल्याजवळ जे आहे ते देण्याचा संस्कार रुजवला पाहिजे. हा विचार त्यांना दिला गेला पाहिजे. हा विचार

विस्तारत गेला की - 'हे मातृभूमी तुजला मन वाहियेले' असं म्हणणारा, आम्ही सात बंधू असतो. तर त्यास सर्वांची आहुती स्वातंत्र्य यज्ञात दिली असती, अशी खंत बाळगणारा विनायक दामोदर सावरकर, स्वातंत्र्यवीर सावरकर तुमच्या आमच्या सामान्य घरातून बाहेर पडू शकतो.



# १. एक चुकलेलं गणित

अमेरिकेत असतानाच माधवरावच्या अमृत महोत्सवाची पत्रिका मिळाली होती. मनात म्हटलं भाग्यवान माणूस आहे. भरल्या घरात राहतो आहे. मुलगा सून दोन नातवंडं यांच्या सहवासात आनंदानं शेवटचे दिवस घालवतो आहे. हेवा वाटला. माझी दोन्ही मुलं डॉक्टर झालीत. हुशारच होती. सुदैवानं दोन्ही सुना डॉक्टरच मिळाल्या. वाटलं यापेक्षा आणखी काय सुख हवं? आपलं आयुष्य कष्टात काढलं. पै पैसा जमवून, गावातला जुना वाडा विकून मुलांना शिकवलं. डॉक्टर केलं. आता लेका सुना सोबत निवांतपणे म्हातारपण जगता येईल. आठवणीतल्या घरासारखं आपलंही घर नातवंडांच्या रडण्या ओरडण्यानं भरेल. त्यांच्या सोबत खेळताना आपलंही बालपण दुडूदुडू धावत येईल. पहाटेची स्वप्नं खरी होतात असा अनेकांचा अनुभव आहे. अनेकांकडून तसं ऐकायला मिळालं आहे. पण संध्याकाळी स्वप्नं पडल्याचं ऐकीवात नाही. ती खरी झाल्याचा कुणाचा अनुभव नाही. मी बघत होतो ती स्वप्नं आयुष्याच्या संध्याकाळची स्वप्न होती. मग त्या स्वप्नांनी आकार कशाला धारण करायचा? सत्यात कशाला येतील ती?

मुलांची लग्न होऊन सहा महिनेही लोटले नाहीत. दोघांनीही सपत्नीक अमेरिकेला जाण्याचा निर्णय घेतला. माझ्या सल्ल्याची त्यांना गरज वाटली नाही. आईच्या भावना लोळागोळा होऊन जाईल याची खंत वाटली नाही. पाखरं उडून जावीत, झाडं ओकी बोकी व्हावीत, तशी उदास मनानं आम्ही एकमेकांच्या तोंडाकडे बघत प्रसन्नपणे जगण्याची धडपड करीत होतो. वर्षातून महिना, पंधरा दिवसांसाठी मुलं भेटायला यायची. आनंदात महिनाही दिवसाएवढा होऊन जायचा. यावेळी मोठ्या सूनेचं बाळंतपण होतं. मुलाचा आग्रह होता आईनं आलं पाहिजे असा. शेवटी मुलगा आला घेऊन गेला आम्हाला. ४ महिने अमेरिकेत मुक्काम होता. बाळंतपण सुखरूप झालं. अमेरिकेतील वातावरणात आमचा जीव गुदमरु लागला होता. आम्हाला ओढ लागली होती आमच्या घराची आणि लेका सुनेला घाई झाली होती आम्हाला परत पाठवायची. आमची उपयुक्तता त्यांच्या दृष्टीनं संपली होती. अमेरिकेत घर कामाला बाई मिळत नाही हे फक्त ऐकलं होतं.

इथं आल्यानंतर आठवण झाली ती माधवची. त्याच्या अमृत महोत्सवाला आपण असायला हवं होतं. बालमित्र म्हणून त्यानं माझी निश्चित वाट पाहिली

असेल. अमेरिकेत जाण्यापूर्वीही त्याची भेट झाली नव्हती. म्हटलं आज जाऊं या. भर दुपारीच त्याच्याकडे निघालो. दारावरची बेल वाजवली. वहिनीनं दार उघडलं. आनंद मावत नसलेल्या चेहऱ्यानं वहिनीनं विचारलं, 'अमेरिकेतून कधी आलात? काय म्हणतात मुलं? नातू कसा आहे? विमान-प्रवासात मजा आली असेल नाही भावजी?' वहिनीनं प्रश्नांचा भडिमार केला. 'छान!' एवढंच उत्तर देऊन मी माधवची चौकशी केली. 'नातवाला आणायला गेले. दोन वाजता शाळा सुटते त्याची. येतीलच एवढ्यात. बसा की निवांत. चहा ठेवते.' एवढं बोलून वहिनी आत गेल्या आणि माधव नातवाला घेऊन आत आला.

मला बघून त्याला केवढं भरुन आलं! ७५ रीच्या आसपासचे आम्ही बालमित्र कडकडून भेटलो एकमेकांना. चहा घेता घेता गप्पा सुरू झाल्या. मी अमेरिकेतल्या गंमती-जमती सांगितल्या. त्यानं अमृतमहोत्सव कसा झाला, कोण कोण आलं होतं ते सांगितलं. 'माधव, खरंच भाग्यवान आहेस तू. लेका सुनेनं एवढा खर्च केला. अरे माझी मुलं तर साता समुद्रापलीकडे आहेत. माझ्या ७५ तरीला इथं यायला त्यांना वेळ मिळेल असं वाटत नाही. इथे आम्ही दोघचं. कंटाळा येतो रे घरी!' मी माझी व्यथा बोलून दाखवली. 'मला कशाला भाग्यवान म्हणून चिडवतोस?' अरे, खरा भाग्यवान तर तू आहेस. स्वतंत्रपणे, मनासारखं जगता येतंच तुम्हाला. आमचं तर स्वातंत्र्यच हिरावून-घेतलंय लेका सुनेनं. जेवण करून निवांत पडतो म्हणावं तर नातवाला शाळेतून आणायची वेळ होते. न जाऊन कसं चालेल सुनेची बोलणी खावी लागतात. प्रत्यक्ष बोलत नसली तरी कुरकुर जास्त बोचरी वाटते. दळण काय मीच आणायचं, भाजी आणायची ती मीच. वीजेचं बील, टेलिफोनचं बिल भरायचं काम माझंच. बाबा. आता होत नाही रे. लेक सून दोघंही नोकरीचे. वेळच नाही म्हणे त्यांना. तुझ्या वहिनीची ओढाताण बघून तर गलबलून जातं. सूनबाईला सकाळी लवकर जावं लागतं म्हणून सकाळचा स्वयंपाक करायचा हीनंच. आणि संध्याकाळी उशिरा घरी येते. थकलेली असते. म्हणूनही स्वयंपाक करायचा हिनंच. घरातली झाडझूड, पसारा आवरणं, कुणी आला गेला बघणं, मोलकरीन आली नाही तर धुणी भांडी करायची तीही हिंनच. नातवाला खाऊ घालणं, सांभाळणं, हट्ट पुरवणं सारं करता करता थकून जाते बिचारी. हल्ली गुडघेही खूप दुखतात तिचे. अरे चार प्रेमाचे, कृतज्ञतेचे शब्द ऐकायला मिळाले तर सारा शीण पळून जातो. पण तेही नाही. घरात आईवडील असल्याची दखलही लेका सुनेच्या वागण्यातून जाणवत नाही. नाही केलं तर टोमणे, चिडचिड. मुला-सुनेच्या दृष्टीनं आम्ही राबणारी गडी माणसं आहोत जणूं. असह्य झालंय सारं. फरफटल्या सारखं आयुष्य जगतोय आम्ही.' माधवची व्यथा बोलती झाली होती. त्याचा कंठ भरून आला होता. दोन मिनिटं वाया गेल्यासारखे आम्ही चिडीचुप्प झालो. माधवनच मौन तोडून विचारलं, 'बाबा, तुझे ते कुळकर्णी मित्र आहेत नं?' 'कोण कुळकर्णी?' मी विचारलं 'वृद्धाश्रम चालवतात ते. त्यांना जरा विचारशील का आम्हाला प्रवेश द्याल का म्हणून? जिथं म्हातारपण आणि शैशव यांचं लालन पालन प्रेमानं होत नाही तिथं राहायचं कशासाठी? ते का घर असतं? आम्ही घरात असूनही बेघर झालो आहे आज.' माधवचे डोळे भरून आले होते. त्याची समजूत घालायलाही मजजवळ शब्द नव्हते. निरोप घेऊन मी निघालो. मनात काहूर उठलं होतं. माधव मुलाबाळाच्या घरात असूनही त्याला वृद्धाश्रमाची ओढ लागली होती आणि आम्ही दोघं आमच्याच घरात असूनही घराला वृद्धाश्रमाची कळा आली होती. बेचैन मनानंच मी आठवणीतल्या घरात शिरलो.....

आमचं कुटुंब एकत्र आणि मोठंही. आजोबा ७०-७५ तरीतले, आजीही साठी उलटलेली. आजीच्या हाताखाली तीन सुना. गरज असली तरी स्त्रिया फारशा नोकरी करीत नव्हत्या आणि सर्व अनुकूल असूनही नोकरी करण्याची फॅशन नव्हती. आजी आजोबाचा दरारा होता पण ती आधारवड वाटायची घराला. आशीर्वादासाठी त्यांचा हात वर गेला, की कसं बरं वाटायचं. घरी कुणी आजी आजोबांचा अवमान केल्याचं आम्ही मुलांनी कधी बघितलं नाही. आजोबा स्नानाला जाणार म्हटलं की धोतर ठेवलं की नाही, गरम पाणी काढून ठेवलंय की नाही, पूजेचं तयार केलंय की नाही सारी काळजी आई, काकू यांना. स्वयंपाकघरात आजी बसायची. सुना स्वयंपाकात गुंतलेल्या. आजीसारख्या सूचना करायची. पण कुणा सुनेला आपला-'इन्सल्ट' झाला, असं वाटायचं नाही. आजी अंगण झाडायला गेली, की मधल्या काकू तिच्या हातून झाडणी काढून घ्यायच्या. म्हणायच्या, 'आई, आहोत नं आम्ही करायला. आतापर्यंत कमी का केलंत. आता आराम करायचं वय आहे. द्या इकडे. झाडते मी.' सुनबाईच्या या दोन शब्दांनी आजीला तरुण झाल्यासारखं वाटायचं. आजोबाचा चहा वेळेवर झाला पाहिजे. त्यांची जेवणाची वेळ सांभाळली पाहिजे. दुपारची विश्रांती नीट झाली पाहिजे. यासाठी सर्वांची धडपड असायची. पण धडपडीमागं धाक नव्हता. होतं निरपेक्ष प्रेम-जिव्हाळा. आजी आजोबा देखील घरी कधी बसून नसत. काही ना काही मदत करायचेच. एखादं दिवशी आजोबा बाबांना म्हणायचे, 'राम, अरे सूनबाई, मुलांना घेऊन जरा चार दिवस जाऊन यावं बाहेर. किती करते बिचारी दिवसभर. एवढ्यात माहेरीही गेली नाही. बरं वाटेल तिला.' आजोबाचं बोलणं दाराआडून ऐकणाऱ्या आईच्या चेहऱ्यावर चांदणं फुलायचं. आजी आजोबा चार दिवसांसाठी बाहेरगावी जाणार म्हटलं की, साऱ्या घराचाच चेहरा कोमेजून जायचा. असं माणसांमाणसांत प्रेम होतं. वडील धाऱ्यांचा घरात आदर, सन्मान होता. आजी आजोबांच्या आयुष्याची संध्याकाळ प्रसन्न राहावी म्हणून

दिवाळीतल्या संध्याकाळसारख्या जो तो आनंदाच्या रांगोळ्या रेखाटायचा.

जुनी घर मोडली नवी उभी झालीत. एका मोठ्या घराची छोटी छोटी घर झालीत. पण पैशापेक्षा माणूस लहान का व्हावा? ज्यांनी जन्म दिला, वाढवलं, जीवनात उभं केलं त्यांना मुलांनी अडगळ म्हणून अडगळीच्या खोलीत का टाकावं? घरासारखी वृद्धाश्रमाची संख्या का फुगावी? विचाराच्या धुंदीतंच घरी पोहोचलो. घरात शिरताना वाटलं माझ्या आजोबांनी जे माझ्या वडिलांना दिलं, माझ्या वडिलांनी जे थोडं फार माझ्या पदरात टाकलं ते संस्कार पाथेय मी माझ्या मुलांना कां देऊ शकलो नाही? आठवणीतल्या घराला नव्या काँक्रीटच्या घरात का आणू शकलो नाही? आयुष्याचं गणितच चुकलं कुठं तरी, मुलांना डॉक्टर करताना, त्यांचं करिअर घडवताना त्यांना माणूस करायला विसरुनच गेलो होतो मी.



# १०. आजी - एक शिक्षण संस्था

'आधारवड' हा शब्द आजीला अगदी चपखल लागू पडणारा आहे. नव्हे आजी या व्यक्तिमत्त्वासाठीच तो तयार झाला असावा असं मला मनापासून वाटतं. हा शब्द जेव्हा जेव्हा माझ्या नजरेस पडतो, वाचायला, ऐकायला मिळतो तेव्हा तेव्हा माझ्या आजीची मूर्ती डोळ्यासमोर उभी राहते. ५०, ६० वर्षापूर्वी घरात आजी ही संस्था अतिशय ताठ मानेनं उभी होती. घरात प्रत्येकाला तिची गरज अपरिहार्य वाटायची. एखाद्या संस्थेला जशी काही ध्येय उद्दिष्टे असतात तशी आजीच्या जगण्यालाही ध्येय-उद्दिष्ट आहे असं वाटायचं. घराचं आरोग्य, घराचं शिक्षण, घराची शिस्त ही सारी खाती आजीच्या अखत्यारीत असायची. 'जनरेशन गॅप' हा शब्द प्रयोग काही आजचा नाही. तो शंभर वर्षांपूर्वी होता. पण आजी-नातू-नातीच्या संवादात तो कुठं अडसर ठरणारा नव्हता. आई-बाबापेक्षाही आम्ही आजीच्या जवळ होतो आणि आजी आम्हाला जवळ वाटायची. आजीच्या कुशीत झोपण्यासाठी आम्हा मुलांमध्ये नेहमी भांडणं व्हायची. अशी नातवांना आजी हवीहवीशी वाटायची. घरातल्या लहान मुलांना-नातवांना-पोटाशी घ्यायचं आणि पाठिशी घालायचं ते आजीनंच. उन्हाळ्याच्या दिवसात अंगणात आजीच्या मांडीवर डोकं ठेवून आकाशातल्या तारका मोजता मोजता आणि आजीच्या गोष्टी ऐकता ऐकता कधी डोळा लागायचा ते कळायचंच नाही. त्याकाळात लैंगिक शिक्षण वगैरे शब्दप्रयोग अस्तित्वात नव्हते पण घरातल्या मुलीला पदर आला की पदर कसा घ्यायचा हे शिकवायचं तेही आजीनंच. त्यामुळं आजी-नातीच्या नात्याची वीण आणखीनंच घट्ट व्हायची. घरातील कुणाचंही चुको आजीला सर्वांवर रागावण्याच घटनादत्त अधिकार होता. पण - घरातील कुणाच्याही मनाला शल्य बोचलं तर मायेची फुंकर घालून ते बोथट करणारं आभाळमनही आजीजवळ होतं. म्हणून आजी साऱ्या घराला सांभाळायची आणि सारं घर आजीला सांभाळून घ्यायचं.

घराच्या आरोग्याची काळजी वाहायची ती आजीनंच. दोन चार दिवस सारखं गोड घरात झालं, की आजी लगेच म्हणायची, 'सूनबाई, तनूला डिकेमाली दे थोडी. किरीम झालाय तिला.' कुणाचं डोकं दुखत असलं, की काय द्यायचं ते विचारायचं आजीलाच. खेळता खेळता पाय मुरगळला, दुखावला की आम्ही रडत घरी यायचं. रात्री आजी आंबीहळद, भारसिंगाचा लेप करायची. हळूवार हातांन पायाला

चोपडायची. सकाळी दुःख कुठल्या कुठं पळून जायचं. माझ्या आजीला कितीतरी रोगांवर औषधं माहिती होती. सर्दी खोकला, लहान मुलांचे अनेक छोटे मोठे आजार यासाठी डॉक्टरांकडे जायचं फारसं काम पडायचं नाही. आजीच्या औषधानंच ते बरे व्हायचे. शेजार पाजाऱ्यांनाही आजीचा आधार वाटायचा. त्यांच्याही घरचं औषधपाणी आजीच करायची. बेलाचा मुरब्बा, आवळ्याचा मुरब्बा, गुलकंद, आल्याचं औषध, हळदीच्या गोळ्या काय काय करून ठेवायची आजी! आजीचा 'बटवा' हा शब्द आजीच्या या घरगुती वैद्यकीमुळंच रूढ झाला असावा. सर्वात आजीचं महत्त्वाचं वैशिष्ट्य असं की कोणत्याही गंभीर प्रसंगात त्यातही-आजारपणात-आजी सर्वांना धीर द्यायची. घरात आजी असली की घरातील बाकी लोक चिंतामुक्त असायचे. घरासाठीच झटायचं, सर्वांच्या सुखासाठी झिजायचं, सर्वांच्या स्वभावाचा ल.सा.वि. काढून, आनंदाच्या मात्रा वाढविण्यासाठी धडपडायचं आणि हे सारं करताना स्वतःचा, स्वतःच्या प्रकृतीचा कधी विचारही आजीला नसायचा. झिजायचं, हेच तिचं जीवनध्येय. आजी ही व्यक्तिरेखा घराचा तोल, घराचा सूर, घराचा ताल सांभाळून घेण्यासाठी, घर ही संस्था सुचारु रुपानं चालण्यासाठी असावी असं मला तिचा जीवनक्रम बघितल्यानंतर वाटायचं. एकत्र आणि मोठ्या कुटुंबात तर आजी-मुलांच्या मनाचा विकास करणारी. घरातल्या सर्व घटकात समन्वय साधणारी, शिस्त आणि संस्कार यांचा मेळ घालून सर्वांनाच प्रकाशवाट दाखविणारी, आणि मोबदल्यात झीजनं स्वतःकडे ठेवणारी एक संस्था होती. आज आमच्या नव्या व्यवस्थेत ही संस्था निकामी आणि हद्दपार करण्याचा समजून उमजून प्रयत्न केला जात आहे. काय साधणार आहोत आपण यातून?

परवा माझा सल्ला घेण्यासाठी एक कुटुंब माझ्याकडे आलं. पती-पत्नी आणि चार वर्षांचा त्यांचा मुलगा विसू. ते घरात येताच माझ्या ४, ४।। वर्षांच्या नातीनं लगेच त्या विसुशी संवाद साधला. एका सेकंदात त्यांची मैत्री झाली आणि ती दोघं अंगणात बॉल खेळण्यात रंगून गेली. 'बोला कसं काय येणं केलंत?' माझा प्रश्न. 'सर, तुम्ही मुलांसाठी, पालकांसाठी काम करता असं कळलं म्हणून थोडं आपलं मार्गदर्शन घ्यावं म्हणून आलो होतो. मी सौ. दिप्ती आणि हे विसूचे बाबा दिनेश. एका दमात विसूच्या आईनं, परिचय व येण्याचं प्रयोजन सांगून टाकलं. 'प्राब्लेम काय आहे?' माझा प्रश्न, विसूच्या आईनं जी समस्या मांडली, ती मांडतानाही तिचं अस्वस्थपण तिच्या ओलसर झालेल्या डोळ्यातून जाणवत होतं. दीप्ती शाळेत शिक्षिका आहे. तिला शाळा दूर असल्यानं सकाळी सर्वांचा डबा करुन ६.३० ला घराबाहेर पडावंच लागतं. दिनेश कलेक्टर ऑफिसला. त्यांची वेळ सकाळी १०-३० ची. घरी कामाला बाई आहे. ती सकाळी ७ ला येते. ९ वा. पर्यंत ती जाते. दिनेशलाच मुलाचं समळं करावं लागतं. ऑफिसला जाताना तो विसूला कॉन्व्हेन्टमध्ये सोडतो. दीप्ती घरी येते. दु. २ वा, आणि विसूचीही शाळेतून घरी येण्याची नेमकी वेळ हीच. विसू घरी आला की दीप्ती जवळ सारा हट्ट करतो रडतो, तिचे केस ओढतो. कडेवर घे म्हणतो. खेळ म्हणतो. आत्ताच्या आत्ता एखादी गोष्ट हवी म्हणून घर डोक्यावर घेतो. दीप्ती थकून आली असते. तिला हे असह्य होतं. कधी कधी, त्यामुळं मार देते त्याला ती. पण त्यात काही बदल होत नाही. वडलांना मात्र तो त्रास देत नाही असं तिचं म्हणणं. तास दोन तासानं मात्र तो नॉर्मल होतो. हाही त्यांचा अनुभव अशा परिस्थितीत विसुचा हट्टपणा कमी व्हावा म्हणून काय करायचं हा त्यांचा प्रश्न होता.

हा प्रश्न केवळ दीप्ती-दिनेश कुटुंबाचा नाही. हा प्रश्न दोघेही नोकरीला असणाऱ्या आणि घरी एकच विसू असणाऱ्या अनेक कुटुंबाचा आहे. लहान मुलांना सकाळी आईनं हळूवारं उठवावं. उठता क्षणी त्याला आई दिसावी. आईनं स्नान करुन द्यावं, भरवावं, शाळेत जाताना हात दाखवावा अशी एक स्वाभाविक मानसिकता मुलांची असते. आईचा अधिकाधिक सहवास त्याला हवा असतो. विसूला तोच नेमका मिळत नाही. वडील त्याचं सर्व करत असले तरी प्रत्येक बापाला आई होता येईल असं नाही. अनेक घरात मुलांना सांभाळायला एखादी बाई ठेवलेली असते. ती मुलांचं सर्व करीत असली, लक्ष देत असली तरी आईची माया ती देऊ शकत नाही. उलट अनेक घरातल्या मुलांवर या सांभाळणाऱ्या बाईचे संस्कार झाल्यानं वेगळेच प्रश्न निर्माण झाल्याची अनेक उदाहरणं बघायला मिळतात. विसूला सकाळी उठल्यापासून तो शाळेतून घरी येईपर्यंत आई दिसत नाही. तिचा सहवास लाभत नाही, मिळालेला नाही. त्याचा राग म्हणून आई आल्यानंतर तो असा वागत असावा असा अंदाज मी केला. आईला जरी नोकरीवर जावं लागणार असलं तरी घरात मावशी, आजी, काकू असं कुणी प्रेमानं करणारं माणूस असेल तर विसूचा हट्टपणा कमी होऊ शकतो. असं मला वाटलं. 'दीप्तीताई, विसूला आजी आजोबा आहेत?' माझा प्रश्न. 'हो आहेत. पण ते गावाला असतात.' 'काही दिवस आजीला बोलावून घेता आलं तर बघा. आजी घरी असतील तर विसूचा आणि त्यांचा संवाद नीट साधेल आणि त्या त्याला प्रेमानं सांभाळतीलही.' मी त्यांना सुचवलं. यावर दीप्ती आणि दिनेश यांनी क्षणभर एकमेकांकडे बघितलं. उत्तर देणं काही त्यांना सुचलं नाही. 'काही अडचण आहे कां? ते येऊ शकणार नाहीत कां?' मीच त्यांना उलट विचारलं.'त्याचं काय आहे सर....' अडखळत दीप्ती सांगू लागली. 'आमच्या सासूबाई फार जुन्या वळणाच्या आणि विचाराच्या आहेत. त्यांना ॲडजेस्ट करणं फार कठीण जातं.'... दीप्तीचं उत्तर ऐकून मलाच काय सांगावं सूचत नव्हतं.

आठवणीतल्या घरात प्रत्येकजण एकमेकांच्या सुखासाठी स्वतःला ॲडजेस्ट करुन घेत होता. ॲडजेस्टमेंट याचंच दुसरं नाव जीवन हे घरातंच शिकायला मिळतं होतं. म्हणूनच घराला समाजशाळा म्हटलं जायचं. आज नव्या घरात दोघांच्या संसारात तिसरं कुणी मोठं माणूस नकोस व्हावं. आई-बाबा हे अडगळी सारखे वाटायला लागावेत हा आमचा सांस्कृतिक विकास की अधःपतन! आजी जुन्या वळणाच्या, जुन्या विचाराच्या असू शकतात पण सगळीच जुनी वळण आणि जुना विचार नव्या काळात टाकाऊ आहेत असं कुणी सांगितलं? एक वेळ गृहित धरू या की आजीचे विचार जुने असतील, म्हणून का त्यांना घराबाहेर घालवायचं? आम्हाला घरात आजीसाठी, आई वडीलांसाठी स्वतःच्या वागण्याला मुरड घालता येत नसेल, ॲडजेस्टमेंट करता येत नसेल, तर समाजात वागताना आम्हाला कशी करता येईल ॲडजेस्टमेंट? आज आम्ही आजीसाठी आमच्या घरातली दारं बंद केली तर उद्या आमची मुलं आमच्यासाठी दार बंद करणार नाहीत कशावरुन? कारण आपण जेव्हा आजोबा आजीच्या भूमिकेत जाऊ त्यावेळी समाज किती तरी पुढं गेला असेल आणि त्यावेळी आमची वळणं, आमचे विचारही जुनेच झाले असतील. शेवटी घरातील वडील माणसंच अनेक वळणावर आपल्याला सांभाळत असतात. वळणही लावत असतात. म्हणून आजी ही संस्था जर आम्ही मोडीत काढली तर ती फार मोठी सामाजिक, शैक्षणिक आणि सांस्कृतिक हानी ठरणार आहे. याचं भान आम्हाला यायला हवं की नको!



# ११. एक होतं - आटपाट नगर

भाऊराव जाऊन आता ७, ८ वर्षे तरी झाली असतील. या काळात त्यांच्याकडे तसं जाणं येणंही झालं नव्हतं फारसं. कधी रस्त्यानं जाता येताना मुलं भेटायची. आज अचानक त्यांचा मोठा मुलगा घरी आला. बँकेत चांगल्या हुद्यावर आहे. त्याला बघून भाऊरावांची आठवण पुन्हा ताजी झाली. भाऊचं आणि माझं घर अगदी शेजारी. आम्ही दोघंही एकाच वर्गात. शाळेत हुशार मुलं अशीच आमची ओळख. लग्नकार्यात पंक्ती मांडल्यात की श्लोक म्हणण्यात भाऊ आणि मी आघाडीवर असायचे. शाळेत अंताक्षरी स्पर्धात भाऊ आणि माझ्यातच खरी स्पर्धा असायची. वामनपंडित, रघुनाथपंडित, मोरोपंत, मुक्तेश्वर, मनाचे श्लोक, आर्या असं खूप काही आम्हाला पाठ होतं. घरी आणि शाळेत असं पाठांतर करून घेण्यावर भर होता. पुढे नोकरीच्या निमित्तानं शहरात आलो. ५० वर्षांच्या वास्तव्यात गावं सुटलं. जुनं घर आठवणीच्या धुक्यात अस्पष्ट होत गेलं. पण आमची मैत्री कायम होती. पहिल्या दोन महिन्यांत त्याची किंवा माझी चक्कर व्हायची. आता इतिहास झाला तो....

'कसा काय आलास प्रकाश? ये ना आतं. घरी, मीनाकडे सारे ठीक आहेत ना?' मी चौकशी केली. प्रकाशनं 'सारं काही मजेत' असल्याचं सांगून नमस्कार केला आणि हातात निमंत्रण पत्रिका दिली. म्हणाला, 'काका, नवीन घर बांधलंय. वास्तुपूजा घरगुती पद्धतीनं करुन घेतलीय. राहायलाही गेलो आहे. आज स्वागत समारंभ ठेवलाय. आपण यावं आशीर्वाद द्यायला म्हणून निमंत्रण द्यायला आलोय'. अवश्य येईन असं आश्वासन दिलं आणि संध्याकाळी त्याच्याकडे गेलो.

स्वागत समारंभाला गर्दी असूनही प्रकाश-सुलभानं माझं अगत्यानं स्वागत केलं. 'चला काका प्रथम घर दाखवतो' असं म्हणून मला प्रकाशनं आत नेऊन घर दाखवायला सुरुवात केली- 'हा हॉल. पुरेसा मोठा केलाय. हे निसर्ग चित्र खास सुलभाच्या आवडीचं. ही झुमरं मात्र माझ्या आवडीची. दिल्लीच्या प्रदर्शनात मला ती मिळाली. हे किचन. ही दोन बेडरूम' असं सारं घर फिरवून पुन्हा मी दिवाणखान्यात येऊन बसलो. आर्किटेक्ट कोण, अडचणी कशा आणि किती आल्यात? या काही व्यवस्था मी मुद्दाम कशा करुन घेतल्या अशी घर बघतांना प्रकाशची कॉमेन्ट्रीसारखी सुरू होती. सोफ्यावर बसलो. टेबलावर दोन तीन मासिक होती.

कॉमिक्स. मुलांसाठी. एवढ्यात सुलभा प्लेट घेऊन आली. सोबत त्यांचा ५-६ वर्षांचा निनाद होता. सुलभानं त्याला माझा परिचय करून दिला. 'हे अंकल आबा. तुझ्या डॅडींचे काका. 'नमस्कार कर' माझा परिचय ऐकून मलाच हसायला आलं. 'इथल्या कॉन्व्हेंटमध्ये जातो. हुशार आहे. 'निनाद, आबाला कविता म्हणून दाखव बरं.' सुलभाचं मुलाविषयीचं कौतुक उतू जाताना दिसत होतं. कुठलीशी इंग्रजी कविता त्यानं म्हणायला सुरुवात केली. 'छान छान' म्हणत मी त्याचं कौतुक केलं.

मोरोपंताच्या आर्या, रघुनाथपंडित, वामनपंडित यांचे श्लोक, गीतेचे अध्याय मुखोद्‌गत असणाऱ्या भाऊरावच्या नातवाच्या तोंडून 'मेरी मेरी' ही कुठलीशी इंग्रजी कविता ऐकताना मात्र मला मळमळल्यासारखं होत होतं. दिवाणखान्यातल्या शो केस कडे माझं लक्ष गेलं. काही बाहुल्या, दोन खेळातील विमानं, सांताक्लाजची प्रतिमा, काही पदकं आणि त्यातच विवेकानंदांचा एक उभा पुतळा. चटकण मी नजर बाजूला केली. मला आठवण झाली मीनाची. कुठं दिसली नाही ती. तेवढ्यात जवळून जाणाऱ्या प्रकाशजवळ चौकशी केली. 'आहे. असेल कुठं तरी' असं प्रकाशनं सांगितलं आणि तो गेला. एवढ्यात मीनाच आली. नमस्कार करुन जवळ बसली. माझ्या भेटीनं तिला खूप बरं वाटलेलं दिसलं. मीना भाऊरावची सर्वात वडील मुलगी. लग्न होऊन चार वर्षे झाली. अचानक नवऱ्याचा अपघाती मृत्यू झाला. अत्यंत तरुण वयात मुलीवर झालेल्या आघातनं भाऊही खचून गेला होता. नवऱ्याच्या जागेवर मीनाला नोकरी मिळाली. एकुलत्या एका मुलीला घेऊन ती राहत होती. स्वतःच्या पायावर उभी होती. 'कसं चाललंय तुझं? छोकरी काय म्हणते?' मी चौकशी केली 'काका, तुमच्या आशीर्वादानं चालू आहे व्यवस्थित' मीना सांगू लागली. जवळपास कुणी नाही याचा अंदाज घेऊन हलक्या आवाजात म्हणाली, 'काका, तुम्ही आम्हाला भाऊ सारखेच आहात. हल्ली दादा वहिनी घरी येत नाही, बोलत नाहीं, माझं काय चुकलं हेही कधी सांगत नाही. तुम्ही दादाशी बोलाल.....' हे सांगताना कुठंतरी मीनाच्या डोळ्याच्या पापण्या ओल्यावल्याचं जाणवलं. माझं जेवणं आटोपलं आणि मी जायला निघालो. प्रकाश म्हणाला, 'काका, कसं वाटलं घर?'

प्रकाशच्या नव्या घरातून बाहेर पडलो खरा पण मनानं प्रवेश केला आठवणीतल्या वास्तूत. आमच्या जुन्या घरात समोरची लांब पडवी म्हणजे दिवाणखाना. 'इंटरियर डेकोरेशन' असे शब्द कुणाच्या ऐकिवात नव्हते. पडवीत कपाटं होती. काही पाट्याही ठोकलेल्या होत्या. कपाटात कापडात बांधलेल्या जुन्या पोथ्या, ज्ञानेश्वरी, दासबोध, गाथा, पांडव प्रताप, हरिविजय, शिवलीलामृत, भगवत गीता अशा धार्मिक ग्रंथानं कपाटं गच्च भरलेली असायची. आजोबा सांगायचे, 'प्रभाकर, आलमारी उघडून जरा ज्ञानेश्वरी आण बरं' आजोबांना पोथी आणून देताना, रामदासांचा दासबोध, तुकोबांची गाथा, ज्ञानेश्वरांचा अमृतानुभव अशा संतचरित्रांशी, वाङ्मयांशी आमचा परिचय व्हायचा. साऱ्या महाराष्ट्राचं संचित या कपाटात भरलेलं आहे. त्याचा स्पर्शही सुखावून जायचा. दिवाणखान्यात भारतीय बैठक. बैठकीच्या वर फोटोची एक रांग असायची. प्रत्येक फोटोखाली नाव, जन्म, मृत्यूची तारीख लिहिलेली असायची. कधी आम्ही मुलं आजोबांना विचारायचे 'आजोबा, हा कुणाचा फोटो?' आजोबा मग एकदम भूतकाळात जायचे आणि पहिल्या फोटोपासून पूर्वजांचा इतिहास सांगायला सुरूवात करायचे. 'काय नाव लिहिलं आहे? परशुरामपंत हे माझे पणजोबा. निजामाच्या काळात कुळकर्णी म्हणून इथं आले. हे घर त्यांनीच बांधलं. हे गोपाळराव. माझे आजोबा. हा फोटो माझ्या वडिलांचा चिंतामणराव. तुझे पणजोबा. हे माझे काका बरं का! निळकंठराव. जंगल सत्याग्रहात भाग घेतला होता त्यांनी. पकडल्या गेले. इंग्रजांनी तुरुंगात टाकलं होतं त्यांना. स्वातंत्र्याच्या हव्यासानं घरातून बाहेर पडले ते घरी परतलेच नाही. भूतकाळात रंगून जायची आजोबांची ती वृत्ती खूप आवडायची. पूर्वजांचा, घराण्याचा इतिहास कळायचा. फोटोतील वेषभूषा बघून वेषभूषेतही झालेला बदल लक्षात यायचा. आतासारखी कॉमिक्ससारखी पुस्तक आमच्या घरात आम्हाला कुणी आणून दिली नव्हती. अशी नावही अपरिचित होती. घरी कुणी पाहुणे आले की विचारायचे, 'काय रे, रामरक्षा येते की नाही? गीतेचा कुठला अध्याय पाठ येतोय? मोरोपंताच्या आर्या आहेत का पाठ?', मग आम्ही मुलं खाडखाड रामरक्षा, गीतेचा अध्याय म्हणवून दाखवीत शाबासकी मिळायची. मुलांसाठी म्हणून घरी काही पुस्तक घेतली जायची असं नाही. आजी-आजोबा हीच आमच्यासाठी सर्वात मोठी पुस्तकं होती. त्यांच्याकडून जे ऐकायला मिळायंच तेच क्षितिजापल्याडचं होतं. आजोबा-आजी कडून ऐकायला मिळणाऱ्या असंख्य कथा जीवन समृद्ध करायला पुरेशा वाटायच्या.

कथाही मोठ्या मजेदार. आटपाटनगर या एकाच गावात घडणाऱ्या. पौष महिन्यातील रविवार आला, की आजी हमखास गोष्ट सांगायची. बोराच्या आशेनं आम्हीही ऐकायला बसायचं. रविवारची कथा असो, शुक्रवारच्या देवीच्या कथा असो की सणाच्या संदर्भातल्या, सर्व कथा आटपाट नगरातच घडलेल्या. आजी सांगायच्या पूर्वी आम्हीच सुरवात करीत असूं- 'एक आटपाट नगर होतं.' आजीनं सांगितलेल्या या आटपाट नगरातील कथांत- श्रीमंत भाऊ असायचा, गरीब बहिण असायची. म्हातारीला फसवणारा सावकार असायचा. लोभी माणसं असायची पण या

सर्व कथांचा शेवट मात्र एक चिरंतन असा विचार मनांत पेरणारा असायचा. या आटपाट नगरानं जीवनात उतू नये, मातू नये शिकवलं, सत्याच्या वाटेनं जाणाऱ्याला खूप काही सोसावं भोगावं लागतं हे सांगितलं. सोसण्याचं बळ दिलं. पश्चाताप वाटावा वाईट कृत्य केल्याचा ही वृत्ती दिली. सत्याचाच शेवटी विजय होतो हे बिंबवलं. आटपाट नगरातील ह्या कथा नेमक्या कुणी लिहिल्या, त्या श्रध्दावान करणाऱ्या आहेत की अंधश्रद्धा वाढवणाऱ्या आहेत? असे प्रश्न आमच्या मनात कधी आले नाही. पण माणूस घडणींत या आटपाट नगरातील कथांचं फार मोठं योगदान होतं हे अमान्य करून चालणार नाही.

आता काळ बदलला आटपाट नगराची महानगरं झाली. महानगरातील बकालपणा आमच्या घरात, जीवनात आला. घरातल्या लहान मुलांनी काय ऐकावं, काय बघावं आणि काय पाठ करावं याला शिस्त राहिलेली नाही. मुलांना ज्ञानेश्वर, तुकोबा माहिती नाही याची खंत घराला उरलेली नाही. मुलांच्या हाती काय दिलं पाहिजे याचं भान घराला नाही. उबग यावी असा बकालपणा आणि त्यातून निर्माण झालेला बेदरकारपणा माणसाला कुठं घेऊन जाणार....

घरून बाहेर पडताना प्रकाशने मला विचारलं होतं 'काका, कसं वाटलं घरं?' गर्दीत बोलता आलं नाही. पण आता सांगतो, दिवाणखान्यातील शोकेसमध्ये एखादी ज्ञानेश्वरी, तुकोबाची गाथा दिसली असती तर बरं वाटलं असतं, रंगरंगोटी केलेल्या दिवाणखान्याच्या भिंतीवर भाऊरावचा फोटो बघायला मिळाला असता तर आनंद झाला असता. निनादनं मेरी मेरी या इंग्रजी कवितेऐवजी एखादी पंताची आर्या म्हणून दाखवली असती तर अभिमान वाटला असता. मीनाच्या डोळ्यात 'दादा पाठीशी आहे' हा भाव बघायला मिळाला असता तर समाधान वाटलं असतं. आणि तुम्हा उभयतांच्या चेहऱ्यावर 'उतलो नाही मातलो नाही, भाऊनं दिलेला वसा टाकला नाही' हे वाचायला मिळालं असतं तर खूप खूप..... जाऊ दे... प्रकाश, घर छान आहे.'



# १२. घर : नितिमत्तेची शाळा

फ्रॉईड या मानसशास्त्रज्ञानं 'काम' (सेक्स) य प्रवृत्तीला, भावनेला मानवी जीवनात असाधारण असं महत्त्व देऊन आपल्या संशोधनाची दिशा ठरवली. त्याच दृष्टीनं त्यानं मनाचा अभ्यास केला. पण आपल्या संस्कृतीनं मात्र 'काम' या प्रवृत्तीला मर्यादेत बांधून सामाजिक आरोग्याचा महत्त्वाचा विचार केला आहे. धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे जीवनातील चार पुरुषार्थ. हे पुरुषार्थ साधून शाश्वत अशा आनंदाची प्राप्ती करून घेणं हेच जीवनांचं अंतिम लक्ष्य आपल्या संस्कृतीनं आपल्या समोर ठेवलेलं आहे. धर्म आणि मोक्ष या दोन पुरुषार्थाच्या सीमारेषेतच राहून माणसांनी अर्थ म्हणजे पैसा मिळवला पाहिजे आणि काम शमवला पाहिजे. तरच त्याला निर्भेळ, शाश्वत अशा आनंदाची प्राप्ती होईल. धर्म म्हणजे नीती नियमाचा प्रभाव समाजमनावर असल्यामुळं वाईट मार्गानं मिळवलेला पैसा समाजमान्य नव्हता. 'वेचुनिया धन उत्तम व्यवहारे।' श्रम करुन प्रामाणिकपणे तो मिळविला पाहिजे, अशी समाजधारणा होती. मिळेल त्यात समाधान मानण्याची वृत्ती होती. धर्माची भिती असल्यामुळं आजच्या इतका भोगवाद बोकाळलेला नव्हता. समाजाचं आरोग्य धोक्यात आलं नव्हतं.

पण आज काय दिसतं? धर्माला थोतांड ठरवणाऱ्या विचारानं डोकं वर काढलं आहे. नैतिकतेची कुंपण खिळखिळी झाल्यामुळं वासना अनिर्बंध होऊ लागली आहे. 'अर्थ' हेच जीवनाचं अंतिम ध्येय ठरवून माणूस त्यामागं धावू लागला. विज्ञानानं उपलब्ध करून दिलेल्या अनेक साधनामुळं चंगळवाद वाढला. विवाहबाह्य संबंध, समलिंगी विवाह अशा नव्या विचारांचा प्रभाव आणि प्रसार आमच्या देशातही दिसू लागला. अशा घटनाचं प्रमाण अत्यल्प असलं तरी अत्यंत चिंतनीय आहे. चार्वाकाचं तत्वज्ञान आपल्याही देशानं स्विकारलं. त्यांना ऋषींचा सन्मान दिला पण समाज स्वास्थ्यासाठी ते किती मर्यादेपर्यंत अमलात आणायचं याचा विवेक बाळगला गेला. पण आज हा विवेक हरवल्याचा अनुभव देणाऱ्या घटना रोज बघायला, ऐकायला मिळत आहे. वासनेला उद्दीपीत करणारी साधनं, स्त्री देहाचं प्रदर्शन करणारे चित्रपट व दूरदर्शनवरील कार्यक्रम नव्या तरुण पिढीला कामपिसाट बनविण्याचा पद्धतशीर प्रयत्न करीत आहे. या साऱ्याचा परिणाम आमच्या कुटुंब व्यवस्थेलाच तडा जाण्यात, घर या संकल्पनेलाच उद्ध्वस्त

करण्यात होतो आहे. याचा विचार आपण करणार आहोत की नाही?

माणसाचं पहिलं घर कधी, कसं निर्माण झालं असावं? इतिहासकार सांगतात की थंडी, वारा, ऊन, पाऊस यापासून संरक्षण हवं म्हणून माणसानं घर निर्माण केलं असावं. काही म्हणतात, की पक्षांची घरटी बघून माणसाला घराची कल्पना सुचली असावी. मी या मताशी सहमत नाही. कारण निवाऱ्यासाठी माणसानं घर केलं असेल यावर माझा विश्वास नाही. पशू-पक्ष्यात आणि माणसात आहार, निद्रा, भय, मैथुन या भावना सारख्याचं विद्यमान आहे. माणूसही अश्मयुगीन काळात पशू-पक्ष्यासारखाच जगत होता. नग्नावस्थेत वावरत होता. पशू-पक्ष्याप्रमाणे त्यांच्यातही समागमाची क्रिया चालत होती. पण माणूस हा बुद्धिमान प्राणी आहे म्हणून ज्याक्षणी त्याला समागम, कामक्रीडा, मैथुन ही पशू-पक्ष्याप्रमाणे चव्हाट्यावर करण्याची गोष्ट नाही याची जाणीव झाली. त्याबद्दल स्त्री-पुरुषाच्या मनात ज्या क्षणी लज्जाभाव निर्माण झाला. त्याक्षणी घर नावाची एक संस्कृती निर्माण झाली असं मला प्रामाणिकपणे वाटतं. घर ही संस्था तयार झाल्यानंतर समाजधारणेसाठी अनेक नीती नियम तयार झाले. विवाहासारख्या संस्कारांनी घरं आणखी मजबूत झाली. स्त्रियांनी कसं वागावं, पुरुषांनी कसं वागावं असे वर्तनाचेही नियम समाजानं तयार केले. समाज विकसित होत गेला, संस्कृती विकसित होत गेली. एक प्राचिन संस्कृती म्हणून, आणि श्रेष्ठ संस्कृती म्हणून भारतीय संस्कृतीचा जगानंही गौरव केला. पण या संस्कृतीचा मूळ आधार होता घर. घरानंच सातत्यानं संस्कृती टिकवून ठेवली होती.

मी आठवणीतल्या घराचा विचार करतो तेव्हा वाटतं ती घरं खूपच शिस्तीची होती. घरातल्या साऱ्याच स्त्रिया नऊवारीत दिसायच्या, पुरुषासमोरून जाताना तीनं पदर डोक्यावरून घेतला पाहिजे. तिचा पदर ढळलेला दिसता कामा नये, असे काही आज जाचक वाटणारे नियम त्या काळात घरात होते. आजच्या इतका तरुण मुला-मुलींच्या वागण्यातील सैलपणा त्यावेळी चुकूनही दृष्टीस पडत नव्हता. परस्त्री मातेसमान आहे, मानलं पाहिजे हा संस्कार मुलांमध्ये विविध कथांतून रुजवण्याचा घराचा प्रयत्न असायचा. आम्हा मुलांना गावात आलेल्या तमाशाला जायची परवानगी नसायची आणि तमाशाला जाणाऱ्या माणसांना समाज प्रतिष्ठा देत नव्हता. स्त्रियांची वेशभूषा माणसातील वासनेला आवाहन करणारी नसावी तर सात्विक सौंदर्याचं स्वागत करणारी वृत्ती माणसात निर्माण होईल, अशी असावी असा घराचा आग्रह असायचा. राजा रवी वर्माची चित्रं ही आजही जिवंत वाटतात आणि एक वेगळा संदेश देणारी वाटतात. कारण त्यांनी आपल्या चित्रातून रेखाटलेली स्त्री व तिची वेषभूषा याचा खूप विचार केलेला असावा. राजा रवी वर्मा हा दक्षिणेतील पण त्यानं चित्रीत केलेली स्त्री नऊवारी नेसलेली, डोक्यावरून पदर घेतलेली अस्सल मराठमोळी. बघताक्षणीच सात्विक भाव निर्माण व्हावा. कलेतही नैतिकता जपल्या जायची. नाटकं असो चित्रपट असो त्यातले विषय, समाजाला काही देण्यासाठी असायचे. त्यातही शृंगार होता पण आजच्या इतकं बीभत्स आणि भडक रूप त्यावेळीं नव्हतं. समाजाची अभिरुची आजच्यापेक्षा नक्कीच दर्जेदार होती.

५० वर्षांपूर्वीच्या समाजजीवनात अनेक दोष होते. अंधश्रद्धा होत्या, स्त्रियांना स्वातंत्र्य आजच्या इतकं नसेल. जातिभेद होते. हुंडा पद्धती होती. ज्या ज्या सामाजिक अडसरांचा म्हणून आम्ही विचार करतो ते सारे दोष समाजात होते असं गृहीत धरू या. आज ते सारे दूर झाले आहेत असं छातीठोकपणे कुणीही म्हणू शकणार नाही. पण एक गोष्ट मात्र प्रकर्षानं जाणवते, की अनेक दोष असूनही आजच्या इतकं नीतिमूल्यांचं अवंमूल्यन त्यावेळी झालेलं नव्हतं. भ्रष्टाचार, बलात्कार, खून, दरोडा करणाऱ्या माणसांना समाजानं कधी डोक्यावर घेतलेलं नव्हतं. त्यांना प्रतिष्ठाही समाजानं दिलेली नव्हती.

आज आपण २१ व्या शतकात वाटचाल करतो आहे. विज्ञान तंत्रविज्ञान, प्रसार, प्रचार माध्यमांनी समाजजीवनात क्रांती घडवून आणली आहे. अनेक जुन्या पुराण्या कल्पनांना आम्ही हद्दपारही केलं आहे. स्त्रियांना सर्व प्रकारचं स्वातंत्र्य बहाल केलं गेलं आहे. सर्व जग नको तितकं जवळ आलं आहे. आजची पिढी अत्यंत हुशार आणि नवी नवी क्षेत्र काबीज करणारी म्हणून पुढे येत आहे. इतक्या चांगल्या गोष्टी घडल्या आहे, देश पन्नास वर्षांत कुठल्या कुठं पोहोचला आहे. परमाणूस्फोट करून जगातील समर्थ देशाच्या रांगेत आपण उभे झालो आहे. पण या झगमगाटात जीवनाची शाश्वत मूल्ये पायदळी तुडवली जात आहे. त्याचं भान मात्र आज उरलेलं नाही. 'नराचा नारायण होणं' हा आमच्या विकासाचा पूर्वी मापदंड होता. 'नर करणी करे तो नरका नारायण होय' असं शिकवलं, सांगितलं जात होतं. पण आज 'नरेचि केला हीन किती नर' असं दृष्य बघायला मिळतं आहे. 'नराचा हैवान होण्याकडेच माणसाची वाटचाल चाललेली दिसते आहे. ज्या कामवासनेला धर्म आणि मोक्ष या सीमेत ठेवलं पाहिजे म्हणून आपल संस्कृतीनं शिकवलं. ती वासना अधिक उफाळून कशी येईल याचेचं प्रयत्न आज पद्धतशीरपणे केले जात असल्याचा अनुभव येतो आहे. रस्त्यारस्त्यावर लावलेल्या जाहितीराचे फलक असो, की दूरदर्शनवरील विविध चॅनेल्सवरुन दाखविले जाणारे कार्यक्रम, जाहिराती असो स्त्री देहाच्या मुक्त प्रदर्शनाशिवाय त्याची जणू पूर्तताच होत नाही. खून, बलात्कार, अत्याचार, लाचलुचपत हेच विषय जणू महत्त्वाचे. त्यामुळं दूरदर्शन असो, की वृत्तपत्रे असो याच विषयाला प्राधान्य. या सर्व गोष्टींचे घरातल्या लहान

मुलावर, विकसित होणाऱ्या मुलांवर काय परिणाम होतील याचा गांभीर्यानं विचार करायला नेते आणि समाजसुधारकाला तरी वेळ आहे कुठं? त्यांच्याच विश्वासार्हतेवर प्रश्नचिन्ह लागलंय आज!

उद्याला हे संपवायचं असेल तर अध्यात्म आणि विज्ञान याचा जीवनात समन्वय साधणारी पुरुषोत्तमांची पिढी तयार व्हायला पाहिजे. त्यासाठी पुरुषार्थ शिकवणारी, सुसंस्कृत माणूस घडवणारी संस्कार शाळा 'घराच्या' रूपानं पुनश्च सक्षम झाली पाहिजे. सर्वत्रच अंधार आहे म्हणून निराश होऊन चालणार नाही. आठवणीतल्या घरानी खूप काही दिलं आहे आपल्याला. तेव्हा आपल्या जवळ असलेल्या पणतीच्या प्रकाशात आपण किमान एक पाऊल पुढे टाकण्याचा प्रयत्न करू या!



# १३. एक नवं घर बांधू या!

६०, ७० वर्षांपूर्वीच्या माझ्या आठवणीतल्या घरात मी जेव्हा मनानं प्रवेश करतो तेव्हा माझंच मला हसू येतं. हजार घराच्या गावातलं आमचं एक कौलारू घर पण घर कुणीही सांगेल अशा प्रसिद्धीच्या झोतातलं. त्याला कारणही होतं. आजोबा गावातले भिक्षूक . त्यांच्या सोबत मधले काकाही भिक्षुकी करायचे. घराचा वास्तु असो, मुलाचं बारसं असो, लग्न कार्य असो, कुणी नवीन जीव जन्माला आला असो वा कुणी मृत झाला असो मुहूर्त किंवा दिवस शुभ की अशुभ! विचारण्यासाठी गावाची पावलं पडायची ती आमच्या घराच्या दिशेनं! शिवाय पूजापाठ आहे. कथा, पोथी पुराणं यांचं आमंत्रण देण्यासाठी कुणीना कुणी यायचं रोज. गावात 'सदू बोवा' या नावानं आजोबा ओळखले जायचे. गावात फार मान होता आजोबांना. रस्त्यात एखाद्या अनोळखी माणसाला नाव सांगितलं, की 'सदूबोवाचा नातू का रे तू?' असा प्रश्न हमखास ऐकायला मिळायचा.

माझे वडील जनपदच्या शाळेत शिक्षक होते. आतासारखा पगार नव्हता त्यांना. जेमतेम घर चालेल एवढंही वेतन मिळत असावं, की नाही शंका वाटायची. पण घरातून शाळेत आणि शाळेतून घरी येई पर्यंत भेटणारा प्रत्येक व्यक्ती 'नमस्कार गुरुजी' म्हणून आपला आदरभाव व्यक्त करायचा. घराघरातही 'गुरुजी आले' म्हटलं की सारं घर विनम्र व्हायचं अशी श्रीमंती बाबांना लाभली होती. माझे सर्वात लहान काका पटवारी होते. त्यांचं ऑफिस तसं घरंच असायचं. दिवसभर चोपड्या काढून समोरच्या पडवीत ते लिहित दिसायचे. त्यांना सुटी कधी असायची हे कळायचंच नाही. कारण रविवारच्याच नव्हे तर एखाद्या सणाच्या दिवशीही त्यांचं कार्यालय उघडच असायचं, रोज दहा-वीस माणसं त्यांच्याकडे काही कागदपत्रे मागायला यायची. असा आमच्या घरात लोकांचा प्रचंड राबता असायचा.

तीन काका, आणि आजोबा अशी घरातली चार माणसं कमावती. घरात खायप्यायला कमी नव्हतं पण पैसा असा कुणाजवळ दिसायचा नाही. प्रत्येकाच्या गरजाच अत्यल्प. पैसा अधिक मिळाला पाहिजे. असा प्रयत्नही कुणी करताना दिसत नव्हतं. 'एवढीच दक्षिणा हवी' म्हणून आजोबा कधी अडून असलेले कुणी पाहिलं नाही. विद्यार्थ्यांना जास्त वेळ शिकवतो म्हणून माझ्या वडिलांनी कधी जास्ती फी मागितलेली आमच्या स्मरणात नाही आणि पटवारी असलेल्या काकांनी

शेतीचे कागदपत्र तयार करून देताना येणाऱ्या शेतकऱ्याकडून कुठली वस्तू भेट म्हणून घेतली किंवा एखादं बंद पाकीट हळूच खिशात टाकलं असं घराला कधी दिसलं नाही. कारण पैसा हेच जीवनाचं सर्वस्व असं कुणी मानलेलं दिसलं नाही.

'ठेविले अनंते तैसेचि रहावे
चित्ती असो द्यावे, समाधान!'

असं जगण्याची रीत होती सर्वांची आणि 'वेचोनिया धन उत्तम व्यवहारे' जे मिळवायचं ते प्रामाणिकपणे मिळवायचं हा आग्रह होता सर्वांचा. त्यामुळंच प्रत्येकाच्या जीवननिष्ठा मजबूत होत्या. त्यामुळंच, भिक्षुकी असो, शिक्षक असो, पटवारी असो, शेती करायची असो की घर सांभाळायचं असो. आपल्या वाट्याला आलेलं काम अत्यंत निष्ठेनं करीत जगणारी माणसं दिसायची. आपलं जगणं केवळ आपल्यासाठी नाही सर्व घरासाठी आहे या माणसाच्या वृत्तीमुळं घरात एकोपा असायचा. घरं अखंड असायची. घरातल्या स्त्रियांना त्यावेळी आजच्या इतकं स्वातंत्र्य नव्हतं. चूल आणि मूल सांभाळण्यातंच त्यांचं आयुष्य खर्ची पडायचं. पण समाजकार्यासाठी बाहेर पडता आलं नाही, हुशार असूनही उच्च शिक्षण घेता आलं नाही, नृत्याचे, गायनाचे वर्ग करता आले नाही, खेळात भाग घेता आला नाही, किंवा पुरुषांनी अन्याय केला, घरातच बंदिनी करून ठेवलं म्हणून स्त्रियांनी घराचं आरोग्य बिघडवलं. घरातल्या आनंदावर विरजण घातलं असं बघायला मिळालं नाही. उलट-

उन्हासारखा हर्ष माझा असावा
घरातून बाहेर यावी मुले
नभासारखा शोक माझा असावा
तृणातून देखील यावी फुले,

अशा कलावंताच्या वृत्तीनं जगणं स्वीकारलेल्या स्त्रियांनी घरात आनंदाचे, सात्विक समाधानाचेच मळे फुलवले आहेत असं वाटायचं. दुसऱ्याच्या चेहऱ्यावर आनंद निर्माण करता येणं याच्यासारखा दुसरा आनंद नाही अशा वृत्तीनं वावरणाऱ्या स्त्रियांनीच घराला घरपण आणलेलं होतं, त्यामुळं नवरा-बायको आणि एक मूल एवढंच कुटुंब आणि त्याचंच घर अशी व्याख्या नव्हती, कल्पनाही त्यावेळी नव्हती.

गावाचं शहर व्हायचं होतं, घराचा फ्लॅट किंवा बंगला व्हायचा होता त्यावेळी. दूरदर्शन, दूरध्वनी हे शब्द ही आम्हा मुलांच्या कल्पना विश्वात नव्हते. गावात वीज नव्हती विजेवर चालणारी साधनंही नव्हती. संध्याकाळ झाली की गाव चिडीचूप व्हायचं. रस्त्यानं जायलाही भीती वाटायची. एखाद्याच्या घरी ग्रामोफोन बघितला की अप्रूप वाटायचं. गावाच्या एका टोकाला काही घडलं तर आमच्या घरापर्यंत यायला वेळ लागायचा पण कळलं की सारा गाव धावून जायचा. वृत्तपत्रही काही ठराविक घरी यायची. आम्हा मुलांच्या हाती पडायची ती जुनी झाल्यानंतर वह्यांना पृष्ठ लावायला. त्यामुळं जगात काय चाललंय आणि जग कुठं चाललंय याच्याशी आमचा काही एक संबंध नव्हता. वर्गात शिक्षक जी नवी माहिती सांगायचे तेवढंच आमचं ज्ञान वाढायचं.

घरातल्या लोकांनी आमचं बालपण ओरबडून टाकल्याचं आठवत नाही कधी. अभ्यासाचा ताण नव्हता, गुणवत्ता यादीचा धाक नव्हता. शिकवणीचा फास नव्हता. चार गुण परीक्षेत कमी पडले तर कुणी फारसं रागवत नव्हतं. मार पडायचा, शिक्षा व्हायची ती वाईट काम केलं तर. परीक्षेत कॉपीच काय चुकूनही दुसऱ्या मुलाला विचारलं तर गुरुजी रागवायचे. घरापर्यंत बातमी जायची. घरीही बोलणी खावी लागायची. त्यावेळी माणसाचं नातं अध्यात्मिकतेशी, नैतिकतेशी होतं. त्यामुळं वाईट काम करायलाच माणसाला भीती वाटायची. भ्रष्टाचार, लाच, व्यसनाधिनता हे सारे शब्द शिष्टाचाराचे नव्हते तिरस्काराचे होते. त्यामुळं त्यावेळी माणसं, घरं, पैशानी गरीब होती वृत्तीनं श्रीमंत होती. जीवन कसं सुरक्षित आणि सुंदर वाटायचं.

६० वर्षात केवढा बदल घडून आलाय जगात! साऱ्या जगालाच एका लहान गावाचं रूप आलंय. वृत्तपत्र, आकाशवाणी, दूरदर्शन, दूरध्वनी, भ्रमणध्वनी अशा नवनव्या प्रसार, प्रचार माध्यमांनी जगातली सर्व क्षेत्रातील अद्ययावत माहिती, ज्ञान घर बसल्या आपल्यासमोर येत आहे. आमच्या पेक्षा नवी पिढी अधिक चौकस, बुद्धिमान, बहुश्रुत झालेली आहे. स्त्रियांना देखील सर्व क्षेत्र मुक्त झाली असून त्यांनी देखील पुरुषांच्या बरोबरीनं काम करायला सुरवात केली आहे. अनेक क्षेत्रात तर त्यांनी पुरुषांनाही मागं टाकलं आहे. भौतिक सुख देणारी अनेक साधनं विज्ञानानं आपल्याला उपलब्ध करून दिली आहेत. गावागावात वीज पोहोचली, शाळा, महाविद्यालयं, अद्ययावत तंत्रज्ञान पोहोचलं, जुन्या उत्पादन पद्धती बदलल्या, सामान्य माणसाच्या जीवनमानात वाढ झाली. हा सारा बदल थक्क करणारा असला, तरी आपण तो स्वीकारला आहे. स्वीकारणं अपरिहार्य आहे. आज विज्ञानाची, तंत्रज्ञानाची कास धरल्याशिवाय आपण, आपला समाज, आपला देश पुढे जाऊच शकणार नाही. उलट हा बदल ही विज्ञाननिष्ठता आपल्याला प्रगतीच्या दिशेनं नेणारी आहे. पण या प्रवाहात वाहत जाताना आपण जीवनमूल्येच विसरून गेलो. जगायचं कशासाठी? फक्त स्वतःसाठी. फक्त स्वतःच्या सुखासाठी. सुख

कशात? तर साधनात. साधनासाठी हवा पैसा. अशा गरजा वाढत गेल्यात. त्यांच्या पूर्तीसाठी पैशाच्या मागं धावण्याच्या शर्यती सुरू झाल्या. पळापळा कोण पुढं जातोय अशा जीवघेण्या स्पर्धेत आज माणूस गुंतून पडलाय. यात दमछाक होत असूनही तो लिओ टॉलस्टॉयच्या गोष्टीतील माणसासारखा धावत सुटलाय. यातून त्यांचं त्यांच्याशीच असलेलं नातं तुटत चाललंय. जगण्याचं प्रयोजनच अस्पष्ट होत चाललंय, त्यामुळं घरात राहूनही त्याला एकटेपणा एकाकीपणा जाणवू लागलाय. त्याला असुरक्षित वाटायला लागलं आहे. नवरा-बायको, आपलं मूल एवढीच कुटुंबाची व्याख्या आणि या कुटुंबापुरताच विचार मनावर अधिकार गाजवायला लागल्यामुळं समाजात, गावात असूनही घर एकटं पडत चाललंय. आपण पुरोगामी, सुधारलेले, विज्ञानवादी कसे आहोत हे दाखविण्यात अध्यात्मिकतेशी आपली नाळ तुटत चालली. त्यामुळं भ्रष्टाचार करण्यात, वाममार्गानं एखादी गोष्ट मिळविण्यात समाजाला ओरबडून टाकण्यात माणसाला कुठली भीतीच वाटेनाशी झाली आहे. या सगळ्याची गोळा बेरीज करून आज असं म्हणता येईल कां- माणूस सुखी झाला. होकारार्थी उत्तर देण्याचं धाडस कुणी करणार नाही. आजच्या या एकूण झगमगाटात ना माणसाला शाश्वत सुख मिळालंय, ना. कुटुंबाला घराला समाधान लाभलंय, ना सामाजिक हिताची जोपासना झाली. अशाश्वताची पुंजी वाढत चालली शाश्वताचा बॅलन्स कमी होत चाललाय. पाश्चिमात्य लोक भौतिकदृष्ट्या श्रीमंत होते आपला देश अध्यात्मिकतेत श्रीमंत होता. म्हणूनच गरीब लोकांचा श्रीमंत देश अशी एका लेखकानं आपल्या देशाची व्याख्या केली. याचा अर्थ नव्याचं स्वागत करायचं नाही असं नाही, तर नव्या चांगल्या गोष्टींचं स्वागत करून भौतिक प्रगतीतही जगाच्या पुढं आपल्याला गेलं पाहिजे पण पुढं जाताना

त्यजेत् एकं मुळस्यार्थे। ग्रामस्यार्थे कुलं त्यजेत्

ग्रामं जनपदस्यार्थे। स्वात्मानं पृथिवी त्यजेत

हा शाश्वत विचार घराघरात, नव्या पिढीत रुजवला गेला पाहिजे. आठवणीतली घर आजच्या प्रगतीच्या दृष्टीनं खूपच मागं होती. पण आजच्या घरापेक्षा ती घर, त्या घरातील माणसं खूपच समाधानी, आनंदी आणि तणावमुक्त होती. मित्रांनो, आठवणीतल्या घरातील आनंद, शांततामय सहजीवन, समाधान, तणावमुक्त वातावरण, एकोपा, अध्यात्मिकता आणि सोबत एकविसाव्या शतकातील विज्ञाननिष्ठा, तंत्रविज्ञान सोबत घेऊन. एक नवं घर बांधू या का आपण!



# भाग - २

# त्यांना केवळ प्रेम द्या

तुमची बालकं ही ''तुमची'' बालकं नव्हेत, तर
चिरंजीव होऊ इच्छिणाऱ्या जगज्जीवनाच्या
उत्कट कामनेचे ते कन्या-पुत्र आहेत.
जरी ती तुमच्या द्वारा जन्माला आली, तरी
तुम्ही केवळ निमित्तमात्र आहात, आणि
ती तुमच्याजवळ असली, तरी
ती तुमची नव्हेत.



तुम्ही त्यांना आपलं प्रेम द्या, पण
आपले विचार मात्र देऊ नका, कारण
त्यांना स्वतःचे विचार आहेत.

त्यांच्या शरीरासाठी तुम्ही त्यांना घरं बांधून द्या,
पण त्यांच्या आत्म्याकरिता मात्र
ती देऊ नका, कारण
त्यांचे आत्मे तुम्हाला बघता न येणाऱ्या अथवा
स्वप्नातही न दिसणाऱ्या भविष्याच्या मंदिरात राहतात.

त्यांच्यासारखे बनण्याचा तुम्ही खुशाल प्रयत्न करा, पण
त्यांना तुमच्यासारखं बनविण्याचा प्रयत्न करू नका, कारण
जीवन मागं जात नाही आणि भूतकाळाबरोबर रेंगाळतही नाही.

**– खलील जिब्रान.**

# १... याचंही थोडं टेन्शन येऊ द्या!

परवा माझा एक माजी विद्यार्थी मला भेटायला आला होता. बोलताना लक्षात आलं की कसल्यातरी टेन्शनखाली असावा तो. सहज चौकशी केली तेव्हा कळलं की मुलाला शाळेत प्रवेश मिळण्यासाठी त्याचीच मुलाखत घेतली जाणार आहे आणि त्याचंच टेन्शन आलंय त्याच्यावर त्याच्या टेन्शनचं कारण आणि त्याची ती अवस्था बघून कीवही आली आणि हसायलाही आलं. हसायला येण्याचं कारण असं की असे टेन्शनखाली वावरत असलेले अनेक पालक मी रोज बघतो आहे. मुलाला शाळेत प्रवेश मिळत नाही म्हणून टेन्शन, सत्र परीक्षा असो, वार्षिक परीक्षा असो, अभ्यासाचं टेन्शन मुलांपेक्षा आई-बाबांवरच अधिक. गुण कमी पडले, मुलाला नोकरी मिळत नाही सारं टेन्शन पालकावरच. विषय, प्रश्न वेगवेगळे पण टेन्शन मात्र कायम.

माझ्या आई-वडिलांनी माझ्या शाळेतील प्रवेशाचं, परीक्षांचं असं टेन्शन घेतलेलं मला आठवत नाही. आजच्या पालकांप्रमाणे माझ्या पालकांनी माझ्या अभ्यासाकडे इतक्या गंभीरपणे लक्ष दिल्याचंही आठवत नाही. मी नापास होत नाही यातच त्यांना समाधान वाटायचं. मग आजचाच पालक इतका तणावग्रस्त अवस्थेत का वावरावा? एक मात्र खरं, की माझ्या बालपणी असणारी एकूण सामाजिक, शैक्षणिक आणि कौटुंबिक परिस्थिती आणि आजची परिस्थिती यात अर्धशतकापेक्षाही अधिक अंतर आहे. माझे पालक फारसे शिकलेले नव्हते. एकत्र कुटुंबपद्धती होती. कुटुंबातील संख्याही अधिक होती. शिकणाऱ्यांची आणि शैक्षणिक संस्थांची संख्याही कमी होती. आज ही परिस्थिती बदलली आहे. पालकवर्ग सुशिक्षित आहे. शिक्षणाचं सार्वत्रिकीकरण झाल्यामुळं शिकणाऱ्यांची संख्या वाढली. मुलांसोबत मुलीही अनेक क्षेत्रात पुढं येऊ लागल्या. पुरुषाबरोबर स्त्रियांनाही नोकरी करणं अनेकदा अपरिहार्य ठरत आहे. कुटुंबंही 'हम दो हमारे एक या दो' अशी मर्यादित झाली आहेत. शिकणाऱ्यांची संख्या वाढल्यामुळं सर्वच क्षेत्रात एक स्पर्धा निर्माण होणं हेही अपरिहार्य आहे. आई-वडिलांच्या सर्व आशाआकांक्षा एकुलत्या एका मुलावर केंद्रित झाल्यामुळे या स्पर्धेत पाल्य कुठंही मागं पडू नये असा पालकांचा प्रयत्न असणं हेही समजण्यासारखं आहे. परंतु क्षमता असो वा नसो, आपला पाल्य या स्पर्धेत टिकलाच पाहिजे हा अट्टाहास बाळगून टेन्शन वाढवून घेणं हे मात्र न समजण्यासारखं आहे. पूर्वीच्या पालकांपेक्षा आजच्या

पालकांवर पाल्याची जबाबदारी अधिक आहे आणि वाढतीही आहे यात शंका नाही. शिक्षण प्रक्रिया अर्थपूर्ण होण्यासाठी आणि बालकाचा सर्वांगीण विकास हे शिक्षणाचं उद्दिष्ट साध्य करण्यासाठी पालकाचं योगदान आणि सहकार्य अतिशय महत्त्वाचं आहे हा विचार आता सर्वमान्य झाल्यामुळंच प्रत्येक शाळेत शिक्षक-पालक संघ असावा असा आग्रह धरला जात आहे. खरं म्हणजे ह्या नव्या शैक्षणिक जबाबदाऱ्या वाढल्यामुळं टेन्शन यायला हवं. पण तसं दिसत नाही. टेन्शन वाढलंय ते पालकाची मानसिकता बदलल्यामुळं आणि जीवनाकडे बघण्याच्या दृष्टिकोनात बदल झाल्यामुळं. ही मानसिकता आणि बदल कोणता?

गेल्या पाव शतकात ज्ञान आणि लोकसंख्या यांचा जो प्रचंड विस्फोट झाला त्याचे परिणाम जीवनाच्या सर्वच क्षेत्रावर उमटले. शिक्षणक्षेत्रही त्याला अपवाद राहिलेलं नाही. शिक्षणाची उद्दिष्टे, अध्यापनपद्धती, अभ्यासक्रम यात जसा बदल झाला तसा जीवनपद्धतीतही बदल घडून आला. पण हा बदल तेवढा चिंताजनक नव्हता. या दोन विस्फोटांबरोबरच गरजांचा, अपेक्षांचा जो विस्फोट झाला तो मात्र अतिशय धक्कादायक आणि चिंतनीय असा आहे. शिकायचं कशासाठी? जगायचं कशासाठी? याची उद्दिष्टच या नव्या विस्फोटामुळं हरवून बसली आहेत. माझ्या अपेक्षांची पूर्ती येनकेन मार्गानं झालीच पाहिजे, माझ्या वाढलेल्या गरजा पूर्ण व्हायलाच पाहिजेत, हा अट्टाहास या अपेक्षांच्या विस्फोटामुळं निर्माण झाला. आमच्या सुखाच्या कल्पनेतही बदल घडून आला. भौतिक, शारीरिक सुख म्हणजेच खरं सुख. भौतिक वस्तू, साधनं हाच सुखाचा आधार आणि तो प्राप्त करणं हेच ध्येय. हीच जीवनातील संप्राप्ती. ही धारणा तयार झाली. मग ह्या वस्तू प्राप्त करण्यासाठी हवा अधिकाधिक पैसा. या साधनवादाच्या मागं आम्ही इतके लागलो, की माणसामाणसातील संबंध ठिसूळ, बेगडी होत आहेत याचं भानही हरवलं. आज प्रत्येक पालकाला त्यातही सुशिक्षित म्हणविणाऱ्या पालकाला आपला पाल्य डॉक्टर, इंजिनिअरच झाला पाहिजे असं का वाटतं? कारण यात त्याला अधिक पैसा मिळवता येईल हे गृहीत धरलंय. मग त्यासाठी त्याला कॉन्व्हेंटपासून तो मेडिकल, इंजिनिअरींग कॉलेजमध्ये प्रवेश मिळण्यासाठी वाटेल ते डोनेशन देण्याची पालकाची तयार असते, इतकंच नव्हे तर या परीक्षांमध्ये पाल्य उत्तीर्ण होण्यासाठी लाखोनी पैसा खर्च करणारे पालकही कमी नाहीत. एकदाचा पाल्य डॉक्टर-इंजिनिअर झाला की खर्च केलेला पैसा दामदुपटीत समाजाकडून त्यानं वसुल करावा अशी धारणा तयार झाली आहे. या मानसिकतेतून पाल्याच्या शिक्षणाचा विचार सुरू झाल्यामुळं त्याच्या शालेय वा महाविद्यालयीन प्रवेशाचं, अभ्यासाचं टेन्शन पालकावर यायला लागलं आहे हे सारं करताना कुठंतरी शाश्वत अशी जीवनमूल्ये आपण पायदळी तुडवत आहोत. स्वावलंबन, प्रामाणिकपणा, सामाजिक बांधिलकी, संवेदनशीलता, देशप्रेम या गुणांपासून आपल्या पाल्याची नाळच आपण तोडतो आहे याची कुणालाच जाणीव असलेली दिसत नाही. आपला मुलगा डॉक्टर, इंजिनिअर, आय.ए.एस. झाला पाहिजे, असं प्रत्येक आई-वडिलांना वाटतं; पण आपला पाल्य त्याच्या क्षमतेनुसार जो कुणी होणार असेल तो होईल. परंतु तो एक चांगला माणूस, देशाचा एक आदर्श नागरिक झाला पाहिजे असं का वाटू नये? त्यासाठी आपला प्रयत्न का असू नये? या प्रयत्नात आपण कुठंतरी कमी पडतो आहे याचं टेन्शन का येऊ नये?

आपला मुलगा, आपला पाल्य चांगला माणूस, देशाचा आदर्श नागरिक व्हावा यासाठी आपण आज खरोखरच प्रयत्नशील आहोत का? घर, कुटुंब ही समाज जीवनाची शाळा आहे. सहकार्य, स्वावलंबन, त्याग, प्रेम इत्यादी गुणांचा पाया कुटुंबातच घातला जातो. समाजात कसं वागावं हे मूल प्रथम कुटुंबातच शिकत असतं. नागरिकशास्त्राच्या, समाजशास्त्राच्या पुस्तकात असं लहानपणी वाचल्याचं आठवतं. पूर्वी कुटुंब मोठी होती, एकत्र होती आणि या एकत्र आणि मोठ्या कुटुंबात परस्परांशी वागताना अनेक गुणांची पेरणी सहजपणे मुलांच्या मनात होत असे. आता कुटुंब लहान असल्याने, आई-वडील, मुलगा, मुलगी अशी मर्यादित झाल्याने या गुणांची पेरणी जाणीवपूर्वक केली पाहिजे. ती होत आहे असं दृश्य आज बघायला मिळत नाही. वडील आपल्या उद्योगात व्यस्त, आईही नोकरीमुळे व्यस्त. आई-वडिलांचा सहवास, प्रेम मुलांच्या वाट्याला कमी यायला लागलं आहे. मुलांवर प्रेम करणं याचा अर्थ त्यांच्या आवडीनिवडी आणि मागण्या पूर्ण करणं. त्याला स्पर्धेच्या दृष्टीनं तयार करणं म्हणजे विविध क्लासेसमध्ये अडकवून ठेवणं, अशी एक धारणा पालकांची झालेली दिसते. समाजात कसं वागायचं यापेक्षा समाजापासून कसं दूर राहायचं याचंच शिक्षण हल्ली अनेक सुशिक्षित कुटुंबातून मुलांना मिळत असतं. ज्या समाजात आपण राहतो त्या समाजाशी आपली काही बांधिलकी आहे, त्या समाजातील बऱ्यावाईट प्रश्नांचे, घटनांचे पडसाद आपल्याही कुटुंबावर उमटू शकतात. आपल्या सुख-दुःखात इतरांनी सहभागी व्हावं असं वाटत असेल तर आपणही इतरांच्या सुख-दुःखात सहभागी झालं पाहिजे हे कुटुंबप्रमुखाशिवाय कोण शिकवेल मुलांना? केवळ शाळेवर ही जबाबदारी सोपवून मुक्त होता येईल का? मुलांना वळण लावायचं काम का केवळ शाळेचं आहे? पाच ते पंधरा या वयोगटातील मुलांची मनं अतिशय संवेदनशील व संस्कारक्षम असतात. याच काळात मुलांना काही चांगल्या सवयींची, गुणांची, संस्कारांची आयुष्यभर पुरणारी शिदोरी द्यायची असते. आणि हे देण्याचं कार्य आईवडिलांनी, पालकांनी प्रयत्नपूर्वक करायचं असतं. आई-वडील हेच मुलांचे पहिले गुरू असतात. सुभाषितकार म्हणतात-

'उपाध्यायन्दशाचार्यः आचार्याणां शतं पिता।
सहस्त्रेशु पितृन्माता गौरवेणातिरिच्यते।।

अर्थ असा की - दहा उपाध्यायापेक्षा आचार्य, शंभर आचार्यांपेक्षा पिता आणि हजार पित्यापेक्षा माता ही गौरवाने अधिक आहे म्हणूनच आपल्या मुलांवर संस्कार करण्याची महत्त्वाची जबाबदारी आई-वडिलांवर आहे.' ही जबाबदारी आणि हे भान आम्ही पालकांनी बाळगलं तर आज हरवलेल्या जीवनमूल्यांचे, माणुसकीचे संस्कार सहजपणे मुलांमध्ये संक्रमित करता येतील. रुजवता येतील. यासाठी मित्रहो, आपलं घर हे संस्कार केंद्र झालं पाहिजे. ज्या घरात परस्परांबद्दल प्रेम, जिव्हाळा असेल, जे घर आनंदानं भरलं असेल, सर्व घटकांमध्ये जिथं सुसंवाद असेल ते घर संस्कार केंद्र आपोआपच बनलेलं दिसेल.

घर असावे घरासारखे । नकोत नुसत्या भिंती
तिथे असावा प्रेम जिव्हाळा । नकोत नुसती नाती.

असं जे घराचं वर्णन केलं जातं तसं तरी घर बघायला मिळतं का? अपवाद असू शकतात. पण दुर्दैवानं आज घरालाच घरघर लागल्यासारखी दिसते आहे. मुखवटे घालूनच जणू आपण वावरतो आहे असं वाटावं असं दृश्य घराघरांतून दिसतं. मित्रहो, जी मुलं तुमचं सारं सर्वस्व आहे, ज्यांच्यासाठी तुमची सारी धडपड चालली असते, ज्याच्या शिक्षणासाठी, विकासासाठी तुमचा प्रयत्न चाललेला असतो, त्याच्यासाठी म्हणून दिवसातला वेळ कधी काढता का? अभ्यासाशिवाय कधी गप्पा करता का? कधी खेळता का त्याच्याशी? त्याच्या घडणीसाठी आपल्या स्वतःच्या जीवनपद्धतीत काही बदल केला का? किमान आपला आपल्या पाल्याशी संवाद तरी होतो का? आपल्या स्वप्नांची पूर्ती करणारा पाईक म्हणून आपण आपल्या पाल्याकडे बघणार असू, त्याच्यातला आकार न शोधता त्याला आपल्याच मनासारखा आकार देण्याचा आग्रह धरणार असू, आपला पाल्य हे एक स्वतंत्र व्यक्तिमत्त्व आहे हे नाकारणार असू तर त्याच्याशी संवाद साधणार कसा? आणि ज्या घरात परस्परांमध्ये खऱ्या अर्थानं संवाद होत नसेल तर ते घर असेल पण घरपण हरवलेलं घर असेल. अशा घरात माणूस बनण्याचे, आदर्श नागरिकत्वाचे संस्कार कसे काय होणार? मित्रहो, संस्कार ही काही जबरदस्तीनं देण्याची गोष्ट नाही. शिकविल्यानं संस्कार रुजतील यावरही कुणी विश्वास ठेवणार नाही. ते सहजपणे, मातृहृदयी शिक्षक होऊन रुजवायचे असतात. पण त्यासाठी आपल्याला, पालकांना कुठंतरी बदलावं लागेल. आपल्या मानसिकतेत, जीवनविषयक दृष्टिकोनात आणि आचार-विचारातही बदल घडवून आणावा लागेल. आपल्या पाल्यासाठी आपण हे करायला तयार आहोत का?

मित्रहो, शिक्षण हे सामाजिक परिवर्तन घडवून आणणारं समर्थ असं साधन आहे. शिक्षणातूनच आपल्या मुलांचा सर्वांगीण विकास होऊ शकतो, अनेक सामाजिक प्रश्न हे शिक्षणातूनच सुटू शकतात. शिक्षणातूनच आपल्या संस्कृतीचे संवर्धन आणि संक्रमण होऊ शकतं. या सर्व गोष्टींवर आपल्या सर्वांचा अजून तरी विश्वास आहे. पण हा विश्वास सार्थ करणारं शिक्षण आज शैक्षणिक संस्थांमधून दिलं जात आहे का? काय दिसतं चित्र आज शिक्षणाचं? गल्लीबोळात उघडलेली कॉन्व्हेंट, प्रवेशाच्या नावावर प्रचंड डोनेशन : शाळेत, महाविद्यालयातही डोनेशनविना प्रवेश नाही. शिक्षक, प्राध्यापकांची शिकवणी वर्गांची दुकानं, शिक्षणक्षेत्रात शिरलेल्या अपप्रवृत्ती, चाललेलं राजकारण या साऱ्या गोष्टींमुळे शिक्षण क्षेत्रातलं शुचित्व, पावित्र्य, विश्वास आणि आधारच नष्ट झाला आहे. या शैक्षणिक प्रदूषणाला जबाबदार कोण? शासनकर्ते, सामाजिक नेतृत्व, राजकीय नेते, शिक्षक, मुख्याध्यापक की शाळा संचालक? कुणाकडे बोट दाखवायचं? दुसऱ्याकडे बोटं दाखविताना हाताची तीन बोटं आपल्याकडे असतात हे विसरून कसं चालेल? या शैक्षणिक प्रदूषणात पालक म्हणून आपलाही फार मोठा वाटा आहे. अनेक गोष्टींसाठी पालक म्हणून आपण जबाबदार असतो. अनेक अपप्रवृत्तींना आपणच जन्माला घालत असतो. प्रत्यक्ष अप्रत्यक्षपणे मदतही करीत असतो. म्हणून कुणाला दोष देण्यापेक्षा, प्रस्थापित गोष्टींवर केवळ टीका करण्यापेक्षा किंवा 'आम्ही काय करू शकणार?' असा वैफल्य सूर आळवीत बसण्यापेक्षा 'मी माझ्या परीनं या बुडणाऱ्या शिक्षणक्षेत्राला कसा हात देऊ शकतो' असा अंतर्मुख होऊन विचार केला पाहिजे आणि वर्तनातून तो प्रगट करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. जागृत पालक याचा अर्थ केवळ आपल्या पाल्याबद्दल जागृत एवढाच मर्यादित नाही तर शिक्षणक्षेत्र हा आपला चिंतेचा आणि चिंतनाचा विषय झाला पाहिजे आणि शिक्षणक्षेत्रात शिरणाऱ्या अपप्रवृत्तींना थांबविण्यात, ते क्षेत्र तीर्थक्षेत्र करण्यात महत्त्वाचा वाटा उचलला पाहिजे.

नवीन पिढीच बिघडली अशीही हाकाटी आपण पालक अनेकदा करीत असतो. त्यातच मुंबईच्या सेंट मेरी हायस्कूलमधील मुलांनी आपल्या अपंग आणि दुबळ्या प्रकृतीच्या वर्गबंधूला केवळ करमणुकीखातर शाळेच्या प्रयोगशाळेत जळत्या पेन होल्डरनं भाजून काढलं, शालांत परीक्षेत प्रश्नपत्रिका सोडवत असलेल्या उल्हास नगरच्या रिंकू पाटील या १६ वर्षांच्या मुलीला बारावीपर्यंत शिकलेल्या तिच्या प्रियकराने जिवंत जाळलं, या बातम्या आता जुन्या झाल्यात. नुकतीच वृत्तपत्रात झळकलेली सांगली शहरातील वार्ता अंगावर शहारे आणणारी आहे. डॉ. रविकांत देशपांडे यांची मुलगी कु. अमृता देशपांडे मथुराबाई गरवारे कन्या महाविद्यालयातील प्रथम वर्ष कलाशाखेतील विद्यार्थिनी. अतिशय गुणवंत,

हुशार, सत्शील अशी मुलगी. मैत्रिणीकडून घरी परत येत असताना भरचौकात गर्दी असूनही बबन सिकलगार नावाच्या तरुणानं तिला भोसकून ठार केलं. कारण काय? आपल्या प्रेमाला ती प्रतिसाद देत नाही म्हणून. अशा कितीतरी अस्वस्थ करणाऱ्या बातम्या वृत्तपत्रातून वाचायला मिळतात. ही अपराध करणारी सारी मुलं मध्यमवर्गातील सुखवस्तू कुटुंबातील आहेत. वैफल्यापोटी किंवा सामाजिक अन्यायामुळे ही कृती घडलेली नाही. तर अगदी योजनापूर्वक केलेली आहे. यात मुलांना केवळ दोष देऊन पालकांना मुक्त होता येणार नाही. श्रम न करता आजच्या मुलांना सर्वच गोष्टी आयत्या मिळत असतात. जेवणाखाण्यापासून कपडे धुण्यापर्यंत, गणवेषापासून तो परीक्षेच्या प्रश्नोत्तरापर्यंत सर्वच गोष्टी रेडिमेड मिळतात. यातच घरच्या घरी A पासून तो Z पर्यंतच्या टी.व्ही. वरील सर्व चॅनल्सवरील करमणूक मिळवून दिली आहे. मुलांना घरी काही स्वतः करण्यासारखं शिल्लक नाही. या सर्व ऐतखाऊ वृत्तीमुळे त्यांच्या ठिकाणी असलेली सृजनशीलता, नवनिर्मितीची इच्छा दडपली जाते. परिणामतः त्यांचा आत्मविश्वास हरवतो. अनेकदा नवनिर्मितीची दडपलेली भूक ते बेशिस्त किंवा हिंसाचारी मार्गानं, वर्तनानं भागवू पाहतात. अशावेळी तो बिघडला असं म्हणून केवळ चालणार नाही, तर त्याच्या या बिघडण्यात पालक म्हणून आपण किती जबाबदार आहोत याचा शोध अंतर्मुख होऊन घेतला पाहिजे.

आपलं जीवन आज अतिशय धकाधकीच झालंय. रोज अनेक समस्या सामान्य माणसाच्या जीवनात उभ्या ठाकतात. या समस्या, प्रश्न यामुळं मनावरील ताणतणावही वाढताहेत. पण या रोजच्या समस्यांचं आणि त्याच्या जोडीला 'मुलाला प्रवेश मिळत नाही,' 'मुलांची परीक्षा सुरू झाली' अशा लहान सहान गोष्टींचं आपणच उभं केलेलं नव्हे वाढवून घेतलेलं टेन्शन आपल्यासोबत आपल्या कुटुंबाचं, समाजाचं स्वास्थ्य बिघडवायला कारण ठरेल. टेन्शनच यायचं असेल, अस्वस्थ व्हायचंच असेल तर ते चांगल्या गोष्टींसाठी व्हा. आज होत असलेलं, दिसणारं सामाजिक, वैचारिक प्रदूषण बघून टेन्शन येऊ द्या. शिक्षणासारखं पवित्र क्षेत्र अपवित्र, दिशाहीन होत आहे. आपल्या घराची पडझड होत चालली आहे, घराचं घरपण हरवतं आहे, मुलांवर चांगले संस्कार करण्यात पालक म्हणून आपण कुठंतरी कमी पडतो आहे, या गोष्टींचंही टेन्शन येऊ द्या. असं टेन्शन, अस्वस्थपणा निर्माण झालं तरच उज्ज्वल उद्यासाठी आजपासून प्रयत्नाला लागता येईल.



# २. घर द्या एक घर

आपल्या मुलांवर चांगले संस्कार करण्यात आपण कुठंतरी कमी पडतो आहोत याचं थोडं टेन्शन आलं तर आपण थोडा विचार करायला लागू. काही प्रयत्नही करता येईल. प्रयत्नाची दिशा ठरवता येईल. ही दिशा असेल चांगले पालक, जबाबदार पालक होण्याची.

मित्रहो, चांगले पालक होण्यासाठी प्रथम 'पालक' आणि 'पालकत्त्व' या संकल्पना समजून घेतल्या पाहिजेत. आई-वडील आणि पालक दोन्ही शब्द अनेकदा एकाच अर्थानं वापरले जात असले, तरी त्यातल्या अर्थछटा वेगळ्या आहेत. म्हणूनच आई-वडील होणं सोपं असतं पण पालक होणं जबाबदारीचं काम असतं. एखाद्या मुलाचे आई-वडील दूर असतील तर पालक म्हणून दुसरेच कुणी असू शकेल. पालक म्हणजे जो मुलांचे पालन पोषण करतो आणि त्याच्या शारीरिक, भावनिक विकासाची जबाबदारी घेतो तो. बहुधा ही जबाबदारी आई-वडिलांकडेच असल्यामुळे आई-वडील आणि पालक हे दोन्ही शब्द समानार्थी मानले जातात. आता आई-वडील आणि पालक हे दोन्ही शब्द एकाच अर्थाने मानले तर बालकाच्या विकासात आई आणि वडील या दोघांचीही जबाबदारी समान असली पाहिजे की नाही? 'मला वेळच नसतो. मुलाकडे लक्ष देण्याचं काम मुलाची आईच करते.' असं अनेक बंधू न संकोचता सांगतात तेव्हा आश्चर्य वाटतं. शाळेत आम्ही पालकांच्या मुलाखती घेण्याचा कार्यक्रम घेतो. यात पालकांना, अर्थात आई, वडील या दोघांनाही समोर बोलवून त्यांना अनेक प्रश्न विचारले जातात. या प्रश्नांची जी उत्तरं मिळतात ती हास्यास्पदच नव्हे तर चिंता करावी अशी असतात. अनेक मुलांचे वडील असे आढळतात, की जे कधी मुलांच्या शाळेत गेले नाही किंवा मुलांना शिकविणाऱ्या शिक्षकांशी त्यांचा परिचयही झालेला नाही. घरची आणि मुलांचीही, सारी जबाबदारी, आईकडेच. तर काही भगिनीही कधी मुलांच्या शाळेत गेल्या आहेत असं दिसलं नाही. पालकांमध्ये आई-वडील या दोघांचाही समावेश आहे तर अशा परिस्थितीत जबाबदार पालक असं म्हणवून घेता येईल का त्यांना? जबाबदार पालक, सुजाण पालक म्हणवून घेण्यासाठी पालकांच्या जबाबदाऱ्या, पालकांची कर्तव्यं कोणती याची माहिती असायला हवी.

मित्रांनो, माणसाच्या जीवनात जशा शिशू, बालक, किशोर, तरुण, प्रौढ,

वृद्ध अशा अवस्था असतात तशा पालकत्त्वाच्याही अवस्था आहेत. पालकत्त्वाच्या त्या त्या अवस्थेत आपण ती ती जबाबदारी, कर्तव्य पाळली तर पाल्याचा सर्वांगीण विकास आणि अपेक्षित घडण तर होईलच पण मुख्य गोष्ट म्हणजे तुमची मुलं ही तुमचीच राहतील. आता पालकत्त्वाच्या अवस्था कोणत्या?

''लालयेत पंच वर्षानी, दशवर्षानी ताडयेत।

प्राप्तेतु षोडषे वर्षे, पुत्रं मित्र वदाचरेत।''

आर्य चाणक्याच्या या संस्कृत वचनात पालकांच्या अवस्था आणि कर्तव्यं यांचं अतिशय सुरेख विवेचन केलं आहे, असं मला वाटतं.

**पहिली अवस्था -**

मुलांच्या जन्मापासून तो पाच वर्षपर्यंत मुलाच्या वाढीचा जो कालखंड असतो या कालखंडातील पाल्यांचं पालकत्व ही पहिली अवस्था. गर्भधारणेपासून तो पाल्य पाच वर्षाचा होईपर्यंत आई-वडिलांनी त्याचं पालनपोषण कसं करायचं हे 'लालयेत पंचवर्षानी' या वचनातून सूचित केलं आहे. मुलांचा हा पाच वर्षाचा कालखंड आई-वडिलांच्या दृष्टीनं जणू वसंतऋतूच. या काळात 'लिंबोणीच्या झाडामागे' अशी गीतं म्हणायला आईला कंठ फुटतो. वडिलांना आपलंच बालपण दुडूदुडू धावत आलंय असा आनंद होत असतो. मुलांचं हसणं, रडणं, पडणं, बोलणं हा साराच भाग पालकांच्या आनंदाचा विषय असतो. त्याचे लाड, त्याचे हट्ट, त्याचं कौतुक करण्यात त्यांना धन्यता वाटते. या काळात मुलांना आई-बाबा जवळ हवे असतात. त्यांच्यापासून तो दूर जायला तयार नसतो. तुमच्या संरक्षणाची ढाल त्याला हवी असते. या कालखंडात तुमचं अधिकाधिक प्रेम त्याला हवं असतं. म्हणून या अवस्थेत अतिशय हळूवारपणे आपल्या पाल्याच्या वाढीकडे, पोषणाकडे लक्ष दिलं पाहिजे. हल्ली बालसंगोपनासारखी शास्त्रे विकसित झाली आहेत त्याचाही अभ्यास मुलांच्या विकासाच्या दृष्टीनं पालकांना उपयुक्त ठरू शकतो.

**दुसरी अवस्था -**

६ ते १५ या वयोगटातील मुलांचं पालकत्त्व म्हणजे तारेवरची कसरत असते. मुलांच्या सर्वांगीण विकासाची अधिकाधिक जबाबदारी याच काळात पालकांना निभवायची असते. मुलांच्या मनाला आणि शरीराला वळण लावणं. त्यांच्या व्यक्तिमत्त्व विकासाला डोळसपणे हातभार लावणं, त्यांच्या शिक्षणाची उत्तम व्यवस्था आणि काळजी घेणं, त्याचा आकार कोणता? त्यांच्या क्षमता कोणत्या? त्याचा शोध घेऊन शाश्वत जीवनमूल्यांचे संस्कार जाणीवपूर्वक त्यांच्यात रूजविण्याचं महत्त्वपूर्ण काम या दहा वर्षांच्या कालखंडात पालकांना करायचं असतं. हे करताना प्रसंगी कठोरही व्हावं लागेल. अनेकदा लहानसहान शिक्षाही कराव्या लागतील. 'ताडयेत दशवर्षानी' यातील 'ताडयेत' शब्द याच अर्थानं आला असावा. याचा अर्थ या काळात पालकांना आचार्यांची भूमिका अतिशय जबाबदारीनं निभवावी लागेल.

**तिसरी अवस्था -**

१६ ते २० या वयोगटातील किशोर आणि तारुण्याच्या उंबरठ्यावर असलेल्या मुला-मुलींच्या पालकांना अतिशय जागरूक राहावं लागणारा हा कालखंड असल्यामुळे ही तिसरी अवस्था जागरूक पालकत्त्वाची असते. या कालखंडात तारुण्याकडे वाटचाल करणाऱ्या आपल्या पाल्यांना प्रतिभेचे पंख फुटलेले असतात. स्वतंत्रपणे विचार करण्याची, निर्णय घेण्याची क्षमताही विकसित झालेली असते. आई-बाबांपेक्षा त्यांना मित्र जवळचे वाटू लागतात. घरापेक्षाही घराबाहेर ते अधिक रमू लागतात. याच काळात मुला-मुलींमध्ये शारीरिक बदलही वेगानं घडून येत असतात. या बदलांचं दडपण मुलांपेक्षा मुलींवर अधिक येत असलेलं दिसतं. त्यांना आपल्या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाची जाणीव आणि ओळखही झालेली असते. समाजातील अनेक बरे-वाईट परिणाम त्यांच्यावर होत असतात. आता तर १८ वर्षांवरील मुला-मुलींना घटनेनं मतदानाचा अधिकार दिला आहे. म्हणजे ते नागरिक झालेले असतात. त्यांना स्वतंत्र मत प्राप्त झालेलं असतं. या स्वतंत्र मतामुळंच या कालखंडात किंवा या वयोगटातील मुलं आई-वडिलांपासून दुरावण्याची किंवा फटकून वागण्याची अनेकदा शक्यता असते. त्यामुळं या वयाच्या मुला-मुलींवर आपलं पालकत्त्व लादण्याचा प्रयत्न न करता 'प्राप्तेषु षोडषे वर्षे पुत्रं मित्रं वदाचरेत।' या उक्तीप्रमाणे त्यांचे चांगले मित्र होण्याचा पालकांनी प्रयत्न केला पाहिजे. आपली स्वप्नं, आपले विचार आपल्या इच्छा-आकांक्षा यापेक्षाही त्यांच्या स्वप्नांना, इच्छा, आकांक्षांना महत्त्व देऊन त्याची वाटचाल सुलभ होण्यासाठी प्रयत्न केला पाहिजे. अनेक गोष्टीत त्याचा सल्ला घेतला तर आपणही घरातील एक महत्त्वाची व्यक्ती आहे, असं त्याला वाटू लागतं. विविध अनुभव घेण्यापासून त्यांना परावृत्त करण्यापेक्षा ते घेण्याच्या दृष्टीने प्रेरकांची भूमिका पालकांनी निभावली पाहिजे. एक चांगला मित्र म्हणून पाल्याच्या पाठीशी उभं राहतानाच त्याच्या वाटचालीतील खाचखळग्यांची जाणीव स्पष्टपणे करुन देऊन विवेकबुद्धीनं निर्णय घेण्याचं मार्गदर्शन त्याला दिलं पाहिजे. एक सच्चा मित्र अशी भूमिका पालकांनी ठेवली, की पाल्यही पालकांशी मोकळ्या मनानं बोलू लागेल आणि उभयतांतील मैत्रीपूर्ण संवादामुळे अनेक प्रश्न तर सुटतील पण सोबतच घरही आनंदानं भरलेलं राहील.

**चौथी अवस्था -**

आर्य चाणक्याच्या वचनात पालकत्वाच्या तीनच अवस्थांचं दिग्दर्शन केलं आहे. या ठिकाणी आणखी एका अवस्थेची जाणीव करून द्यावी असं वाटतं. ही अवस्था आहे पालकत्वाच्या निवृत्तीची. सामान्यपणे वयाच्या पंचवीस वर्षांपर्यंत मुलांचं शिक्षण पूर्ण होऊन तो कमवता किंवा स्वतःच्या पायावर उभा झालेला असतो. मुलींचीही लग्ने या वयात होत असल्यामुळे त्याही आता आई-वडिलांवर अवलंबून नसतात. जोपर्यंत पाल्य आर्थिकदृष्ट्या पालकावर अवलंबून असतो तोपर्यंत मनात असो नसो पण अनेक गोष्टी पालकांच्या ऐकत असतो. पण एकदा का तो स्वतःच्या पायावर समर्थपणे उभा झाला की पालकांच्या साऱ्याच गोष्टी तो पटवून घेईल असं नाही. यावेळी अनेक पालकांना वाटतं की आतापर्यंत आपलं ऐकणारा पाल्य चार पैसे कमवायला लागल्याबरोबर आपल्याला उत्तरं द्यायला लागला. अनेकदा पालक खोचकपणे, उपरोधिकपणे हे बोलत असतात. यातून पालक-पाल्य संघर्ष सुरू होताना दिसतो. म्हणून या काळात म्हणजे मुलाचं नवीन जीवन सुरू झालं की पालक म्हणून आपण निवृत्त झालं पाहिजे. विचार आणि आचार यातून ते प्रगटही झालं पाहिजे. आपला पाल्यच आता पालकाच्या भूमिकेकडे वाटचाल करणार आहे. तो त्याच्या मुलाचा पालक जसा होणार तसं आपलंही पालकत्त्व त्याला द्यावं लागणार आहे याचं भान ठेवून पालकाचा व्यवहार असावा.

भारतीय संस्कृतीत चार आश्रमांची कल्पना सांगितली आहे. ब्रह्मचर्याश्रम, गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम आणि संन्यासाश्रम. ब्रह्मचर्याश्रमात म्हणजे वयाच्या २५ वर्षांपर्यंत ब्रह्मचर्याचं पालन करून सर्व प्रकारची विद्या प्राप्त करून शरीर कमावणं आणि आपला विकास करून घेणं हे अपेक्षित असतं. पुढील २५ वर्षे हा गृहस्थाश्रमाचा काळ. विवाह करून प्रजोत्पादन करणं. कुलऋण फेडणं हे या आश्रमातील मुख्य दायित्व. त्यानंतरचा काळ म्हणजे वानप्रस्थाश्रमाचा. यात गृहस्थाश्रमातून निवृत्त होऊन समाजकार्यात बांधून घेणं आणि समाजऋण फेडणं हे अपेक्षित असतं. आपण जेव्हा गृहस्थाश्रमात असतो तेव्हा आपली मुलं ब्रह्मचर्याश्रमात असतात. त्यांचा शारीरिक, मानसिक, भावनिक विकास होऊन ते उत्तम नागरिक होतील अशा प्रकारची काळजी घेणं हे पालकांचं कर्तव्य असतं आणि जेव्हा मुलाचा गृहस्थाश्रमात प्रवेश होतो तेव्हा आपण त्यातून निवृत्त होऊन समाजकार्यात स्वतःला गुंतवून घेणं हे आवश्यक असतं. आर्य चाणक्यानं सांगितलेली दिशा आणि जुनी आश्रमपरंपरेची कल्पना जवळपास मिळतीजुळती आहे. या दोन्ही कल्पनेमागील उद्दिष्टं आपण नीट समजून घेतली आणि पालक म्हणून आपली कर्तव्य आणि जबाबदारी पार पाडली तर आपली मुलं ही आपली राहतील आणि आपल्या वृद्धापकाळात आपल्याकडे अडगळ म्हणून न बघता आधारवडाच्या रूपात बघायला लागतील.

आर्य चाणक्याच्या वचनाचा संदर्भ घेऊन पालकत्वाच्या अवस्था कोणत्या यावर चर्चा केली असली, तरी याठिकाणी मला संवाद साधायचा आहे, हितगूज करायचं आहे ते पालकत्वाच्या दुसऱ्या अवस्थेतील पालकांशी म्हणजे ज्यांचे पाल्य ६ ते १५ वयोगटात येतात. या वयोगटातील मुलं अतिशय संवेदनशील असतात. त्यांच्या शालेय शिक्षणाला इथून खऱ्या अर्थानं प्रारंभ होतो आणि व्हायला पाहिजे. आज पाल्य जन्माला आला की पालकांना आपला पाल्य केव्हा एकदा शाळेत जातो याची घाई झालेली दिसून येते. तो अडीच-तीन वर्षांचा होतो न होतो तोच त्याला बालवाडीत, कॉन्व्हेंटमध्ये गुंतवून ठेवलं जातं. अनेक पालक तर इंग्रजी माध्यमाच्या वेडानं पछाडले असल्यामुळं या मुलांना इंग्रजी कॉन्व्हेंटमध्ये कसा प्रवेश देता येईल याचाच विचार करतात आणि नुकताच मातृभाषेतून तो संवाद करायला लागला असताना त्याच्यावर परकीय भाषेचं ओझं लादून मातृभाषेपासून आणि मराठी संस्कृतीपासूनही त्याची नाळ तोडण्याचे पातक करतात. याचाही कुठंतरी विचार व्हायला पाहिजे. हा ६ ते १५ वर्षांपर्यंतचा वयोगट संस्कार करण्याच्या दृष्टीनेही महत्त्वाचा असतो. या वयात त्यांच्या मनात जे पेराल, जे रुजवाल ते उगवेल. या वयात मुलं अधिकाधिक वेळ घरातच असतात, आई-बाबांच्या सहवासात असतात. त्यांच्या सहवासात आणि घरातील वातावरणातच ती अनेक गोष्टी शिकत असतात. हे लक्षात घेऊन आपली घरं खऱ्या अर्थानं घरं झाली पाहिजेत. समाजजीवनाची पाठशाळा झाली पाहिजे. म्हणून आपल्या मुलांना असं घर द्या ज्यात आनंदाचं आवार उघडलं असेल, जिथं सात्विक सुखसमाधानानं आश्रय घेतला असेल. शाळेची शिस्त जिथं हजेरी लावत असेल, मंदिरातील प्रसन्नता जिथं माहेरला आली असेल. 'हे विश्वचि माझे घर' हा ज्या घराचा स्वभाव असेल, सदाचार हीच ज्या घराची श्रीमंती असेल आणि जिथं घरातील चैतन्यफलांचा हळूवार नैसर्गिक विकास साधेल. मुलांना असं एक घर द्या! असं एक घर!!



# ३. हे सहज करता येईल

एकदा पालकांशी गप्पांचा कार्यक्रम सुरू होता. एक पालक आपल्या मुलांची तक्रार सांगायला लागले. त्यांचा मुलगा म्हणे यांचं काही ऐकत नाही. एखादी गोष्ट करुं नको म्हटलं की नेमकी तीच गोष्ट करेल. यासाठी काय करायचं? हा त्यांचा प्रश्न. हा प्रश्न अनेकदा अनेक पालक मला विचारतात अशावेळी माझं उत्तर असतं 'चांगले पालक व्हा।' चांगले पालक व्हायचं म्हणजे नेमक्या कोणत्या गोष्टी करायच्या? असाही त्यांचा प्रश्न असतो. नेमक्या या चार गोष्टी केल्या की तुम्ही चांगले पालक झालात असं नाही. कारण परिसर, आर्थिक स्थिती, सामाजिक व सांस्कृतिक प्रभाव या सर्वच गोष्टींचा परिणाम आपल्यावर होत असतो आणि त्यातून आपल्या वागण्याची, व्यवहाराची दिशा ठरत असते. तरी देखील आपल्याला करता येईल अशा काही गोष्टी आहेत त्या जर आपण करू शकलो तर आपल्या मुलांचे अनेक प्रश्न सुटतील आणि चांगल्या आणि जबाबदार पालकत्वाच्या दिशेनं आपली वाटचालही सुरू होईल.

**मुलांवर प्रेम करा - वेळ द्या**

मुलांवर प्रेम करा असं म्हटल्यावर आपण नक्कीच हसाल. कारण प्रत्येक आई-वडील आपल्या अपत्यावर जिवापाड प्रेम करीत असतात. हा निसर्ग नियम आहे. यात नवीन काय सांगितलंय असं आपल्याला वाटेल. प्रत्येक पालक आपल्या पाल्यासाठी सारं काही करतात. त्याचं पालनपोषण, कोडकौतुक करतात, हट्ट पुरवतात, त्याला उत्तम संस्थेत उत्तम शिक्षण मिळावं म्हणून प्रयत्नशील असतात. त्याचं सुख-दुःख हे स्वतःचं सुख-दुःख मानतात. हा सारा व्यवहार शुद्ध प्रेमापोटीच असतो, तरी देखील या प्रेमाच्या अविष्काराला, मुलांना घडविण्याच्या दृष्टीनं एक वेगळं परिमाण देणं आवश्यक आहे.

१ ते ५ या वयोगटातील मुलांचं विश्व म्हणजे घर आणि त्याचे आई-वडील एवढंच असतं. जगाविषयीची जिज्ञासा त्याच्यात हळूहळू जागृत होऊ लागली असते. अनेक प्रश्न, आपल्या दृष्टीनं ते अतिसामान्य, निरर्थक असले, तरी ते त्याला महत्वाचे वाटतात. आई-वडिलांना ते विचारून आपलं समाधान करून घेण्याची त्याची इच्छा असते. इतरांमध्ये, समाजामध्ये मिसळण्याची त्याची प्रवृत्ती नसते. ते काहीसे भित्रे असतात, बुजणारे असतात. त्यांना आईबाबांच्या संरक्षणाची अत्यंत आवश्यकता असते. ते पूर्णतः परावलंबी असतात. अशा कालखंडात त्यांना तुमच्या प्रेमाची, सहवासाची आवश्यकता असते. मुलं आपल्या सोबत असतात, पण सहवासात असतात कां? अनेक कुटुंबातून चित्र असं दिसतं की मुलं दोन अडीच वर्षांची होतात न होतात तोच त्याला बालवाडीत अडकविण्याची पालकांना घाई होते. ही घाई आणि दृष्टिकोन बदलता येईल का? अनेक कुटुंबात पती पत्नी दोघंही नोकरीला असल्यानं आणि घरात इतर वडील माणसं नसल्यामुळं त्यांच्यासमोर मुलं सांभाळण्याचा प्रश्न असतो. अनेकदा अगतिकता म्हणूनही हे करावं लागतं. अनेक ठिकाणी मुलांना सांभाळण्यासाठी एखादी बाई देखील ठेवावी लागते ही वस्तुस्थिती नाकारता येत नाही. पण ही वस्तुस्थिती आहे म्हणून 'मुलांकडे बघायला मला वेळ नाही' असं म्हणून चालणार नाही. घरात आपण सर्व एकत्रच असतो. बोलतो, सारी कामही सोबत करीत असतो याचा अर्थ असा नाही की, आपण मुलांना वेळ देतो किंवा यापेक्षा वेगळा वेळ देण्याची गरज आहे. मुलांना तुम्हाला खूप काही सांगायचं असतं. बोलायचं असतं. शाळेतल्या गंमती जमती सांगायच्या असतात, आजूबाजूला पाहिलेल्या अनेक घटनांच्या संदर्भात प्रश्न विचारायचे असतात, कारण त्याचे श्रोते तुम्हीच असता. त्यांचे गुरुही तुम्हीच असता. मुलांना तुम्ही हवे असता म्हणजे तुमचा वेळ, सहवास हवा असतो. जेव्हा ते तुमच्याशी आणि तुम्ही फक्त त्यांच्याशीच संवाद करीत असाल. आपल्या मुलांना आपल्याला समजून घ्यायचं असेल तर असा वेळ काढायलाच हवा. आई-बाबा आपल्या वाट्याला येतच नाही असं जर मुलांना जाणवलं तर त्याचीही प्रतिक्रिया कुठंतरी मुलाच्या वागण्यातून उमटते. ती अनेकदा हट्टी होतात. एककल्ली होतात, विध्वंसक वृत्तीकडेही ती वळू शकतात. मुलांचे हट्ट पुरवणं म्हणजे प्रेम करणं नव्हे. काही हट्ट आणि हट्ट करण्यामागे असलेली मुलाची मानसिकता समजून घेतली पाहिजे. केवळ रागावून त्याला चूप करणं हे चांगल्या पालकाचं लक्षण नव्हे. यासाठी दिवसातून काही वेळ मुलांसाठी काढला पाहिजे. त्यांना योग्य रीतीनं समजून घेतलं पाहिजे.

आज तंत्रविज्ञानाच्या विस्फोटामुळे जो साधनवाद बोकाळला आहे त्याचाही परिणाम नकळत आपल्या मुलांवर होत असतो नव्हे झालेला आहे. घराघरात दूरचित्रवाणी सारखं प्रभावी, परिणामकारक साधन पोहोचलं आहे. लहान मुलं अतिशय संवेदनशील असतात. त्यामुळं या माध्यमातून त्याला जे बघायला मिळतं त्याचे अनेक ओरखडे त्याच्या मनावर उमटलेले असतात. छोट्या पडद्यावर दाखवलेलं सारंच भासमान असतं. वास्तव आणि छोटा, मोठा पडदा यातलं अंतर त्यांना कळत नसतं. 'मम्मी भूक लगी' म्हटल्याबरोबर छोट्या पडद्यावरील आई

'एक मिनिट' म्हणून लगेच मुलाला मॅगी तयार करून देते पण आपण भूक लागली म्हटल्याबरोबर आपली आई मात्र रागावते. असं का? छोट्या पडद्यावरील अनेक गोष्टींची मुलं नक्कलही करू पाहतात. एखादी नक्कल कौतुकास्पद असते. एखादी जीव घेणारीही असते. अशावेळी. केवळ रागावून किंवा दूरदर्शनसारख्या माध्यमापासून त्याला दूर ठेवून प्रश्न सुटत नसतात. तुमच्या प्रेममय सहवासातून आणि संवाद कौशल्यातूनच ते सुटू शकतात त्यासाठीच आपल्या पाल्यासाठी दिवसातला काही वेळ राखून ठेवला पाहिजे. आजचं जीवन अतिशय गतिमान आहे त्यामुळं मुलासाठी वेळ काढायला अनेक तडजोडी कराव्या लागतील पण त्या करणं आवश्यक आहे ही गोष्ट लक्षात घ्यायला हवी.

**आपली विश्वासार्हता वाढवा-**

एक वेळ मुलांना आपण समजून घेऊ शकतो पण आपल्याला समजून घेण्याची क्षमता आणि वय मुलांचं नसतं. त्यामुळं मुलांशी आणि मुलांसमोर वागताना आईवडिलांना तारेवरची कसरत करावी लागते. मुलं अनेक गोष्टी आपल्याला मागत असतात. अनेक वस्तू आणायलाही सांगत असतात. एखादी वस्तू आपण आणून देऊ असं जर मुलांना सांगितलं असेल तर ती त्यावेळी आणून देणं आवश्यक आहे. 'बाबा, मला चेंडू हवाय' असं मुलांनी म्हटलं की आपण त्याला सांगतो. 'संध्याकाळी घरी येताना घेऊन येईन' पण आपण नेमकं विसरतो. मुलं विसरत नसतात. एखाद्वेळी अशी चूक होऊ शकते मात्र प्रत्येक वेळी अशाच चुका झाल्यात तर त्याचे परिणाम पाल्याच्या मनावर होत असतात. अनेकदा मुलांना आपण एखादी गोष्ट करावी म्हणून प्रलोभन दाखवीत असतो. प्रलोभन ही गोष्ट मानसशास्त्रीयदृष्ट्या अतिशय आवश्यक मानली गेली आहे. अनेक स्पर्धांमध्ये पारितोषिके दिली जातात त्यामागं उद्देश हाच असतो की त्या क्षेत्रात त्यानं अधिक प्रगती करावी. घरी देखील मुलांना आपण सांगत असतो की या परीक्षेत तो प्रथम आला तर त्याला ही वस्तू देईन. या स्पर्धेत पहिला आलास तर लांबच्या सहलीला जाऊ - या प्रलोभनामुळं अनेकदा मुलं जिद्दीनं प्रयत्न करतात आणि अपेक्षित यशही प्राप्त करतात. परंतु आपण पालक मात्र त्याला दिलेलं वचन पाळत नाही त्याचा परिणाम पाल्य स्पर्धेतून बाद होतो. दूर जातो पण त्यापेक्षाही आपल्या विश्वासार्हतेला तडा जातो ही गोष्ट जास्त हानीकारक आहे. तेव्हा एक तर मुलांना वचन देऊ नका आणि दिलं असेल तर ते कटाक्षानं पाळा. दिलेला शब्द पाळणं हा देखील एक महत्त्वाचा संस्कार आहे. 'रघुकुलरीत सदा चली आई, प्राण जाई पर वचन न जाई' असा संस्कार मुलांच्या मनात पेरण्यासाठी आपल्यालाच आपल्या आचरणाकडे लक्ष दिलं पाहिजे.

आपण आपल्या पाल्याशी बोलताना ठामपणे बोलत नसतो. एकदा एखादी गोष्ट वाईट आहे म्हणून सांगतो दुसऱ्यावेळी तिचं समर्थन करतो. मुलगा खेळात रंगून गेला असेल तर खेळानं तुझं पोट भरणार नाही अभ्यास कर म्हणून सांगतो आणि घरात बसून सारखा अभ्यास करीत असेल तर घरघुश्या म्हणून टिंगलही करतो. अशा परिस्थितीत त्याला काय करावं हे कळत नाही. त्याचा तुमच्यावरील विश्वास ढळू लागतो. मुलगा खोटं बोलला की आपण त्याच्यावर रागवत असतो. खरं बोलण्याचे पाठ देतो पण त्याचवेळी पगार झालेला आहे हे मुलाला माहिती असूनही मोलकरणीला पगार व्हायचा आहे चार दिवसानं पैसे देईन असं चक्क खोटं सांगत असतो. मुलांना कळत नाही बाबा बोलतात ते खरं की आपण पाहिलं ते खरं. मुलांना खरं बोलायचा आग्रह धरणारे आई-वडील फोनवर असो की आल्यागेल्याशी असो खोटं बोलत असतात हे जेव्हा मुलाच्या दृष्टीस पडतं तेव्हा त्याला खरं खोटं यातील अंतर कळेनासं होतं. त्याहीपेक्षा आईवडिलावरील त्याच्या विश्वासाला तडा जातो. मुलं शेवटी आई-वडिलांचं आचरण बघत असतात. तेच त्याचे आदर्शही असतात अनुकरणानं तेही तेच शिकत असतात. एखाद्या वेळी आई वडिलांना मनात नसूनही खोटं बोलावं लागतं पण त्यामागची तुमची मानसिकता ते समजू शकत नाही. त्यामुळंच आई-वडिलांनी मुलांच्या समोर वागताना, बोलताना, त्यांच्याशी संवाद साधतांना आपल्या आचरणाचा त्यांच्यावर विपरीत परिणाम होऊ नये आणि आपल्या विश्वासार्हतेला तडा जाऊ नये यासाठी कटाक्षानं प्रयत्न केला पाहिजे. आपले आई-बाबा आपल्यासमोर जसे बोलतात तसेच वागतात हा विश्वास आणि अभिमान त्यांच्या ठिकाणी निर्माण होईल. यातून अनेक संस्कार नकळत रुजतील.

**आनंद हिरावू नका-**

लहान मुलं अतिशय धडपडी असतात. त्यांच्या हाताला आणि मनाला काही ना काही उद्योग हवा असतो. अशावेळी त्यांना हे करू नकोस, ते करू नकोस असं आपण सारखं सांगत असतो. अभ्यासाशिवाय त्यांना दुसरी कुठलीच गोष्ट करण्यासारखी नाही अशी आपली समजूत झाली असते आणि आपण जे सांगू तेच त्यानं निमूटपणे करावं अशी आपली अपेक्षा असते. आपल्या ह्या वागण्यामुळं मुलांच्या ठिकाणी असलेली कल्पनाशक्ती खुरडली जाते. कधी कधी ती विध्वंसक मार्गाकडेही जाऊ लागते. मुलांच्या धडपडीकडे रचनात्मकदृष्ट्या बघायला आपण शिकलं पाहिजे. त्याच्या धडपडीमुळं त्याला मिळणारा आनंद हिरावून घेण्यापेक्षा तो त्याला आणि आपल्यालाही कसा मिळेल यासाठी प्रयत्न केला पाहिजे. मुलांच्या धडपडीतूनच त्यांना छंदाची जोपासना करायला लावता येईल. त्यांच्या धडपडीला

प्रोत्साहन देऊन त्यांच्यातील कलावंताना आवाहन करता येईल. 'या सुंदर कोवळ्या कळ्यामाजी, लपले असतील रवींद्र शिवाजी' असं राष्ट्रसंत तुकडोजी महाराज सांगतात ते याच अर्थानं. कुणी सांगावं आपल्याही मुलांमध्ये ते असू शकतील. शिवाजी जन्माला यावा पण आपल्या घरी नव्हे, दुसऱ्याच्या घरी. अशी आपल्या पालकांची मानसिकता असते. माझ्या पाल्यातही ज्ञानेश्वर, तुकाराम, एखादा नारळीकर का नसेल? असेल तर त्याला प्रकट करण्याचं काम पालक म्हणून माझं नाही का? या सकारात्मक भूमिकेतून मुलाच्या धडपडीकडे पाहिलं गेलं पाहिजे. एखादी गोष्ट करू नको हे सांगणं सोपं आहे. काय करायचं हे सांगणं अवघड आहे. म्हणून हे करूं नको ते करूं नकोस हे सांगण्यापेक्षा तो जी काही धडपड करतो त्याकडे बारकाईनं लक्ष असू द्या. चांगल्या धडपडीला प्रोत्साहन द्या. जिथं अपाय होण्याची शक्यता असते अशा ठिकाणी त्याला थांबवा. ती गोष्ट कां करू नये हे समजावण्याचा प्रयत्न करा पण धडपडीतला त्याला मिळणारा आनंद हिरावून घेऊ नका. पुढील एका प्रकरणात यासंदर्भात चर्चा केलेली असल्यामुळं तूर्त एवढं जरी करता आलं तरी पाल्याच्या विकासाची एखादी वाट गवसेल.

**समान दृष्टिकोन असू द्या-**

स्त्री-पुरुष समानता हे एक मूल्य आपण मानलं आहे. स्त्री देखील पुरुषाप्रमाणे सर्व क्षेत्रात समर्थपणे कार्य करू शकते. त्या त्या क्षेत्रातील आव्हानांना सामोरी जाऊ शकते. अनेक जबाबदाऱ्या सांभाळू शकते ही गोष्ट स्त्रियांनी सिद्ध करून दाखविली आहे. असं असलं तरी स्त्रियांकडे समानतेच्या भावनेनं पाहिलं जातं का? याचा सर्वांनीच अंतर्मुख होऊन विचार करायला पाहिजे. आज स्त्रियांसाठी अनेक क्षेत्रात जागा राखीव ठेवल्या जातात. महिला आरक्षणासारखं विधेयक आज सम्मत होण्याच्या मार्गावर आहे. शिक्षणामध्ये त्यांना सवलती दिल्या जात आहेत. राजकारणातही ३३% आरक्षण त्यांना दिलं गेलं आहे. या साऱ्या गोष्टी उपलब्ध झाल्यात म्हणजे स्त्री-पुरुष समानता निर्माण होईल कां? कायद्याने ह्या गोष्टी प्रस्थापित होणाऱ्या नाहीत. ही वरवरची मलमपट्टी झाली. स्त्रियांकडे बघण्याची समाजाची मानसिकता बदलली पाहिजे. ही मानसिकता कशी बदलेल? पाल्याला घरातूनच तसं शिक्षण आणि संस्कार मिळायला हवेत. ही जबाबदारी पालकांची म्हणजे आई-वडील या दोघांचीही आहे. परवा एका मित्राकडे जेवायला जाण्याचा योग आला. मी अगदी वेळेवर पोचलो. ताटपाट मांडणं सुरू होतं. त्यांचा ७/८ वर्षांचा मुलगा आईला विचारू लागला. "आई मी रांगोळी काढू? चटणी वाढू?" आईनं काय उत्तर द्यावं? 'मुलीसारखं काय करतोस? रांगोळी काढण्यापेक्षा काकांना कविता म्हणून दाखवं. म्हणजे आईनं ठरवून टाकलं आहे की रांगोळ्या काढणं, वाटणं, ताटपाट घेणं हे मुलींचं काम. मुलांनी या क्षेत्रात यायचं नाही. घराघरांतून सामान्यपणे हेच चित्र बघायला मिळतं. घरातील झाडझूड, आईला स्वयंपाकात मदत, पाणी भरण्यात, कपडे धुण्यात मदत करणं हे मुलीचं काम. मुलांना ही कामं करण्याची सवय का लावली जाऊ नये. केवळ तो मुलगा आहे म्हणून? मुलाच्या शिक्षणाचा, त्याच्या भवितव्याचा आपण जेवढा आस्थापूर्वक विचार करतो तेवढाच मुलीच्या संदर्भात करतो का? आपल्या या दृष्टिकोनामुळेच मुलीच्या ठिकाणी एक न्यूनगंड तयार होतो आणि मुलांमध्ये पुरुषी अहंकार रुजला जातो. मुला-मुलींमध्ये कुठलाही भेदभाव न बाळगता घरात दोघांनाही समान संधी, समान अधिकार देणं हे पालक म्हणून आपलं काम आहे. पण यासाठी आपल्याला आणि आपल्या जीवनपद्धतीला बदलावं लागेल. शेवटी मुलं आपलंच अनुकरण करीत असतात. आपले बाबा आपल्या आईचा योग्य तो सन्मान राखतात, आईनं मांडलेल्या वेगळ्या व विरोधी विचारांचंही स्वागत करतात, तिला घरकामातही मदत करतात आणि सामाजिक कार्य करायलाही तिला प्रोत्साहित करतात. एक स्वतंत्र व्यक्तिमत्त्व म्हणून तिला बाबांइतकंच घरात स्थान आहे ही गोष्ट आपल्या वर्तनातून मुलांना बघायला मिळाली तर स्त्री-पुरुष समानता हे मूल्य सहजपणे मुलांमध्ये संक्रमित होईल. त्यासाठी वेगळ्या प्रयत्नांची गरज नाही. पुरुषप्रधान संस्कृती आम्ही स्वीकारलेली असली तरी त्यात पुरुषी अहंकार असता कामा नये. अशा पद्धतीनं आपल्या घरातील वातावरण निर्मिती करू शकलो तर एका नव्या समाजाची, सामाजिक परिवर्तनाची ती नांदी ठरेल. आपल्या पाल्याकरिता आपल्याला हे करावं लागणार आहे.

**पाल्याला स्वतःहून शिकू द्या-**

आपल्या पाल्याला चांगल्या शाळेत प्रवेश मिळावा. उत्तम शिक्षण मिळावं आणि तो उत्तम रीतीनं उत्तीर्ण व्हावा ही प्रत्येक पालकाची इच्छा असते. सुशिक्षित आणि जागृत पालक यासाठी आपल्या पाल्याला सर्वतोपरी मार्गदर्शन आणि सहकार्यही करीत असतात. पण हे करतांना पालकांनी नवा शैक्षणिक दृष्टिकोनही समजून घेतला पाहिजे. अन्यथा तुमच्या सहकार्याचा आणि मार्गदर्शनाचा वाईट परिणाम पाल्यावर होऊ शकतो.

पहिली गोष्ट ही की शाळेत जाणाऱ्या पाल्यांची श्रद्धा त्याच्या शिक्षकावर असते. शिक्षक जे सांगतील जे बोलतील त्यावर त्याची पूर्ण श्रद्धा असते. आणि ती असलीही पाहिजे. कारण 'श्रद्धावान लभते ज्ञानम्।' हे शिक्षणाचं सूत्र आहे. आईवडिलांनी एखादी गोष्ट सांगितली असेल तर अनेकदा मुलं आईबाबांना सांगतात की त्यांच्या गुरुजींनी असं नाही सांगितलं. गुरुजी सांगतात तेच खरं असा त्यांचा

विश्वास असतो. शिक्षक हे त्यांचं श्रद्धास्थान असल्यामुळे पालकांनी शिक्षकाविषयी पाल्यासमोर अनादराने बोलू नये. अनेक पालक मुलांसमोर 'त्या मास्तराला काय समजते! आजकालचे मास्तर शिकवत नाही. शिकवण्या करून लोकांना लुटत असतात.' अशा प्रकारचे उद्‌गार काढून पाल्याच्या शिक्षकाविषयीच्या आदर भावनेला, श्रद्धेला ढळ पोचवत असतात. पाल्याला वाटणारा हा आदरभाव, श्रद्धाच जर नष्ट झाली तर त्याचं खऱ्या अर्थानं शिक्षण होईल का? विद्याप्राप्ती होईल का? एखाद्या शिक्षकाविषयी तुमचा आक्षेप असू शकतो. शिक्षकाच्या काही चुकाही तुमच्या लक्षात आल्या असतील. पण त्या पाल्यासमोर बोलण्याचं कारण नाही. त्या शिक्षकाशी, मुख्याध्यापकाशी भेटून बोलता येईल. मुलांसमोर, त्यांच्या उपस्थितीत त्याच्या श्रद्धास्थानाला अपमानीत करण्याचं पालकांनी कटाक्षानं टाळलं पाहिजे.

काही पालक मुलांना अनेक विषय घरी शिकवीत असतात. शिकवायलाही हरकत नसते. पण हे शिकवत असतांना पालकांनी शिक्षकांच्या अध्यापन पद्धती कोणत्या आहेत यांची शिक्षकांना भेटून चर्चा करून माहिती करून घेतली पाहिजे. तुम्ही आणि तुमचा पाल्य यात किमान २५ वर्षांचं अंतर आहे. आणि या २५ वर्षात शिक्षणात अभ्यासक्रमापासून तो अध्यापन-अध्ययन पद्धतीतही खूप बदल घडून आला आहे. त्यामुळं २५ वर्षांपूर्वी तुमच्या शिक्षकांनी एखादा गणिताचा घटक ज्या पद्धतीनं तुम्हाला शिकवला असेल त्याच पद्धतीनं आजचे शिक्षक शिकवीत असतील असं नाही. मुलांना तुम्ही आपल्या पद्धतीनं शिकवायला लागलात की मुलांच्या मनात संभ्रम निर्माण होतो. बाबा सांगतात ते बरोबर की शिक्षक सांगतात ते बरोबर. या संभ्रमामुळेही अनेकदा मुलांची शिकण्याची वृत्ती कमी होते. हे टाळायचं असेल तर पालकांनी आपल्या पद्धतीनं त्याला शिकवू नये आणि शिकवायचं असेल तर शिक्षकांशी भेटून चर्चा करून अध्यापन पद्धती समजून घेतली पाहिजे.

खरं तर शिक्षकांनी आणि पालकांनी मुलांना शिकवूच नये, असं शिक्षण शास्त्रज्ञ म्हणतात. याचा अर्थ जरा खोलात शिरून समजून घेण्याची गरज आहे. ज्ञानाचा, माहितीचा प्रचंड विस्फोट झालेला असल्यामुळं दर क्षणाला नवनवीन माहिती, ज्ञान उपलब्ध होत आहे. आजचं ज्ञान उद्याला टाकाऊ होणार आहे. आजचं तंत्र उद्याला उपयुक्त ठरेल याची खात्री देता येत नाही. आजचं शतक तर माहितीचं शतक आहे, उद्याचा समाज हा सतत शिकणारा समाज असणार आहे अशा परिस्थितीत प्रत्येकाला अधिकाधिक ज्ञान, माहिती प्राप्त करणं आवश्यक राहणार आहे. त्यामुळं प्रत्येकाला स्वतःहून शिकण्याची, अद्यावत ज्ञान प्राप्त करण्याच्या पद्धती शिकण्याची गरज आहे. तेव्हा आपल्या मुलाला केवळ परीक्षेत पास करणारं शिक्षण देण्यापेक्षा तो स्वतःहून शिकेल, अधिकाधिक ज्ञान प्राप्तीसाठी धडपडेल असं वातावरण पालकांनी घरात निर्माण केलं पाहिजे. त्यासाठी त्याला मदत केली पाहिजे, तशा सुविधा उपलब्ध करून दिल्या पाहिजे. ती उद्याची गरज आहे.

स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाची दखल घ्या!

आपला पाल्य ही आपली कार्बन कॉपी नाही. त्याला स्वतंत्र असं व्यक्तिमत्त्व आहे. याची दखल आपण घेत नाही. मुलाला आपण या घरातील एक महत्त्वाचा घटक आहे, आपल्या विचारांची, कल्पनांची दखल घेतली जाते असं वाटलं पाहिजे. पण सामान्यपणे प्रत्येक घरात डोकावलं तर काय दिसतं? तू अजून लहान आहे. तुला काही समजत नाही. अशा शब्दांनीच पालक पाल्याशी बोलत असतात. पाल्यांनी एखादी गोष्ट सुचवली तरी त्याची संभावना याच शब्दांनी केली जाते. आपल्या घरात अनेक सण, कार्यक्रम होत असतात. हे करताना आपण कधी मुलांचा सल्ला घेतो का? अनेकदा अनेक कठीण समस्यांची उत्तरं मुलं सहजपणे सुचवून जातात, पण आपण त्याला काही येतं, तो एखाद्या समस्येचं निराकरण करू शकतो, यावर विश्वास ठेवायला तयार नसतो. त्यामुळं मुलंही तटस्थपणे वागू लागतात.

प्रत्येक मुलाच्या हातून लहानसहान चुका होत असतात. मोठ्या माणसांकडून चुका होत नसतात का? ती तर मुलंच आहे अशा वेळी त्याला शिवी देऊन त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा अपमान करू नका. सारख्या शिव्या देणं, अपमानीत करणं अशा कृतीमुळं पाल्याचा पालकाविषयी असणारा आदरभाव कमी होऊ लागतो. एखाद्या स्पर्धेत, एखाद्या परीक्षेत आपल्या पाल्याला कमी गुण मिळालेत, त्याला अपयश आलं तर त्याला अपमानास्पद न बोलता पुढच्या वेळी यश प्राप्तीसाठी प्रेरणा द्या. त्याच्या पाठीशी उभं राहा. 'शेजारचा बाळू बघ कसा पहिल्या क्रमांकात पास झाला आणि तू?' अशा पद्धतीनं इतर मुलांशी तुलना करून किंवा इतरांसमोर त्याचा उपहास करून त्याच्या व्यक्तिमत्त्वाला कमी लेखण्याचा प्रयत्न झाला तर पाल्यावर त्याचे विपरीत परिणाम होत असतात. आपल्या घरातही दोन मुलं असतील. त्यात एक खूप हुशार असेल आणि एक साधारण बुद्धीचा असेल. अनेकदा इतरासमोर आपण आपल्या हुशार मुलाचं अधिक कौतुक करतो आणि दुसऱ्याला कमी लेखतो. साधारण बुद्धीच्या मुलाला इतर अनेक गोष्टी चांगल्या येत असल्या उदा. खेळात त्याची प्रगती चांगली असेल, त्याचा आवाज सुंदर असेल, तो मूर्ती छान तयार करीत असेल तरी देखील परीक्षेत तो मागे पडला म्हणून इतरांसमोर त्याला कमी लेखण्याचं कारण नाही. इतरासमोर आपल्या मुलांचे दोष

दाखविण्यापेक्षा त्यांच्या विशेष गुणांचं, त्याच्या व्यक्तिमत्त्वाच्या एखाद्या विशेष पैलूचं आवर्जून कौतुक करा. मुलांच्या अवगुणांचा, दोषाचाच इतरांपुढं उच्चार करीत गेल्यास त्यातील काही चांगले गुण प्रगट करायला संधीच मिळणार नाही. उलट कुणी आलं तर त्यांच्यापुढे मुलं किमान तुम्ही असतांना यायला भितील. इतरांपुढं आई-वडील आपला अपमान करतात, ही भावनाच त्यांच्या मनात घर करून राहील. मुलांना एकटं असतांना प्रेमानं त्याचे दोष दाखवा त्यांना राग येणार नाही उलट ते दोष दूर करण्याच्या दृष्टीनं ते प्रयत्न करतील. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा अवमान होणार नाही. आपल्या अपशब्दानं त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला दुर्लक्षित केलं जाईल असा व्यवहार त्याच्याशी आमचा असू नये. उलट घरातील अनेक कार्यात, प्रसंगात त्याला सहभागी करून घेतलं पाहिजे. पाल्याचं मन वा विचार प्रत्येकवेळी स्वीकारार्हच असेल असं नाही. पण त्याचे मन जाणून घेण्याचा प्रयत्न केला तर त्याला आपणही या घरातील एक महत्त्वाची व्यक्ती आहोत हा भाव निर्माण होऊन तो अधिक कार्यप्रवण होईल. हे लक्षात घेऊन पालकांनी पाल्याच्या व्यक्तिमत्त्वाची योग्य ती दखल घेणं हे त्याच्या व्यक्तिमत्त्व विकासासाठी उपयुक्त ठरेल.

आपल्या पाल्यासाठी पुष्कळ काही करावं लागेल. पण किमान ह्या सहा सूत्रांचा वापर आवर्जून केला पाहिजे. आणि हे सारं करण्यासाठी वेळ काढला पाहिजे. If You don't have time for your child, don't be a parent. Parenting is a time consuming and a full time job. म्हणूनच पालक होणं आणि चांगले पालक होणं ही अतिशय अवघड गोष्ट असली तरी आपली मुलं ही आपली राहावीत आणि 'माणूस' म्हणून त्याची घडण व्हावी म्हणून आपल्याला चांगले पालक, जबाबदार पालक व्हायलाच हवं!



# पालकांनो याचा शोध घ्या

- तुमच्या पाल्याला तुमची भीती वाटते की आदर, की आदरयुक्त भीती?
- आपला पाल्य आपल्याशी विश्वासानं, आणि मोकळं बोलतं का?
- पाल्यांच्या अडचणी काय आहेत?
- त्याला नेमकं काय हवं आहे?
- तो खोटं बोलतो काय? कां?
- त्याची नेमकी आवड, रुचीं कशात आहे?
- कोणते गुण त्याच्यात दिसतात?
  नेतृत्त्वाचे/कार्यकर्त्याचे/वक्तृत्वाचे/गायक/नट/संघटकाचे/उद्योग इत्यादी.
- तो आईशी, भावंडाशी, मित्रांशी कसा वागतो?
- शाळेत, कसा वागतो? शिक्षकांशी कसा वागतो?
- शेजाऱ्यांशी कसा वागतो?
- मित्र, मैत्रिणी कोण? ते कसे आहेत?
- आपल्या जवळील वस्तू इतरांना देतो काय?

**मित्रांनो!**
**या शोधाचं स्वरूप पोलिसी असू नये.**
**सहजपणे आणि पाल्याच्या लक्षात न येऊ देता घेता आला पाहिजे.**
**या शोधावरच बरंच काही अवलंबून आहे.**
**जागृत पालकाला सहज जमेल हे.**

**आपली मुले- आपली मूल्य**

# ४. नवी स्वप्ने द्या!

दहावी, बारावी परीक्षेचा निकाल जाहीर झाल्यानंतर गुणवत्ता यादीत असलेल्या मुलामुलींचे फोटो आणि त्यांची मनोगतं वृत्तपत्रातून प्रसिद्ध झालीत. ही मनोगतं वाचता एक लक्षात आलं की गुणवत्ता यादीत आलेल्या बहुतेक मुलांची इच्छा इंजिनिअर (मग ते संगणक क्षेत्रात असो की इतर क्षेत्रात असो) व्हावं ही आहे. काहींनी वैद्यकीय क्षेत्रात जायचं ठरवलं आहे. काही थोड्या मुलांनी प्रशासकीय क्षेत्राकडे जाण्याची इच्छा व्यक्त केली आहे. पण मनोगतांचा सर्वसाधारण गोषवारा लक्षात घेतला तर काही विशिष्ट आणि मर्यादित क्षेत्राकडेच जाण्याचं स्वप्नं या गुणवत्ता यादीतील विद्यार्थ्यांनी जोपासली आहे असं लक्षात येतं. या बुद्धिवंत विद्यार्थ्यांपैकी एकानंही मला चांगला प्राध्यापक व्हायचं आहे, शिक्षक व्हायचं आहे, पत्रकार व्हायचं आहे, चांगला भाषांतरकार व्हायचं आहे, यशस्वी उद्योजक व्हायचं आहे असं मनोगतातून सांगितलेलं नाही, जणू बुद्धिवंतासाठी ही क्षेत्रच नाहीत असा त्यांचा ग्रह झालेला असावा. या विद्यार्थ्यांनी मनोगतातून जी ध्येयं, जी स्वप्नं सांगितली ती त्यांचीचं स्वतःची स्वप्नं असतात का? आज शे-पाचशे रुपयांवर काम करणाऱ्या इंजिनिअर्सची संख्या कमी नाही. शहरातील गल्ली बोळात 'दवाखाना' पाटी लावून बसणाऱ्या डॉक्टरांची संख्याही वाढली आहे. असं असूनही या क्षेत्रात एक जीव-घेणी स्पर्धा आहे. प्रचंड मेहनत घेऊन उत्तम गुण प्राप्त केलेल्या मुलांना जेव्हा १/२, १ गुण कमी मिळाल्यामुळे या क्षेत्रात प्रवेश नाकारला जातो तेव्हा त्यांची ही स्वप्नं जमीनदोस्त होतात आणि विद्यार्थ्यांमध्ये प्रचंड निराशा येते ही वस्तुस्थिती दिसत असूनही पालकांचा आणि पाल्यांचा ओढा याच क्षेत्राकडे अधिक असलेला दिसतो. मुलांच्या एकूण स्वप्नांचा शोध घेतल्यास लक्षात येतं की ती स्वप्नं त्यांच्यापेक्षा त्यांच्या पालकांनीच पाहिली असतात. आणि पाल्यांच्या माध्यमातून ती पूर्ण करण्याचा त्याचा प्रयत्न असतो. एखाद्या सुखवस्तू कुटुंबातील पाल्याला 'तुला कोण व्हायचं? असं विचारलं आणि त्यानं 'मला गाडीचा ड्रायव्हर व्हायचं आहे' असं उत्तर दिलं तर त्या पालकांचे चेहरे बघण्यासारखे होतात. आपण डॉक्टर आपली पत्नी डॉक्टर आणि मुलगा काय होणार तर 'ड्रायव्हर' जणू प्रचंड आघात झाल्यासारखं पालकांना वाटतं. त्यांच्या स्वप्नातही ही गोष्ट बसणारी नसते. तो मुलगा पुढे काय व्हायचं ते होईल पण त्याक्षणी आपला चेहरा गोरामोरा करण्यापेक्षा, त्याचं स्वप्न उध्वस्त करण्यापेक्षा असा ड्रायव्हर हो की आयुष्यात गाडीला एकही अपघात होणार नाही.' असं म्हणता येईल कां आपल्याला? सांगता येईल का त्याला? स्वामी विवेकानंदांना लहानपणी कुणी तरी विचारलं, 'नरेंद्र, तुला कोण व्हायचं?' नरेंद्रानं उत्तर दिलं, 'मला व्हिक्टोरिया चालक व्हायचं आहे.' त्यावेळी त्याचे पालक त्याच्यावर रागावले नाहीत उलट त्यांनी त्याला भिंतीवर लागलेलं अर्जुनाच्या रथाचं चित्र दाखवून सांगितलं, "नरेंद्रा, सारथीच व्हायचं असेल तर कृष्णासारखा सारथी हो. देशाच्या, समाजाच्या रथाचं सारथ्य कर." अशी स्वप्नं आपण आपल्या पाल्याला देऊ शकणार नाही का?

गुणवान, बुद्धिमान पाल्याचा एका ठराविक क्षेत्राकडे ओढा असणं आपण समजून चालू या. पण सर्वसाधारण बुद्धिमत्ता असलेल्या मुलांनाही त्याच्या क्षमता लक्षात न घेता आपण कोणती स्वप्नं देतो, त्यांच्याकडून पालक म्हणून आपण कोणत्या अपेक्षा ठेवतो? याचा पालकबंधूंनी अंतर्मुख होऊन विचार करायला पाहिजे. आता आपण एकवीसाच्या शतकात प्रवेश केला आहे. हे शतक व्यक्तिगत आणि सामुहिक पात्रतेचे शतक असणार आहे. या शतकात आपला देश, जगाचं नेतृत्त्व करेल अशी परिस्थिती निर्माण होत आहे. त्यामुळे प्रत्येकाला स्वतःच्या क्षमता, स्वतःची कौशल्यं समजून घेऊन त्याचा विकास करण्याची गरज आहे. केवळ एखाद्या संगणकासारख्या क्षेत्रात आघाडी घेऊन देश जगाचं नेतृत्त्व करण्याची क्षमता प्राप्त करू शकणार नाही तर देशातील, समाजातील सर्व क्षेत्राला विकसित, सृजनशील व विवेकी नेतृत्त्व देण्याची गरज आहे. आपल्या देशाची आजची अवस्था आपण डोळसपणे पाहिली तर लक्षात येतं की सर्व क्षेत्रात जणू आम्ही नेतृत्त्व हरवून बसलो आहे. सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक ही सारीच क्षेत्र विवेकी आणि सृजनशील नेतृत्त्वाला पारखी झाली आहेत. ही क्षेत्रं अशा नेतृत्त्वाच्या प्रतिक्षेत आहेत. समाजाच्या सर्व क्षेत्रात असं नेतृत्त्व देण्याचं काम कोण करेल? केवळ शाळेच्या माध्यमातून आजच्या पुस्तकी आणि परीक्षार्थी निर्माण करणाऱ्या शिक्षणातून हे आव्हानं स्वीकारलं जाऊ शकेल का? या नेतृत्त्वाची पाया भरणी घराघरातून व्हायला हवी. घराघरातून तशा प्रकारचं शिक्षण आणि प्रेरणा मिळायला हव्यात आणि ही जबाबदारी पालक म्हणून आपल्यालाच घ्यावी लागेल. ही जबाबदारी घेण्यासाठी प्रथम आपल्याला आपला दृष्टिकोन बदलला पाहिजे. एका ठराविक क्षेत्राकडे असणारा आपला ओढा कमी झाला पाहिजे. कोणतं क्षेत्र वाईट नाही, ही आपली मानसिकता तयार झाली पाहिजे. अशी पालक म्हणून आपली मानसिकता तयार झाली की आपण आपल्या पाल्यांना नवी स्वप्ने देऊ शकतो आणि त्या स्वप्नांच्या पूर्तीसाठी अनुकूल वातावरणही निर्माण करू शकतो.

आज समाजाच्या अनेक क्षेत्रात काम करायला ध्येयवादी, प्रामाणिक माणसाची आवश्यकता आहे. समाजात स्वयंसेवी वृत्तीनं काम करणाऱ्या अनेक संघटना आहेत पण काम करायला कार्यकर्ते नाहीत. स्त्रियांच्या अनेक समस्या आहेत पण त्या सोडविण्यासाठी स्त्रियांमधून आवश्यक ते नेतृत्त्व पुढे येताना दिसत नाही. आज शाळांची संख्या वाढती असली तरी खऱ्या अर्थानं 'माणूस घडविणाऱ्या' शाळांची उणीव प्रकर्षानं जाणवत आहे. कुठलाही पक्षाभिनिवेष न बाळगता देशहित, समाजहिताशी बांधिलकी राखून सरकारच्या चांगल्या योजनाचं समर्थन व अनिष्ट धोरणांना विरोध त्यासोबत समाजप्रबोधन करणारी वृत्तपत्रे आणि पत्रकार याची समाजाला आवश्यकता आहे. पोटभरू आणि सत्तेवर डोळा ठेवून अपंग, दलित, आदिवासी यासाठी काम करणाऱ्या नेत्यापेक्षा आपल्या ह्या बांधवांनाही स्वातंत्र्य, समता, न्याय मिळवून देण्यासाठी सर्वस्व झोकून कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांची गरज आहे. बोगस पदव्या लावून खेड्यापाड्यांतील गोरगरिबांना लुबाडणाऱ्या, वैद्यकीय व्यवसायाला काळिमा फासणाऱ्या डॉक्टरांना हद्दपार करायचं असेल तर उच्चपदवी प्राप्त करणाऱ्या डॉक्टरांना खेड्यापाड्यात राहण्याची, जाण्याची तयारी ठेवावी लागेल. पण ह्या समाजाच्या गरजा, अपेक्षा अशा सहजासहजी पूर्ण होणाऱ्या नाहीत त्यासाठी सामूहिक प्रयत्नांची आवश्यकता आहे.

आपल्या मुलाला डॉक्टर व्हायचं स्वप्न जरूर द्या पण डॉक्टर होऊन खेड्यापाड्यातील जनतेच्या सेवेसाठी ज्ञान खर्च करण्याची प्रेरणा द्या. आपल्या पाल्यांनी बाबा आमटे शिवाजीराव पटवर्धन झालं पाहिजे असं कुठल्याच पालकांना वाटत नाही. आपल्याही मुलांनी हे क्षेत्र निवडावं, या क्षेत्रात पुढं यावं अशी प्रेरणा द्या. चांगला नगरसेवक हो, मंत्री हो, सहकार महर्षी हो. कृषिपंडित म्हणून पुढे ये, सर्व गुणवत्ता प्राप्त करून एखादी आदर्श शाळा, गुरुकुल स्थापन कर, निर्भिड पत्रकार हो, अपंग बांधवांसाठी आपलं आयुष्य खर्ची घाल. अनुताई वाघ होण्याचं ध्येय ठेव. मदर टेरेसा होता येईल का तुला याचा विचार कर. अशी स्वप्नं आपल्या मुलांच्या मनात कां रुजवता येऊ नये आपल्याला? मुलाला चित्रकलेची आवड असेल तर तो चांगला चित्रकार व्हावा, एखाद्या मुलाचा आवाज चांगला असेल, संगीतात रुची असेल तर तो चांगला गायक व्हावा म्हणून आपण सर्वतोपरी प्रयत्नही करतो. खेळात त्याची प्रगती असेल तर सचिन, गावसकरचे आदर्श आपण त्याच्यासमोर ठेवतो. पण अशी कित्येक क्षेत्र आहेत की त्याकडे आपल्या मुलांनी लक्ष द्यावं. ती निवडावीत असा आपला प्रयत्न नसतो. कटाक्षही नसतो. उलट ही क्षेत्रं आपल्या दृष्टीने उपेक्षित असतात. ६ ते १५ या वयोगटातील मुलांच्या मनात अशी वेगळी स्वप्नं पेरण्याची, रुजविण्याची आज आवश्यकता आहे. आपण दिलेल्या स्वप्नाप्रमाणेच तो घडेल असंही समजण्याचं कारण नाही. आज सर्वच क्षेत्रात चांगलं घडावं आणि आजचं अनुभवाला येणारं विदारक चित्र बदलावं असं जर आपल्या सर्वांना वाटत असेल तर मग सर्व क्षेत्राला चांगली माणसं, चांगलं नेतृत्त्व पुरवणं ही देखील आपली जबाबदारी आहे. मुलांना चांगली स्वप्नं देणं, या विविध क्षेत्रात जाण्यासाठी प्रेरणा देणं हे पालक म्हणून आपलं काम आहे आणि हे आपण करू शकतो हा विश्वास बाळगून ते करायचं आहे. केवळ सुखवस्तू, भोगवादी जीवनाच्या मागे लागण्यापेक्षा त्यागातही कसा आनंद असतो. इतरांना सुखी, आनंदी करण्यासाठी झिजण्यातला आनंद कसा वेगळा असतो हा संस्कारही चांगल्या स्वप्नांच्या माध्यमातून मुलांच्या मनावर बिंबविता येतो. तेव्हा चांगले पालक होणं म्हणजे अशी नवी उदात्त स्वप्नं मुलांना देणं असं म्हटल्यास अतिशयोक्ती होऊ नये.



# आपण एवढं कराच !

- ◆ आपल्या पाल्याला भरपूर प्रेम द्या !
- ◆ हे करू नको, ते करूं नको असं सांगण्यापेक्षा त्याला करता येईल अशा जमेल त्या गोष्टी करु द्या!
- ◆ मुलांना मोकळ्या मनानं खेळू द्या!
- ◆ मुलांनी जसे वागावे अशी इच्छा असेल तसे स्वतः वागा!
- ◆ मुलांना दिलेली वचनं कटाक्षानं पाळा!
- ◆ दिवसातला थोडा वेळ आपल्या पाल्यासाठी राखून ठेवा!
- ◆ मुलगा किंवा मुलगी असा भेदभाव न करता दोघांनाही समान वागणूक द्या.
- ◆ घर हे आद्य विद्यामंदिर आहे. ते लहान मोठं केवढंही असो ते स्वच्छ व नीटनेटकं राखण्याचा सर्वांनी मिळून प्रयत्न करा!
- ◆ या आद्य विद्यामंदिरात वातावरण सदैव आनंदी व प्रसन्न राहील, अशी काळजी घ्या!
- ◆ आपल्या पाल्याच्या शारीरिक, भावनिक आणि बौद्धिक विकासासाठी व आरोग्यासाठी जागरुक व प्रयत्नशील राहा!

.....................................................................................................

**बंधू-भगिनींनो,**
**आजच्या विज्ञानयुगात गतिमान जीवनामुळं अनेक समस्या निर्माण झाल्या आहेत.**
**वाढत्या गरजांमुळे दोघांनाही नोकरी करावी लागते आहे.**
**अडचणी अनंत आहेत. पण आपल्याच स्वप्नांच्या पूर्तीसाठी,**
**आपल्याच मुलांच्या विकासासाठी एवढं करायलाच पाहिजे. नाही कां?**
**''सुसंस्कृत कुटुंब हीच एक मोठी आदर्श शाळा आहे.**
**आणि सदाचारी माता-पिता यांच्या तोडीचे चांगले शिक्षक संभवत नाही''**
**- महात्मा गांधी.**

# ५. श्रीमंती अनुभवाची

जाबालक ऋषीची एक गोष्ट मी लहानपणी ऐकली होती. जाबालक हा एक जंगलात राहणारा आदिवासी मुलगा. त्याला एखाद्या आश्रमात जाऊन गुरूकडून विद्या शिकण्याची इच्छा झाली. या तीव्र इच्छेपोटी तो एका गुरूकडे गेला. गुरूच्या पायावर नतमस्तक होऊन त्यानं त्यांना शिष्य करून घेण्याची, शिक्षण देण्याची विनंती केली. गुरूनं आपादमस्तक त्याला न्याहाळलं आणि आपल्या आश्रमात प्रवेश देता येणार नाही म्हणून सांगितलं. पण जाबालकानं हट्टच धरला. आश्रमातून परत जायला तो तयार नव्हता. त्याचा हा निग्रह बघून ऋषी म्हणाले, ''जाबालक, मी तुला एका अटीवर शिष्य करून घ्यायला तयार आहे. अट अशी, की मी तुला एक गाय देतो ती घेऊन जा आणि या गायीपासून शंभर गायी झाल्या की परत ये मी तुला शिष्य करून घेईन आणि सारी विद्याही शिकवेन.'' जाबालकानं ती अट मान्य केली व गुरूनं दिलेली गाय घेऊन तो परतला. बघता बघता त्याच्या जवळील गोधन वाढू लागलं पण गायीच्या या वाढत्या संख्येबरोबर अनेक समस्यांना त्याला तोंड द्यावं लागलं. गायीचं आरोग्य चांगलं राहावं म्हणून त्यांना कोणतं खाद्य द्यायचं? त्यांना रोग होऊ नये म्हणून आणि रोग झाल्यास कोणती औषधं द्यायची याचा अभ्यास आणि संशोधन करावं लागलं. शंभर जनावरासाठी गोठे कसे बांधायचे याची संकल्पना करून तसं बांधकाम करावं लागलं. हिंस्त्र प्राण्यापासून त्यांचं संरक्षण करण्याची व्यवस्था करावी लागली. एवढ्या गाईपासून निघणाऱ्या दुधाची योग्य ती विल्हेवाट लावण्याची रचना करावी लागली. गोठ्यात साचणाऱ्या शेणाची व्यवस्था लावावी लागली. या साऱ्या गोष्टी करताना अनेक विषयांचा अभ्यास झाला. विविध प्रकारचे अनुभव त्याला घ्यायला मिळाले शेवटी १०० गायी झाल्याबरोबर ते सारं गोधन घेऊन तो गुरुकडे गेला आणि म्हणाला, 'गुरुदेव, आपण सांगितल्याप्रमाणे शंभर गायी झालेल्या आहेत आणि हे गोधन घेऊन मी आपल्याकडे आलो आहे. आता आपण मला शिष्य करून घ्यावं. ज्ञानदान करावं अशी माझी विनंती आहे.' जाबालकानं आणलेलं गोधन बघून ऋषी आश्चर्यचकित झाले. जाबालकाला ते म्हणाले, 'जाबालका एका गाईच्या शंभर गाई होण्यासाठी तू जितकी वर्षे घालवली आणि या काळात तू जे विविध अनुभव घेतलेस, अनेक विषयांचा अभ्यास आणि संशोधन केलसं ते इतकं मोठं आहे, की

या क्षेत्रातील तुझ्या ज्ञानाला तोड नाही. तू माझा शिष्य होण्यापेक्षा अनेकांनी तुझं शिष्यत्व पत्करावं अशी तुझी योग्यता आहे. आता मीच तुला प्रणाम करतो कारण तू आता जाबालक राहिलेला नाही महर्षी जाबालक झाला आहेस.' तात्पर्य, असे की अनुभवासारखा दुसरा शिक्षक नाही. प्रत्यक्ष अनुभवाद्वारे जे शिक्षण दिलं जातं ते रुजतं आणि व्यक्तिमत्त्वाला आकारही देतं.

शिक्षण म्हणजे काय? व्यक्तिमत्त्वाचा सर्वांगीण विकास. जीवनाची परिपूर्ण तयारी. व्यक्तिमत्त्वाचा विकास म्हणजे व्यक्तिच्या ठिकाणी असणाऱ्या सर्व सुप्त शक्तीचा, क्षमताचा विकास. यात बौद्धिक, भावनिक, शारीरिक, अध्यात्मिक व सृजनशीलता या सर्व अंगाचा विकास अभिप्रेत आहे. या क्षमताचा विकास शिक्षणातून व्हावा आणि तसं शिक्षण मिळावं, दिलं जावं ही अपेक्षा आहे. पण वास्तव काय आहे? आज 'शाळा' या शिक्षण केंद्रातून दिलं जाणारं शिक्षण मुलांच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीनं परिपूर्ण आहे असं म्हणण्याचं धाडस कुणीही करणार नाही. आज अधिकाधिक गुण मिळविण्याची, केवळ परीक्षार्थी निर्माण करण्याची जी एक जीवघेणी स्पर्धा सुरू आहे त्यातून व्यक्तिमत्त्व घडण्याऐवजी ते खुरटून जात असल्याचाच अनुभव आपल्याला येतो आहे. पण याला केवळ शिक्षण संस्था जबाबदार आहे असं म्हणून आपण सुटू शकणार नाही. शाळा हे औपचारिक शिक्षण केंद्र आहे तर घर ही अनौपचारिक शिक्षण देणारी शिक्षण संस्था आहे आणि या दोन्ही संस्थेचा मुलाच्या सर्वांगीण विकासात महत्त्वाचा वाटा आहे. शाळांतून दिल्या जाणाऱ्या औपचारिक शिक्षणाचा आग्रह आपण आपल्या पाल्याला घरीही करू लागलो तर पाल्याची फार तर परीक्षेत मिळणाऱ्या गुणांची थोडी फार टक्केवारी वाढेल पण आपल्याला अपेक्षित अशा व्यक्तिमत्त्वाची घडण होणार नाही. अनेकदा शाळेतील अभ्यासाचाच घरीही आग्रह धरल्यामुळं त्याची अभ्यासातील रुचीही कमी होऊ शकते आणि त्यातून एक न्यूनगंडही निर्माण होऊ शकतो. मी पालकांना नेहमी एक प्रयोग करायला सांगतो. एखाद्या दिवशी पालकांनी मुलाला सांगायचं, 'दोन दिवस अजिबात अभ्यास करायचा नाही. हातात अभ्यासाचं पुस्तक दिसलं तर जेवायला घालणार नाही.' शिक्षा करेन. बघा काय परिणाम होतो ते. त्या दिवशी पाल्याला आश्चर्याचा आणि आनंदाचाही धक्का बसेल. त्याला वाटेल आपल्या आईबाबा इतके चांगले आईबाबा जगात दुसरे कुणीच नसावेत.' असं का वाटेल त्याला? तर आपण त्याच्यामागे सारखं लागतो ते अभ्यास कर! अभ्यास कर! म्हणून. या उलट शाळेत जे शिकवलं जातं ते पक्कं होईल. ते रुजेल असे अनुभव त्याला दिले गेले पाहिजे यासाठीच मुलांच्या सर्वांगीण विकासात पालक म्हणून आपली भूमिका काय असली पाहिजे हे समजून घेण्याची गरज आहे. पुढील पानावर दर्शविलेल्या चित्रातून ती अधिक स्पष्ट होईल.

## बालकांच्या सर्वांगीण विकासात तुमची भूमिका




| पालक | | शिक्षक |
|---|---|---|
| पूरक | ←(१)→ | प्रधान |
| पूरक | ←(२)→ | पूरक |
| प्रधान | ←(३)→ | प्रधान |
| प्रधान | ←(४)→ | पूरक |
| पूरक | ←(५)→ | पूरक |

या चित्रात क्रमांक १ मध्ये संज्ञापन असा शब्द वापरला असून त्या भागात भाषा, शास्त्रे, गणित, सामाजिकशास्त्रे असे शाळेत शिकविले जाणारे विविध विषय दिलेले आहेत आणि या विविध विषयांच्या अध्यापनातून विद्यार्थ्यांमध्ये ज्ञान, विविध कौशल्य, अभिरुची निर्माण व्हावी हा प्रयत्न केला जातो याचा संकेत दिलेला आहे. हे विविध विषय शिकवणं, अभ्यासक्रम पूर्ण करणं हे शिक्षकांचं महत्त्वाचं काम असल्यामुळे क्र. १ मध्ये शिक्षकाची भूमिका ही प्रधान दाखविली आहे. यात पालकांची भूमिका पूरक म्हटली असली, तरी शाळेत जे ज्ञान दिलं जातं ते पक्कं होण्यासाठी विविध प्रकारचे अनुभव देण्याचं कार्य पालकांनाच करायचं आहे. तुमचा पाल्य अनुभवानं जेवढा संपन्न, श्रीमंत होईल तेवढं त्याचं ज्ञानही अर्थपूर्ण, आशयधन व सेवापरायण होईल.

भाषा हा विषय शाळेतून शिकवला जातो. प्रत्येक भाषा शिकविण्याची काही उद्दिष्टं असतात. ती उद्दिष्ट आपल्याला माहिती नसली तरी मुलांना नीट बोलता आलं पाहिजे. आपला विचार प्रभावीपणे मांडता आला पाहिजे. मोठ्या व्यक्तीशी नम्रपणे, बहुमानार्थी बोलता आलं पाहिजे. आपल्या बोलण्यामुळं इतरांची मनं दुखवू नये ही काळजी घेतली पाहिजे. शाळेत जरी हे सांगितलं जात असलं तरी आपल्या सहवासात अधिक असणाऱ्या पाल्यांना आपणच हे शिकवलं पाहिजे. घरी येणाऱ्या माणसाचं चांगल्या शब्दात स्वागत करणं, चांगल्या शब्दांचा वापर करणं, बोलून विचार करण्यापेक्षा विचार करून बोलणं का आवश्यक आहे. हे सांगणं हे आपलंच काम आहे. आपण जसं इतरांशी बोलू तसं आपली मुलं बोलतील. आपल्या बोलण्यात अपशब्द अधिक येत असतील तर मुलंही तशीच शब्द वापरतील म्हणून मुलांसमोर आपला व्यवहार अधिक चांगला ठेवणं आवश्यक असतं. भाषा विषयात पत्रलेखन हा भाग शाळेत शिकवला जातो. पण केवळ परीक्षेमध्येच ते लिहायचं अशी मुलांची धारणा झाल्यामुळं व्यवहारात त्यांना चांगली पत्रं लिहिता येत नाही. पत्रांनी माणसं जोडता येतात. संपर्क ठेवता येतो व वृत्तपत्राच्या माध्यमातून एखाद्या सार्वजनिक व महत्त्वाच्या प्रश्नाकडे लोकांचं लक्ष वेधता येतं ह्याची जाणीव पालकांनी पाल्याला करून दिली पाहिजे. एखाद्या व्यक्तिनं किंवा आपल्या पाल्याच्याच वयाच्या मुला-मुलीनं एखादं चांगलं काम केलं असेल, एखाद्या क्षेत्रात यश प्राप्त केलं असेल आणि त्याला वृत्तपत्रातून प्रसिद्धी मिळाली असेल तर पालकांनी ती बातमी आवर्जून आपल्या पाल्याला वाचायला दिली पाहिजे. आणि त्या व्यक्तीचं अभिनंदन करणारं पत्र लिहायला प्रवृत्त केलं पाहिजे. एखाद्या वाईट गोष्टीचा निषेध करणारं पत्रही वृत्तपत्राकडे पाठविण्याची प्रेरणा त्याला दिली पाहिजे. महिन्यातून एखाद-दोन पत्रं पाल्यानी स्वतःहून लिहावीत असा प्रयत्न आपल्याला सहज करता येईल. मुलांनी घरी मम्मी, डॅडी म्हणायचं की आई-बाबा म्हणायचं, हे पालकांनीच ठरवायचं असतं. मुलांना कोणती भाषा द्यायची आणि मातृभाषेचा अभिमान कसा निर्माण करायचा ही पालक म्हणून आपलीच जबाबदारी आहे. मुलांना चांगल्या वक्त्याची भाषणं ऐकायला, पुस्तक प्रदर्शन बघायला, चांगल्या नाटकांना आवर्जून घेऊन गेलं पाहिजे. शाळा हे अनुभव देऊ शकणार नाही. आपल्यालाच हे त्याला दिले पाहिजे. भाषा शिक्षणाला आवश्यक असे पूरक अनुभव घरातून मिळू शकतात, देता येतात.

आज शहरातील तेही खुराड्यासारख्या घरातून राहणाऱ्या मुलांना अनेक गोष्टी बघायलाच मिळत नाही. सूर्योदय, सूर्यास्ताचं अनुपम सौंदर्य, न बघताच केवळ त्याचं वर्णन त्यांना अनेकदा लिहावं लागतं. अंगणात खाटेवर पडल्या पडल्या आकाशातील तारकांचं लावण्य वैभव न्याहाळण्याचा आनंद लुटता येत नाही. शाळेत मात्र ''नवटिकल्याची चंद्रकला ही गगनश्री नेसे, स्वर्गीचे भांडार पसरले (उघडले) की रात्री सरसे'' अशा कविता ते शिकत असतांनाही ते आनंदविभोर होऊ शकत नाही. कारण त्यांनी तो अनुभवच घेतलेला नसतो. यासाठी वेळ काढून मुलांना सूर्योदय, सूर्यास्त दाखविला पाहिजे. ठरवून त्यांना आकाश दर्शन घडवलं पाहिजे. बागेत नेऊन अनेक झाडांचा परिचय करून दिला पाहिजे. प्राणी संग्रहालय, वस्तुसंग्रहालय यांना भेटी दिल्या पाहिजेत. पोस्टाचे व्यवहार कळण्यासाठी पोस्टात घेऊन गेलं पाहिजे. दहा बारा वर्षाखालील मुलं अतिशय जिज्ञासू असतात. अनेक प्रश्न त्यांना पडत असतात. या प्रश्नांची उत्तरं या अनुभवातून त्यांना मिळतील. आपल्याला कंटाळा आला म्हणून फिरायला जातो, सहलीला जातो. सोबत मुलं असतात पण उद्देश्य असतो तो आपला व्यक्तिगत! मुलांना आपल्याला काही अनुभव द्यायचे आहेत. काही शिकवायचं आहे या हेतूनं त्यांना बाहेर नेलं पाहिजे. एकदा २०/२५ लहान मुलांना घेऊन मी नागपूर रेल्वेस्थानक बघायला गेली. ७/८ प्लॅटफॉर्म आहेत. ४-४ मुलांचे गट करून त्यांना एक-एक प्लॅटफॉर्म वाटून दिला आणि त्यांना सांगितलं की ४५ मिनिटं या प्लॅटफॉर्मवर तुम्ही भटकायचं. काय काय चांगल्या गोष्टी दिसतात आणि काय काय त्रुटी जाणवतात त्याची नोंद करायची आणि तुमच्या मते आणखी कोणत्या सोयी हव्यात तेही कागदावर नोंदवायचं. मुलं मुक्तपणे भटकली, काहींनी प्रवाश्यांशी संवाद केला, प्रश्न विचारले. एकानं स्वतःचं वजन करून बघितलं. वजन चूक दाखवलं याचीही नोंद घेतली. काहींनी गाडीच्या ड्रायव्हरला प्रश्न विचारलेत. आत जाऊन इंजिन बघितलं. घरी परतताना एका मुलानं जी प्रतिक्रिया व्यक्त केली तेवढीच महत्त्वाची असल्यानं ती फक्त सांगतो. तो मुलगा म्हणाला,

“सर, आई-बाबांसोबत गावाला जाण्याच्या निमित्तानं मी अनेकदा स्टेशनवर आलो. पण स्टेशन बघता आलं नव्हतं. आईबाबा सारखं म्हणायचे इकडे जाऊ नको तिकडे जाऊ नको. आज स्टेशन बघायला मिळालं.” त्याची प्रतिक्रिया खूप बोलकी आहे आणि शिकवणारीही आहे. आपण एखादवेळी हे अनुभव ठरवून देऊं शकतो की नाही?

आपण अनेकदा मंडईत जातो. मुलगा सोबत असतो. कधी त्याला मनाप्रमाणे भाजी घ्यायला, निवडायला, भाव विचारणं, ठरवणं, वजन नीट बघणं, हिशेब करणं, करू देतो का? उलट ‘अजून लहान आहेस तू, कळत नाही तुला’ असं म्हणून त्याला बघ्याची भूमिका घ्यायला लावतो. बाबांसोबत बाजारात जायचं ते केवळ पिशव्या धरण्यासाठी ही मुलाची धारणा होते. लहान सहान हिशेब, छोटी खरेदी, किराणा मालाची यादी करणं, हे अनुभव सहज देण्यासारखे आहेत. मिळालेल्या ज्ञानाचा व्यवहारात वापर करता येणे महत्त्वाचं असतं.

शासकीय दूध डेअरी, दूरदर्शन, आकाशवाणी, दूरध्वनी, बँक, वर्कशॉप, पोस्ट इ. कार्यालयांत काम करणाऱ्या पालकांना मी एक प्रश्न आमच्या पालक शाळेत आवर्जून विचारतो. ‘आपण आपल्या पाल्याला आपलं कार्यालय वा तेथील कार्य बघायला घेऊन गेलात का कधी?’ अपवाद वगळला तर ‘नाही’ हेच उत्तर मिळतं. खरं तर या गोष्टी सहज करण्यासारख्या आहेत. मुलांचं अनुभवविश्व संपन्न करण्याचं ते माध्यम आहे. पण हे होताना दिसत नाही. शाळेत मिळालेल्या ज्ञानाचा योग्य तो नि योग्य त्या ठिकाणी उपयोग करणं आणि विविध विषयाच्या अभ्यासाला पूरक होतील असे अनुभव देणं ही आजची निकड आहे. पालकांनी या निकडीकडे लक्ष देणं आवश्यक झालं आहे.

**स्वयंपाकघरातील शाळा -**

बाहेरच्या विश्वातील अनुभव पाल्याला मिळण्याच्या दृष्टीनं वडिलांनी पुढाकार घेतला पाहिजे तर घरातल्या घरात शालेय शिक्षणाला पूरक असे अनुभव देण्याच्या दृष्टीनं आईनं पुढाकार घेतला पाहिजे. मुलांना विविध ज्ञान आणि अनुभव देण्यासाठी ‘स्वयंपाक घर’ यासारखी शाळा नाही. स्वयंपाक सुरू असतांना मुलांची स्वयंपाक घरात रेंगाळू नये तर बाहेर बसून अभ्यास वा इतर कामं करावी हिच आईची सर्वसाधारण अपेक्षा असते. त्यातही स्वयंपाकघर हा मुलांचा विषय नाही हिच तिची समजूत असते. ‘स्वयंपाकघर’ हे उत्कृष्ट व्यवस्थापन कौशल्याचं उदाहरण आहे असं व्यवस्थापन (Management) क्षेत्रात काम करणारी तज्ज्ञ मंडळी सांगत असतात. पण हे व्यवस्थापन आपल्या मुलांना आपण सांगत नसतो. एखादा डबा इकडचा तिकडे झाला. एखादी वस्तू चुकून दुसऱ्या डब्यात ठेवली गेली तर स्वयंपाक करते वेळी काय धांदल होते याची कल्पना आईला असते. त्यामुळं प्रत्येक वस्तू योग्य त्या ठिकाणी व्यवस्थित ठेवलेली असणं हे स्वयंपाक घरातील लक्षात येणारं वैशिष्ट्य असते. आपल्या वस्तू नेमक्या ठरलेल्या ठिकाणी व्यवस्थित ठेवणं हा संस्कार यातून देता येईल की नाही? दाब, ज्वलन, पदार्थाच्या विविध अवस्था, उष्णता वहन, वाहक, इत्यादी विज्ञानातील संकल्पना प्रत्यक्ष स्वयंपाकघरात मुलं बघू शकतात. अनुभव घेऊ शकतात. मातृभाषेतील कितीतरी वाक्प्रचार स्वयंपाक घराशी संबंधित आहेत. कणिक तिंबणे, तडतड् करणे, चटणी वाटणे, नाकानं कांदे सोलणे, वरवंटा फिरवणे अशी किती तरी उदाहरणं देता येतील. ह्या वाक्प्रचारांचा अर्थ समजावून न सांगताही अवलोकनातून मुलाला कळेल आणि त्याचा वाक्यात सहज उपयोग करून दाखविल्यास मुलंही अनुकरण करू लागतील व यातून त्याची भाषा संपन्न होईल. धुतल्या तांदळासारखा म्हणजे नेमका कसा? हे मुलांना नेमकं स्वयंपाक घरातच बघायला मिळेल. त्यातून त्याच्या अनेक कल्पना स्पष्ट होतील.

पूर्वी एकत्र कुटुंब असताना घरातील सर्व माणसं एकत्र जेवायला बसत. एक छोटी पंगतच असायची ती. ही मोठी माणसं जेवायला बसली की घरातील रांगती मुलं पानाच्या आसपास घुटमळायची. आपले वडील, काका, आजोबा, दादा कसे जेवतात हे त्याला बघायला मिळायचं. तो रांगत रांगत कुणाच्यातरी पानाजवळ जायचा. पानात हात टाकून तोच हात तोंडात घालायचा. हात पातळ भाजीत गेला असेल तर पातळ भाजीची चव त्याला कळायची. तिखट लागल्यामुळं तो रडायला लागला की कुणीतरी त्याच्या तोंडात लाडवाचा घास द्यायचा. त्याला लाडवाची चवही कळायची. “बालक बापाचिये ताटी रिंगे, आणि बापातेचि जेववू लागे।” असं चित्र आता अपवादानं दिसतं. आज आपल्या घरात डायनिंग टेबल आला आहे. रांगणाऱ्या मुलांना मोठी माणसं कशी जेवतात हे दिसत नाही. अनेक पालक, आमचा मुलगा चार वर्षांचा झाला तरी त्याला नीट जेवता येत नाही. तो कुठल्याच भाज्या खात नाही. अशा तक्रारी करतात तेव्हा मला ह्या जुन्या गोष्टींची आवर्जून आठवण येते.

स्वयंपाकघरातील आणखी एक दृष्य सुखवस्तू घरातून दृष्टीआड झालं आहे. बहिणाबाई चौधरी यांची सर्वांना परिचित असलेली कविता म्हणजे-

*अरे संसार संसार, जसा तवा चुल्हावर*
*आधी हाताले चटके, तेव्हा मिळते भाकर.*

ही कविता म्हणताना एक दृष्य डोळ्यापुढं उभं राहतं. स्वयंपाक घरात, आई, आजी चुलीवर स्वयंपाक करीत आहेत. धुरानं डोळे गळत आहेत. फुंकणीनं

# कृपया एवढं करु नकां!



- आपल्या पाल्यांना अकारण कशाची भीती दाखवू नका !
- अंधश्रद्धा निर्माण करूं नका !
- आपसात किमान पाल्यांसमोर भांडू नका !
- मुलांना अपशब्दानं किंवा शिवी देऊन बोलू नका !
- मुलांच्या आवडी निवडी किंवा अवगुणाविषयी त्यांच्यासमोर, इतरांसमोर चर्चा करू नका !
- लहान मोठे कोणतेही व्यसन असो मुलांसमोर त्याचे प्रदर्शन करू नका !
- केवळ अभ्यासाच्या नावावर मुलांना घरकाम व व्यवहारज्ञान यापासून दूर ठेवू नका !
- मुलांचे फाजील लाड करूं नका !
- पाल्यांची कामे त्यालाच करूं द्या, स्वतः करूं नका !
- तुम्ही जसे शिकलात त्याच पद्धतीनं आपल्या पाल्याला शिकविण्याचा प्रयत्न करूं नका !
- पाल्यांची सृजनशीलता दडपून टाकू नका !
- आपल्या आवडी निवडी पाल्यावर लादू नका !

**पालक बंधूंनो,**
**खूप गोष्टी टाळता येण्यासारख्या आहेत पण तूर्त ''एवढं करायचं टाळा'' मुलांच्या विकासाला गती मिळेल. आपल्या पाल्यांचा विकास हेच आपलं उद्दिष्ट आहे. मग काही पथ्यं पाळायलाच हवी. ''जगाच्या मापाचा माणूस आणि माणसाच्या मापाचे जग निर्माण करण्याची स्वप्ने बाळगा.''**

जाळ करण्याचा प्रयत्न सुरू आहे. चुल्ह्यावर तवा गरम होतो आहे. आई भाकरीचं पीठ मळून त्याचा गोळा करून तव्यावर भाकर टाकते आहे. थापलेल्या भाकरीवरून पाण्याचा हात फिरवताना कुठंतरी हाताला चटकाही बसतो आहे पण तो चटकाही आई अतिशय आनंदानं, हसतं सहन करतेय. घरातली लहान मुलं मुली दुरून हे बघत असतात. या दृष्यातून मुलींचं (आणि मुलाचंही) नकळत शिक्षण होतं. स्वयंपाक कसा करायचा याचं तर शिक्षण मिळतंच पण जे आहे ते गोड कसं करून घ्यायचं, जीवनात बसणारे चटकेही हसत मुखानं कसे सहन करण्याचे हेही संस्कार घडून जायचे. आज आई ओट्यावर असलेल्या गॅसवर स्वयंपाक करताना पाय वर करून छोट्या मुलीनं बघतो म्हटलं तरी तिला दिसत नाही. मग कुणाला तरी शंभर पाककृतीसारखं पुस्तक लिहावं लागतं. याचा अर्थ असा नाही की या आधुनिक गोष्टी, साधनाचा वापर करायचा नाही. डायनिंग टेबल असो, गॅस शेगडी असो, किंवा मिक्सरसारखे आधुनिक साधन असो त्यांचा वापर करतानाही 'स्वयंपाकघर' ही अनेकानेक अनुभव देणारी एक प्रयोग-शाळा आहे. याच स्वयंपाक घरातून काही मूल्य हसत खेळत रूजवता येतात याचा विसर पडू नये. यासाठी आईला केवळ आईची भूमिका न ठेवता शिक्षिकेची भूमिकाही करावी लागेल. त्यासाठी मुलांना असलेला थोडा अभ्यासक्रम भाषा, विज्ञान इत्यादी विषयातील काही संबोध, प्रयोग याची माहिती करून घ्यावी लागेल. मुख्य म्हणजे आई जेव्हा आपलं शिक्षकमूल्य ओळखेल तेव्हाच ह्या साध्या गोष्टी जाणीवपूर्वक ती करू शकेल.

सुरुवातीला जाबालीक ऋषिची मला भावलेली कथा मी उधृत केली ती यासाठीच, की शाब्दिक ज्ञानापेक्षा अनुभवातून मिळणारं ज्ञान अधिक पक्कं होत असतं. अनुभवातून निर्णय शक्तीचा विकास होत असतो. स्वतःहून समस्या निराकरण करण्याची सवय लागू शकते आणि विविध अनुभव घेताना आनंदही मिळतो.

काही थोड्या गोष्टींचा उल्लेख मी केला आहे पण पालक म्हणून आपण सतर्क असू, तशी दृष्टी आपली असेल तर स्वयंपाकघराचाही अनौपचारिक शिक्षण देणारी, अनुभवसंपन्न करणारी शाळा म्हणून आपण उपयोग करून घेऊ शकतो.



# ६. मशागत - मनाची

'कधी पाहतो मी माझ्यातच विचित्र मानव' ही मंगेश पाडगावकरांची एक प्रसिद्ध कविता. कवी म्हणतो - सुष्ट आणि दुष्ट या दोन्ही प्रवृत्ती एकाच माणसात विद्यमान असतात. माणसातील ज्या प्रवृत्तींचं दर्शन समाजाला वारंवार होतं त्यावरून त्या माणसाचं मूल्यमापन समाज करीत असतो. जीवशास्त्रीय भाषेत हीच गोष्ट सांगायची तर माणूस एकूण चार पातळीवर जगत असतो. एक असते पशू पातळी, दुसरी असते माणसाची, तिसरी पातळी असते देवत्वाची तर चौथी हैवानाची. सर्व सामान्यपणे आपण पशुपातळीवरच जगत असतो. एखाद्या माणसांनी एखाद्या गरीब माणसाला मदत केली, एखाद्याला संकटातून वाचवलं, एखाद्यानं अपघातात सापडलेल्या माणसाला रक्तदान करून त्याचे प्राण वाचवले तर आपण म्हणतो माणूसकी अजून शिल्लक आहे. तो माणसासारखा वागला. पण त्याच माणसानं रागाच्या भरात एखाद्याचा खून केला. तर समाज त्याला रानटी, क्रूर, हैवान या नावानं संबोधतो. माणूस एकच असतो पण त्यानं कृती कोणती केली, तो कसा वागला यावरून त्याची ओळख पटते. विश्वामित्रासारखा एखादा स्वतःला महर्षी ब्रह्म-ऋषी म्हणावं म्हणून वशिष्ठाची मुलं मारून टाकतो तेव्हा त्यांच्यातील दुष्ट प्रवृत्ती उफाळून आलेली असते तर एखादा ज्ञानेश्वर वयाच्या १५ व्या वर्षीच देवत्वाच्या पातळीवर गेलेला दिसतो. आपण शिक्षण तरी कशाला म्हणतो! 'शिक्षण' या शब्दाचा अभिप्रेत अर्थ तरी कोणता? पशुपातळीवरून माणूस पातळीवर आणि माणूस पातळीवरून देवत्वाच्या पातळीवर जाण्यासाठी कराव्या लागणाऱ्या प्रवासासाठी मिळणारे संचित. 'नर करनी करे तो नरका नारायण होय' असं वचनच आहे. आता सारीच माणसं देवत्वाच्या पातळीवर जाऊं शकत नाहीत. जगूही शकत नाहीत. एखादाच हजारो वर्षातून नरेंद्राचा विवेकानंद होताना, मोहनदासचा महात्मा गांधी होताना दिसतो. सर्वांनीच ज्ञानेश्वर, रामदास किंवा टिळक, सावरकर व्हावं अशी अपेक्षाच नसते. अपेक्षा असते माणसानं माणसासारखं जगावं. माणूस माणसासारखा जगला, वागला तर समाजात सुरक्षितता, समाधान, आनंद आणि समरसता आपोआप प्रस्थापित होईल त्यासाठी वेगळे प्रयत्न करण्याची गरज पडणार नाही. शिक्षणाचं उद्दिष्टंही आपण हेच मानतो. माणूस एक माणूस म्हणून उभा राहावा. त्याच्या ठिकाणी असणारं पशुत्व, त्यांच्यातील हिंस्त्रपणा कमी होऊन त्याच्यातील माणुसकीचा विकास व्हावा. पण आज चित्र काय दिसतं. माणसातील माणूसपण हरवत चाललं आहे आणि त्यांच्यातील हिंस्त्रपणा अधिकाधिक उफाळून येत आहे. परिणाम असुरक्षितता वाढत आहे, सामाजिक दायित्व कमी होत चाललंय, सामाजिक समरसता, सामंजस्य कमी होत आहे. हे सर्व बघून एक पालक म्हणून तुम्ही आम्ही सारेच अस्वस्थ आहोत, चिंतीत आहोत. पण या सर्व परिस्थितीला पालक म्हणून आपणही जबाबदार आहोत हे विसरून चालणार नाही. परवा एक बातमी वाचण्यात आली. बातमी होती अमेरिकेतील. अमेरिकेत नुकताच 'मातृदिन' साजरा करण्यात आला. या मातृदिनाच्या दिवशी अनेक मातांचा एक विशाल मोर्चा व्हाईट हाऊसच्या दिशेनं निघालेला होता. कशासाठी मोर्चा असेल हा? काय मागण्या होत्या त्यांच्या? 'अल्पवयीन मुलांना शस्त्रापासून दूर ठेवा' ही मागणी समस्त मातांची. अशी मागणी का करावी लागली तर शाळेत जाणारी अल्पवयीन मुलं वह्या-पुस्तकासोबत एखादी बावीस कॅलीबरची पिस्तूलही सोबत नेताना दिसतात आणि एखाद्या क्षुल्लक कारणावरून एकदम संतप्त होऊन आपल्याच वयाच्या मुलाचा बळी घेतात. त्यामुळं अनेक मातांना आपली मुलं गमवावी लागली. १९९४ ते १९९७ या तीन वर्षात अमेरिकेत ४२२३ अल्पवयीन, बंदुकीच्या गोळ्यांना बळी पडली असा रिपोर्ट सांगतो. ही बातमी वाचून कोणत्याही सहृदय व्यक्तीच्या अंगावर काटा यावा. ह्या घटना भारतापासून हजारो मैल दूर असलेल्या अमेरिकेत घडलेल्या आहेत असं म्हणून आपल्याला निश्चिंत राहता येणार नाही. कारण जग आज इतकं जवळ आलं आहे की जगात कुठेही घडणाऱ्या लहान सहान घटनेचे परिणाम क्षणात जगभर पसरताना दिसतात. अमेरिकेतील अल्पवयीन मुलांमध्ये दिसणारं हे हिंसाचारी वातावरण आपल्या देशात यायला फार वेळ लागणार नाही म्हणून पालकांनी सावध होऊन आणि या प्रवृत्तीपासून आपल्या पाल्याचं आणि एका अर्थानं सामाजिक सुरक्षिततेचं रक्षण केलं पाहिजे. आता ही अमेरिकेतली मुलं, काही प्रमाणात आपलीही मुलं अशी हिंसाचारी वृत्तीची, हैवानाच्या पातळीवर वागताना का दिसावी? रिंकू पाटलाला परीक्षागृहात जाळून ठार मारणारा तिचा प्रियकर किंवा आपल्या प्रेमाला प्रतिसाद देत नाही म्हणून सांगलीच्या भर चौकात अमृता देशपांडे या मुलीचा खून करणारा तरुण या प्रवृत्तीचंच निदर्शक नाही कां? का वागतात ही मुलं अशी? या संदर्भातील कारणमीमांसा करताना अमेरिकन मानसशास्त्रज्ञ म्हणतात की, प्रत्येक मुलात हिंसकशक्ती जन्मतःच दडलेली असते ती शक्ती फुटबॉलला किक मारून, हौदात कुस्त्या खेळून, मैदानात मैदानी खेळ खेळून, तबल्यावर थाप मारून, पाण्याशी झटापट करून बाहेर काढून टाकायची असते. परंतु हल्ली

मुलांना खेळायलाच मिळत नाही, श्रमही करावे लागत नाहीत त्यामुळं शरीरात साठून राहिलेली ऊर्जा कोंडलेल्या वाफेप्रमाणं बाहेर पडते आणि अनर्थ घडवून आणते. या शक्तीला टी.व्ही. च्या अनेक चॅनलवरून चोवीस तास दाखविल्या जाणाऱ्या चित्रपटातील हिंसाचारसारखा उत्तेजीत करीत असतो. मानसशास्त्रज्ञांनी सांगितलेली ही कारण मीमांसा सगळ्यांना पटावी व सर्वांनी अंतर्मुख व्हावं अशीच आहे.

भारतीय विचार परंपरेतही सत्त्व, रज, तम ह्या तीन गुणांचा उल्लेख केला आहे. या गुणांच्या प्रगटीकरणातून तो सात्त्विक वृत्तीचा, राजसवृत्तीचा की तामसी प्रवृत्तीचा हे ओळखलं जातं. आयुर्वेदात वात, कफ, पित्त हे त्रिदोष सांगितलेले आहे. एखाद्याचं पित्त लवकर खवळतं असं जेव्हा आपण बोलतो तेव्हा ती व्यक्ती शीघ्रकोपी, संतापी आहे असा त्यातला भाव असतो. संस्कार, आहारविहार यातून ज्या गुणांचं पोषण होईल तेच माणसाचं स्वभाव वैशिष्ट्य होऊन बसतं. म्हणून शिक्षण आणि संस्कारातून मुलांच्या ठिकाणी उत्तम गुणांचं पोषण व्हावं, वर्धन व्हावं त्यांच्यातील तामसवृत्ती, हिंसाचार कमी होऊन त्याच्या ठिकाणी विवेक जागृती व्हावी यासाठी पालक म्हणून आपल्याला आवर्जून प्रयत्न करायला पाहिजे.

मुलांच्या विकासात पालकांची भूमिका या सुरवातीला दिलेल्या आकृतीत क्र. दोन व तीन मध्ये पालकाची भूमिका प्रधान भूमिका म्हणून दर्शिविलेली आहे. ही भूमिका समर्थपणे पार पाडण्यासाठी पालकांना काय करता येईल त्याचा विचार करू.

Sound mind in a sound body चांगलं मन-चांगल्या शरीरात वास करतं म्हणूनच सर्वांगीण विकासात शारीरिक विकासाचाही अंतर्भाव होतो. मुलांनी परीक्षेत उत्तम गुण प्राप्त करावेत यासाठी म्हणजे बुद्धीच्या विकासासाठी आपण जेवढा प्रयत्न करतो तेवढाच त्याचा शारीरिक विकास व्हावा त्यांच्या ठिकाणी असलेल्या अतिरिक्त ऊर्जेला बाहेर काढावं यासाठी कितपत प्रयत्नशील असतो? शाळेत खेळाचा तास असतो पण अनेक शाळेला मैदानच नाहीत त्यामुळं आज मुलांना शाळेत खेळायला मिळत नाही. आणि आम्ही पालकही त्यांना खेळायला प्रवृत्त करीत नाही. अगदी के.जी. पासून तो शालांत परीक्षेपर्यंत मुलांना आम्ही क्लासेसच्या कोंडवाड्यात आज बंदिस्त करून टाकलं आहे. मुलांना उन्हाळ्याच्या सुट्ट्या असतात. ह्या सुट्ट्यातही खेळापेक्षा क्लासेसमध्येच पालक त्यांना गुंतवून ठेवतात. जे वय खेळायचं, बागडायचं असतं शरीरातील रग जिरवायची असते त्या वयात त्यांना आपण विविध गोष्टींत अडकवून त्यांचं बालपणचं हिरावून घेत असतो नव्हे ओरबडून टाकतो. अनेक घरात संध्याकाळच्या वेळी म्हणजे खेळ

# एवढं लक्षात ठेवाच

१) आपल्या पाल्याला स्वकुल, स्वगृह, स्वजन, स्वविचार आणि स्वआचार या आपल्या वर्तुळात डांबून टाकू नका.

२) चार पावसाळे जास्त पाहिल्यामुळे मला अधिक समजते असा पवित्रा कधी घेऊ नका.

३) मुलांच्या बोलण्यात तथ्य असू शकतं म्हणून त्याचं शांतपणे ऐकून घेण्याची मानसिक तयारी असू द्या.

४) कोणासारखे तरी हुशार/आज्ञाधारक होण्याचा आग्रह धरून मुलांच्या मनावर प्रचंड मानसिक दडपण आणू नका.

५) 'तू माझ्यासारखा झालांस तरी मला आवडेल' असा संदेश आपल्या वर्तनातून मुलाला मिळाला तरी त्याचा विकास सुगम होईल.

६) मुलांमधील साहसाचे, आक्रमकतेचे विधायक मार्गानं अध्ययन करण्याचा प्रयत्न आपल्याकडून झाला पाहिजे.

व्यायामाच्या वेळी मुलं टी.व्ही. समोर बसलेली दिसतात. या वेळात मुलांनी खेळावं, व्यायाम करावा असा आग्रह आपण धरतो कां? काही पालक मुलांची आवड लक्षात घेऊन त्यांना आवश्यक त्या सुविधा उपलब्ध करून देतात. आपला पाल्य एखाद्या खेळात समोर यावा. आपल्या पाल्यांनी पुढं जाऊन सचिन तेंडुलकर, धनराज पिल्ले, पी. टी. उषा व्हावं अशी स्वप्नही बघत असतात. पण या गोष्टी. गोष्टीकडे बघण्याचा दृष्टिकोन कसा असतो तर व्यवसायिक कारण खेळातूनही भरपूर पैसा मिळतो ही धारणा झाली आहे. खेळायचं कशासाठी, अधिक प्राविण्य मिळवायचं कशासाठी अधिक पैसा मिळावा म्हणून. खरं तर मुलांनी खेळायला पाहिजे ते केवळ त्या खेळात प्राविण्य मिळविण्यासाठी नाही किंवा स्पर्धेसाठीही नाही तर त्यांच्या ठिकाणी खिलाडूपणा येण्यासाठी, साचून राहिलेली ऊर्जा, तामसी वृत्ती कमी व्हावी म्हणून. जीवनात पराभव आणि आनंद पचविण्याची सवय असली पाहिजे. ती खेळातून निर्माण करता येते. पराभवानं खचून जाणं आणि विजयानं हुरळून जाणं किंवा विकृत आनंद निर्माण होणं हे घातक असतं. खेळाचं हे महत्त्व लक्षात घेऊन आपल्या पाल्यांना या गोष्टी शिकवल्या पाहिजे. मुलांना मानसिक थकवा येणारी कामच आपण खूप देतो. शारीरिक थकवा येईल अशी कामं त्यांना दिली पाहिजे. त्यासाठी खेळात, व्यायाम करण्यात त्यांना रुचि निर्माण व्हावी असा प्रयत्न व्हायला पाहिजे. पाल्यांत आज खिलाडू वृत्ती निर्माण होणं गरजेचं आहे ती निर्माण झाली तर अनेक प्रश्न सहज सुटतील. ६ ते १४ या वयोगटातील मुलांना खेळू द्या. अधिकाधिक खेळायला अर्थात एका ठराविक वेळी खेळायला प्रवृत्त करा. त्यांचं बालपण हिरावू नका.

दुसरी गोष्ट माणसात विद्यमान असलेल्या अपप्रवृत्तीवर मात करण्यासाठी, मनाला लगाम लावण्यासाठी आणि जीवनाला सात्विकतेचं अधिष्ठान मिळण्यासाठी आपल्या परंपरेत योगासन, ध्यान धारणा, प्रार्थना यांना अतिशय महत्त्व दिलं आहे. पाल्याच्या जीवनाला असं सात्विकतेचं अधिष्ठान मिळण्याच्या दृष्टीनं आपण कितपत प्रयत्न करतो? सकाळी उठून मुलांनी व्यायाम करावा, योगासनं करावीत, सूर्य नमस्कार घालावेत, दंड, बैठका काढाव्यात म्हणून किती पालक आग्रह धरतात? ६ ते १४ या वयोगटातील मुलांना ह्या सवयी चटकन् लागू शकतात. मात्र अशा सवयी लावण्यासाठी आपल्याला सकाळी उठावं लागेल, वेळ काढावा लागेल, त्यांच्याकडून त्या गोष्टी करवून घ्याव्या लागतील, का करायच्या हे समजून सांगावं लागेल. पहाटे उठून धावायची सवय लावायची असेल तर प्रथम आपल्याला पहाटे उठून त्याच्या सोबत धावावं, फिरावं लागेल. सूर्यकिरण अंगावर पडण्यापूर्वी म्हणजे सूर्योदयापूर्वी मुलांनी उठलं पाहिजे असं म्हणत असताना कुठंतरी आपल्यात ती सवय असली पाहिजे. हे करायला निश्चितपणे कठीण आहे, अवघड आहे पण आपल्या पाल्याच्या शरीर व मनाला वळण लावण्यासाठी आपल्याला हे करणं आवश्यक आहे. आजच्या भाषेत ज्ञान, माहिती प्राप्त करणं सोपं आहे पण संस्कार प्राप्त करणं सोपं नाही. ते जाणीवपूर्वक, प्रसंगी कठोर होऊन द्यावे लागतात. रुजवावे लागतात. आज आमच्या घरात एकच एक मुलगा वा मुलगी असल्यामुळं आपल्याला त्यांच्या बाबतीत कठोरच होता येत नाही ही स्थिती आहे. एका मित्राकडे एकदा जेवायला जाण्याचा योग आला. ७/८ लोक जेवायला होते. पंगत बसली मित्राचा ६-७ वर्षाचा मुलगा हट्ट धरून बसला. 'हट्ट होता एका विशिष्ट पानावर बसण्याचा' वडिलांनी परोपरीनं सांगून पाहिलं पण तो ऐकेना. शेवटी त्याचा हट्ट पूर्ण केला गेला. तो त्याच पानावर बसला. वाढणं सुरू झालं आणि चुकून त्याच्या पानात आईनं भाजी वाढली. भाजी वाढताच ते चिरंजीव एकदम भडकले, त्याला भाजी का वाढली म्हणून त्यानं ताटचं जोरानं ढकलून दिलं. नवीन ताट दिलं तेव्हाच त्याचा हट्ट थांबला. आश्चर्य असं की वडिलांनी मुलाला रागवायचं सोडून त्याच्या आईलाचं दोन गोष्टी सुनावल्या. हा प्रसंग एवढ्याचसाठी उद्धृत केला, की त्या मुलाला संस्कार देण्यासाठी, शिस्त लावण्यासाठी जो कठोरपणा आई-वडिलांनी घ्यायला हवा होता तो न घेतल्यामुळं मुलातील तामसीवृत्ती वाढीला लागली. संस्कारासाठी, शिस्त लावण्यासाठी पालकांना प्रसंगी कठोर होता आलं पाहिजे.

आजचं आपलं जीवन अतिशय गुंतागुंतीचं झालेलं आहे. अनेक ताणतणाव आपल्या मनावर आहेत आणि ते वाढतही आहेत. आपल्या पाल्याच्या जीवनाला खऱ्या अर्थानं अजून सुरवातही झालेली नाही ते ज्यावेळी समाजात एक नागरिक म्हणून वागायला लागतील त्यावेळी म्हणजे आणखी पंधरा वर्षांनी विज्ञानातील अनेक नव्या संशोधनामुळं, माहिती तंत्रज्ञानाच्या विस्फोटामुळं खूप काही बदल झालेले असतील. जीवन अधिक गतिमान झालेलं असेल. त्यामुळे आपल्यापेक्षाही आपल्या पाल्याच्या मनावरील ताणतणाव अधिक वाढणार आहे. अशा परिस्थितीत त्यांच्या भविष्याचा विचार करून त्या ताणतणावातही त्याचा विवेक ढळणार नाही अशा प्रकारचं शिक्षण आज देणं हेही पालकांचं कर्तव्य आहे. त्यासाठी ध्यानधारणा (Meditation) करण्याची सवय मुलामध्ये बालपणापासून रुजवली पाहिजे. आज विपश्यना सारख्या साधनेचा प्रचार मोठ्या प्रमाणात होतो आहे. स्ट्रेस मॅनेजमेंटसारखे विषय हाताळले जात आहे याचं कारण 'संयममय जीवन हो।' विवेक निर्माण व्हावा हेच आहे. तेव्हा प्रत्येक पालकांनी आपल्या पाल्याला ओंकार, आनापान प्रक्रिया, काही प्रार्थना अशा गोष्टी बालपणापासून शिकविण्याची गरज आहे. काही शाळातून Meditation सारख्या गोष्टी करवून घेतल्या जात असतात. पण अशा शाळाही अपवादात्मक दिसतात. म्हणून ही खरीखुरी

जबाबदारी पालकांची आहे. उद्याच्या काळात ती मागणी आहे.

शारीरिक विकास या शब्दात केवळ शरीर सुदृढ करणं, शरीर कमावणं, बलवान होणं एवढाच अर्थ अभिप्रेत नाही. सुदृढ आणि बलवान शरीराला वळण लावणंही महत्त्वाचं आहे. बळाचा उपयोग दुर्बलावर अधिकार गाजवण्यासाठी नसून त्यांचं संरक्षण करण्यासाठी केला पाहिजे. अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठी केला पाहिजे. 'दिव्यत्वाची जेथे प्रचिती, तेथे कर माझे जुळती।' या उक्तीप्रमाणे भव्यतेपुढे, दिव्यतेपुढे, ज्ञानवंतापुढे आणि आईवडिलांपुढेही त्यानं वाकलं पाहिजे बलवान असूनही नम्रता असली पाहिजे याचं शिक्षण देणं म्हणजे शरीराला वळण लावणं आहे. या अशा शिक्षणाचा विचार आपण फारसा करताना दिसत नाही. यासाठी स्वावलंबनाची सवय मुलांना बालवयात लावली पाहिजे. अनेक घरातून आज एक दृष्य नेहमी बघायला मिळतं. बालक मंदिरात, प्राथमिक शाळेत जाणाऱ्या मुलांची आई-वडील जी तयारी करून देतात ती बघण्यासारखी असते. विशेषतः सुखवस्तू कुटुंबातून हे दृष्य दिसतं. एकदा एका संबंधिताकडे मुक्काम करण्याचा योग आला. हे संबंधित गृहस्थ क्लासवन आणि त्यांची पत्नी प्राध्यापिका. एकुलता एक मुलगा वय वर्ष ९. चांगल्या शाळेत इंग्रजी माध्यमात शिकणारा. स्वतंत्र मोठा फ्लॅट आणि स्वतःची मारुती गाडी. आणखी काय हवयं. आजच्या भाषेत एक सुखवस्तू कुटुंब. मुलाची सकाळची शाळा म्हणून पहाटेसच घराला जाग आलेली. मुलाची शाळेची तयारी करून देण्यासाठी आई वडिलांची धावपळ सुरू झाली. त्याला हळूवार उठवणं, त्याचा डबा तयार करणं, त्याचं दफ्तर शोधणं, दफ्तरात नीट पुस्तकं भरणं सारं काही आई-वडीलच करत होते. 'डॅडी टॉवेल, डॅडी पेन ठेवला का? मम्मी शर्ट कुठाय?' मुलगा जणू हुकूम देत होता. आई-वडील हुकूमाची तामिली करीत होते. शेवटी मुलगा कोचावर कपडे करून बसला. आई त्याच्या डोक्यावरून कंगवा फिरवीत होती तर बाबा त्याच्या पायात जोडे घालून देत होते. मी बेडवर पडल्या पडल्याच हे दृष्य टिपत होतो. मला माझ्या लहानपणाची आठवण झाली आणि क्षणभर आजच्या मुलांचा हेवाही वाटला. पाल्य दहा वर्षांचा होऊनही त्याला दफ्तर भरणं, गणवेश घालणं, जोडे घालणं स्वतःहून करता येऊ नये? आपली काम आपण स्वतः केली पाहिजे ही गोष्ट त्याला आपण शिकवू शकत नाही का? प्रेम, लाड या गोंडस नावाखाली त्याला परावलंबी बनवायचं कां? याचा विचार आपणच करायला हवा. आपल्या घरात आर्थिक सुबत्ता असेल, सर्व गोष्टींची अनुकूलता असेल तरी देखील मुलांना आपली काम आपणच केली पाहिजे ही सवय लावायला हवी. आपली खोली स्वच्छ ठेवणं, घरातील बाथरुम, संडास आठवड्यातून एकदा स्वच्छ करणं, आपला रुमाल, टॉवेल सारखे लहान कपडे स्वतः धुनं, बुटांना पॉलिश करणं, आपलं ताट-पाट घेणं इ. गोष्टी मुलांना स्वतःहून करता आल्या पाहिजे. अशा सवयी लावणं हे पालकाचं काम आहे. स्वावलंबनाच्या अशा सवयीतून एक महत्त्वाचा संस्कार आणि विचार पाल्यांना दिला गेला पाहिजे तो म्हणजे कोणतेही काम वाईट नसतं. अमूक एखादं काम करणारा मोठा आणि अमूक एखादं काम करणारा कनिष्ठ असा भेदाभेद करता कामा नये. श्रमाची आवड, श्रमप्रतिष्ठा ही मूल्य अतिशय महत्त्वाची आहे ती बालवयातूनच रुजवली पाहिजे. आपल्या पाल्यांना काय आणि कसं द्यायचं हे एकदा पालकांनी निश्चित केलं की बाकी गोष्टी सोप्या असतात.

मुलांच्या आरोग्याच्या दृष्टीनं पालकांनी आहारशास्त्राचाही थोडा अभ्यास केला पाहिजे. आजच्या काळात ते आवश्यक झालं आहे. सत्त्व, रज, तम या गुणांचं पोषण हे आहारावर बऱ्याच प्रमाणात अवलंबून असतं. कोणत्या गुणांचं पोषण करायचं आहे हे लक्षात घेऊन अनेकदा आहार ठरवावा लागतो. बुद्धिजीवी आणि श्रमजीवी या दोन्ही वर्गाचा आहार एकच असू शकत नाही. म्हणूनच एका सैनिकाचा आहार आणि एका विद्यार्थ्याचा आहार यात फरक असतो, असला पाहिजे. कारण एकात तमो गुणाचं उद्दिष्ट असतं तर दुसऱ्यात सात्त्विक गुणाचं. आज आहार विहाराचं कुठलंच बंधन पाळलं जात नसल्यामुळं त्याचे परिणाम स्वभाववैशिष्ट्य तयार होण्यावर होत असतात. म्हणून आपल्या पाल्याला कोणता आहार दिला पाहिजे, आहारात कोणत्या गोष्टीचा अंतर्भाव असला पाहिजे, पाल्याची परीक्षा चालू असताना कोणता आहार, सुट्या असताना कोणता आहार दिला पाहिजे याचीही माहिती असणं आवश्यक आहे. अनेक पालक आपल्या पाल्याची तक्रार करताना सांगतात की, त्यांच्या पाल्याला भाज्याच आवडत नाही, बटाट्याशिवाय तो दुसरी भाजीच खात नाही. या तक्रारीत वस्तुतः पाल्याचा दोष नसतो. आपण तशा सवयी त्यांना लावलेल्या नसतात.

आहाराच्या जशा सवयी लावायच्या असतात तशाच स्वच्छतेच्याही सवयी विकसित करायच्या असतात. व्यक्तिगत स्वच्छता जितकी महत्त्वाची तितकीच सार्वजनिक स्वच्छताही महत्त्वाची असते. सामान्यपणे आपण पालक आपल्या पाल्याच्या आरोग्याची काळजी घेत असतोच. तशा काही गोष्टी आपण त्याच्याकडून करवून घेत असतो. पण सामाजिक आरोग्याच्या दृष्टीनं मुलांना काही चांगल्या सवयी लावण्याच्या दृष्टीनं पुरेसे सावध नसतो. अनेकदा मुलांना घेऊन आपण सार्वजनिक बागेत जातो. खाल्लेल्या वस्तूचे तुकडे, साली, कागदाचे तुकडे तिथेच टाकतो. सामान्यपणे सार्वजनिक बागा अनेकदा घाणेरड्या झालेल्या दिसतात. घरातला कचरा रस्त्यावर टाकणं, कचरा पेटीत न टाकणं अशा कितीतरी गोष्टी

आपण मोठी माणसंच करीत असतो. मुलंही आपल्याकडे बघून तशीच वागत असतात. आपल्या मालकीच्या वस्तू जेवढ्या आपण स्वच्छ ठेवतो तेवढी सार्वजनिक ठिकाण स्वच्छ ठेवत नाही. ज्या समाजात आपण राहतो त्या समाजाचं आरोग्य नीट राखणं हे आपलं कर्तव्य आहे याचं भान आज हरवलेलं आहे. हे भान मुलांच्या ठिकाणी निर्माण करणं आणि तशा सवयी त्यांना लावणं ही जबाबदारी देखील पालकावरच आहे. त्यासाठी पालकांना ह्या सवयी लावून घ्याव्या लागतील. आपला पाल्य एक आदर्श नागरिक व्हावा ही जर आपली अपेक्षा असेल तर आदर्श नागरिकाच्या ठिकाणी असणाऱ्या गुणांचं पोषण हे बालवयापासून केलं पाहिजे. केवळ शालेय शिक्षणातून हे होणार नाही त्यासाठी घरही शाळा झाली पाहिजे आणि आई-बाबांनाही शिक्षकांच्या भूमिका जगाव्या लागतील.

मनुष्य हा एक समाजशील प्राणी आहे. त्याचा विकास हा समाजाशिवाय होऊच शकतं. पण आज चित्र असं दिसतं की माणूस समाजात असूनही समाजापासून अलिप्तपणे राहताना दिसतो. समाजाशी आपलं काही नातं आहे. समाजाचं आपण काही देणं लागतो ही भावनाच संपुष्टात येत आहे. एक गोष्ट सहजपणे आठवली. एक ७५ वर्षांचे वृध्द गृहस्थ अंगणात झाड लावण्यात मग्न होते. जवळच काही किशोरवयीन मुलं खेळत होती. त्यांचं लक्ष त्या गृहस्थाकडे गेलं. त्यांनी सहज चौकशी केली, "आजोबा, कुठलं झाड लावत आहात?" 'बेटा, हे अक्रोडाचं झाड लावतोय मी' आजोबांनी उत्तर दिलं. आजोबांचं उत्तर ऐकून मुलं हसायला लागली. आजोबांनी हसण्याचं कारण विचारलं. मुलं म्हणाली, "आजोबा, अक्रोडाच्या झाडला ८० वर्षानंतर फळं येतात असं ऐकलंय आम्ही. तुम्ही हे झाड लावताहात याची फळं खायला मिळतील का तुम्हाला? मग उगाच त्रास कशाला घेता," मुलांचं बोलणं ऐकून आजोबाच्या चेहऱ्यावर हसू फुटलं. ते म्हणाले, "मुलांनो, माझं वय आज ७५ वर्षाचं आहे आणि तरीही मी खूप अक्रोडं खाल्ली आहेत. तुम्ही वयानं इतके लहान आहात तरी तुम्हालाही भरपूर अक्रोड खायला मिळताहेत. अक्रोडाच्या झाडाला तर ८० वर्षानंतर फळं येतात. मग तुम्हा आम्हाला ही फळ कशी काय खायला मिळालीत. आपल्या करिता कुणीतरी ही झाडं लावून ठेवलीत म्हणूनच ना? मग पुढच्या पिढीला ही फळे मिळावीत म्हणून आपण झाडं लावून ठेवायला नकोत का?" आजोबाचं बोलणं ऐकून मुलं निरुत्तर झाली. कथा छोटीशीच आहे पण केवढा मोठा आशय प्रगट झालाय त्यातून! सामाजिक बांधिलकी सांगणारी ही कथा आपल्यालाही खूप काही शिकवणारी आहे. समाज जर आपल्या विकासासाठी, जीवनासाठी अनेक गोष्टी उपलब्ध करून देतो तर हे समाजऋण फेडण्यासाठी आपणही आपलं काही योगदान, ते विविध रूपात असू शकतं, दिलं पाहिजे हा संस्कारही मुलांना देणं अत्यावश्यक आहे. आपल्या ज्ञानाचा, संपत्तीचा, कला कौशल्याचा उपयोग समाज विकासासाठी केला पाहिजे. ही जाणीव बालवयापासून मुलांच्या मनात निर्माण व्हावी असा प्रयत्न जाणीवपूर्वक केला गेला पाहिजे. यासाठी समाजात जी चांगली कामं चालतात त्या कामाला मग ती अनाथ, अपंग मुलासाठी चालणारी कामं असो, कुष्ठरोग्यासाठी चालणारे आश्रम असो, साक्षरतेचं अभियान असा अशा कार्याला ज्या प्रकारची मदत करता येईल, ज्या स्वरूपाचं योगदान देता येईल त्या प्रकारचं योगदान दिलं पाहिजे. सामाजिक प्रबोधनाच्या कार्यात सहभागी झालं पाहिजे. ज्या सोयी आपल्याला समाजानं उपलब्ध करून दिल्या त्याबद्दल भरावा लागणारा कर वेळेवर भरण्याचं कर्तव्य पार पाडलं पाहिजे. समाजावर एखादा आघात होतो, कधी भूकंपानं असेल, महापुरानं असेल किंवा अशीच एखादी आपत्ती आली असेल तर समाज बांधवाच्या संरक्षणासाठी, मदतीसाठी आपला हात पुढे असला पाहिजे. अशा कार्यात स्वतःहून पुढं आलं पाहिजे. हे शिक्षण पालकच आपल्या पाल्याला देऊ शकतात. सामाजिक अन्यायाविरुद्ध लढणं हेही एक योगदान असू शकतं. शिक्षणातून आणि संस्कारातून एक सुसंस्कृत माणूस निर्माण व्हावा अशी अपेक्षा असेल तर या अन्यायाविरुद्ध मग तो हुंडापद्धती, जातीभेद, वर्णभेद यासारखा अपराध वा अन्याय असू शकतो, लढण्याचं शिक्षण दिलं गेलं पाहिजे. आपण आज मागे लागले आहो ते व्यक्तिगत विकासाच्या, व्यक्तिगत सुखाच्या, समाज सुखातच आपलं सुख साठवलेलं आहे. सामाजिक विकासातच आपलाही विकास आहे याची जाणीव हरवल्यामुळे आज अनेक प्रश्न व्यक्तिगत जीवनात व समाजातही निर्माण झालेले दिसतात. सामाजिक बांधिलकीचा हा हरवलेला भाव आपण आपल्या पाल्यात निर्माण करण्याच्या दृष्टीनं प्रयत्नशील होणं नितांत गरजेचं आहे.



# संस्कार शिक्षण-
# खरं शिक्षण



* घर झाडणे, पेपर घडी करून ठेवणे, बुटाला पॉलिश करणे, स्वतःचे कपडे धुणे, झाडांना पाणी घालणे, आपली वह्या-पुस्तके व्यवस्थित ठेवणे पाल्याला करू द्या.
* नातेवाईक, मित्र यांना पत्र लिहायला सांगा. समाजातील चांगल्या कामाचं कौतुक व वाईट गोष्टीचा निषेध करण्यासाठीही पत्र लिहायला शिकवा.
* आजाऱ्यांची सुश्रुषा करायची सवय लावा.
* मिरची, टमाटर अशी उपयुक्त झाडं घरी लावायची दृष्टी द्या. सहकार्य करा.
* संत व थोर पुरूषांच्या जयंत्या, पुण्यतिथी घरी साजऱ्या करा. मुलांना माहिती सांगण्याची संधी द्या. साहित्य पुरवा.
* सर्वांनी एकत्र बसून एखादी प्रार्थना, स्तोत्र रोज म्हणा.
* पुराणातील, इतिहासातील संस्कारप्रधान गोष्टी सांगा, वाचायला लावा.
* घरी येणाऱ्यांचं हसतमुखानं स्वागत करायला शिकवा.
* छंदाला उत्तेजन द्या. छंद जोपासण्याचं शिक्षण द्या.
* टेपरेकॉर्डर, दूरदर्शन, रेडिओ या साधनांचा वापर पाल्यांचं शिक्षण अधिक अर्थपूर्ण करण्यासाठी करता येईल, याचा विचार करा.

---

**तुमच्यासारखे मातृहृदयी शिक्षक कुणीही होऊ शकत नाही. आपलं बलस्थान ओळखा. सुसंस्कार घडवणारं शिक्षण द्या. शिक्षण म्हणजे वळण.**

# ७. मूल्यांचं घर की मौल्यवान घर

तेच डोळे देखणे जे कोंडिती स्वाऱ्या नभा
वोळती दुःखे जनाच्या, सांडिती चंद्रप्रभा।

कवी बोरकरांच्या या ओळी मला अतिशय भावल्या. विकसित व्यक्तिमत्त्वाच्या एका वैशिष्ट्यानं अतिशय सुंदर वर्णन यात केलं आहे. देखणे डोळे कोणते?

आकाशाला आपल्यामध्ये सामावून घेण्याइतके विशाल दृष्टीचे आणि दुसऱ्याची दुःखे पाहून ज्यांच्यातून तेजस्वी अश्रू ओघळतात, तेच डोळे खरे देखणे! आपल्या साधू संतांनी देखील हेच तत्वज्ञान आपल्यासमोर ठेवलेलं आहे. 'जे का रंजले गांजले। त्यासी म्हणे जो आपुले' जे रंजले गांजले, पीडित आहेत. त्यांना जवळ करणं हाच मानवता धर्म आहे. 'जे जे भेटे भूत, ते ते जाणिजे भगवंत' हीच शिकवण सर्वांनी दिली आहे. 'विष्णूमय जग वैष्णवाचा धर्म। भेदाभेद भ्रम अमंगळ।' "कोणाही जीवाचा न घडो मत्सर वर्म सर्वेश्वर पूजनाचे." सर्व प्राणीमात्रात परमेश्वर भरलेला असल्यामुळे इतरांना दुःख होईल असं वागू नये. उलट त्यांचं दुःख दूर करण्यासाठी प्रत्येकानं प्रयत्न केला पाहिजे. हाच मानवाचा धर्म असला पाहिजे. दुसऱ्या शब्दात माणसानं माणसासारखं वागणं म्हणजेच मानवता धर्म. अनेक ग्रंथातून, संतसाहित्यातून या मानवता धर्माविषयी खूप काही सांगितलं गेलं आहे. पण 'पुराणातील वांगी पुराणात' प्रत्यक्षात तसं वागायचं नसतं अशीच धारणा आज आपली झालेली दिसते. त्याचे परिणामही रोज आपल्या अनुभवाला येत आहे आपल्या पाल्यामध्ये असा मानवता धर्म रुजावा, त्यांनी माणूस म्हणून जीवनात उभं राहावं या दृष्टीनं आपला कितपत प्रयत्न असतो? आपला व्यवहार मुलांना तसा दिसतो कां? किमान घरात तरी आपण मानवतेच्या दृष्टीनं एकमेकांकडे बघतो कां?

ज्या घरात वृध्द आजोबा, आजी असते, आहेत. त्या घरात आपल्याकडून त्यांना कशी वागणूक मिळते हे मुलं बारकाईनं बघत असतात. एकदा दूरदर्शनवर 'घोंगडी' नावाच्या कथेचं नाट्यीकरण बघायला मिळालं. अतिशय मर्मावर बोट ठेवणारी व बोलकी कथा होती. आशय असा होता की, पत्नीच्या सांगण्यावरून मुलगा आपल्या वृध्द वडिलांवर अनेकानेक आरोप करतात आणि त्यांना घराबाहेर काढतात कारण त्या दोघांच्या संसारात त्यांना वृध्द वडील अडगळ वाटतात. वृध्द

वडील आपलं सामान घेऊन रडत बाहेर पडतात. त्यांच्या सामानातील एक पांघरायची घोंगडी तिथचं पडली असते. तीही घेऊन जायला सांगतात, त्यावेळी त्या घरात असलेला आणि हे सारं बघत असणारा ६/७ वर्षाचा मुलगा आपल्या वडिलांना म्हणाला,

'बाबा, मीच आजोबांकडून ती घोंगडी ठेवून घेतली आहे.' 'कशासाठी? काही ठेवायचं नाही त्यांच्या वस्तू, देऊन टाक त्यांना ती.' वडिलांचं त्यावर उत्तर. मुलगा म्हणाला, 'बाबा, मी मोठा झाल्यावर तुम्हाला जेव्हा घराबाहेर काढेन तेव्हा ती तुम्हाला देण्यासाठी म्हणून मी मुद्दाम ठेवून घेतलीय.' कथा इथंच संपते पण मुलांच्या त्या एका वाक्यानं कथेतील पात्रच नव्हे तर तुम्ही आम्ही सारेच अंतर्मुख होतो. आपण आपल्या घरात असणाऱ्या वडीलधारी माणसाशी कसं वागतो, त्यांच्या सुख-दुःखात किती आणि कशा पद्धतीनं सहभागी होतो हे सारं घरातील लहान मुलं बघत असतात आणि या बघण्यातून त्यांच्यात संस्कार संक्रमित होत असतात. वृद्धाश्रमाची कल्पना ही आपल्या संस्कृती परंपरेत बसणारी नाही. ज्यांनी आपल्याला जन्म दिला, जीवनात उभं केलं त्यांना त्यांच्या उत्तर आयुष्यात वृद्धाश्रमात जावं लागणं, त्यांचा अपमान, उपेक्षा होणं ही 'घर' या भारतीय संकल्पनेला निश्चितच शोभणारी गोष्ट नाही. याचं एक कारण आज जसा पाल्य आणि पालक यांच्यात संवाद नाही तसा तो वृद्ध पालक व तरुण पालक यांच्यातही राहिलेला नाही, त्यामुळे असे प्रश्न निर्माण होतात. हा संवाद जर प्रस्थापित झाला तर घरातले अनेक प्रश्न सहज सुटू शकतील.

घरातील वृध्दांची आपल्याकडून नेमकी काय अपेक्षा असते? मुलांनी आपली चौकशी करावी. दोन प्रेमाचे शब्द बोलावेत. आपला इतरांसमोर यात मुख्यतः सुना, नातवंड-अपमान करू नये. आदरानं, मानसन्मानानं वागवावं बस. जेष्ठ नागरिक मंडळातील अनेक वृध्दाशी मी जेव्हा या संदर्भात बोलतो तेव्हा त्यांच्या बोलण्यातून एकच एक सूर ऐकायला मिळतो तो हा की आता त्यांच्या मुलाला त्यांची काही गरज उरलेली नाही. लग्नानंतर मुलगा त्यांच्यापासून दुरावला वगैरे. काही प्रमाणात त्यांच्या ह्या उद्‌गारात सत्यता असते असं नाही. आपण आपल्या आई-वडिलांना वृध्दापकाळात आवश्यक त्या गोष्टी निश्चितच पुरवत असतो. पण या भौतिक गोष्टीपेक्षाही त्यांना हवं असतं प्रेम. हे प्रेम आपल्या कृतीतून आपल्याला व्यक्त करता आलं पाहिजे. ऑफिसमध्ये एखादं प्रमोशन मिळालं किंवा एखादी चांगली घटना तुमच्या जीवनात घडली तर घरी येताच वृध्द आई-बाबांशी न बोलता, त्यांच्याशी संवाद न करता पत्नीशी बोललो आणि नातवंडाकडून वा सुनेकडून ही वार्ता त्यांच्या कानावर गेली तर निश्चितच वृध्द आई-वडिलांना वाईट वाटेल. आणि आपला मुलगा दुरावला ही भावना बळावेल. उलट घरी येताच आई-वडिलांना ही वार्ता सांगितली आणि, 'आई-बाबा, तुमच्या आशीर्वादाचंच हे फळ आहे' असं एखादं वाक्य त्यांना ऐकायला मिळालं तर केवढी धन्यता वाटेल त्यांना! एखादी महत्त्वपूर्ण गोष्ट करण्यासाठी उदा. फ्लॅटची खरेदी, मोटार गाडी खरेदी, मुलाला एखाद्या चांगल्या कोर्ससाठी प्रवेश- आपण बाहेर जात असलो तर त्यांच्या आशीर्वाद व शुभेच्छासाठी थोडं खाली वाकलो त्यांच्या पायाशी- तर कुठली प्रतिष्ठा आडवी येणार असते आपली? पण हे केलं तर दोन गोष्टी सहज साधल्या जातात. एक म्हणजे आपण आपल्या आई-वडिलांना आनंद आणि समाधान देऊ शकतो आणि दुसरी गोष्ट आपल्या ह्या वर्तनातून घरातल्या लहान मुलांना एक संस्कारही देऊ शकतो. अनेकदा आपण आपल्या पत्नीशी, मुलांशी, मित्रांशी खूप बोलत असतो. गप्पा करत असतो. परंतु आई-वडिलांशी थोडा वेळ काढून बोलत बसलो आहे. गप्पा करतो आहे असं चित्र दिसत नाही. आई-वडिलांनाही वाटतं की मुलांनी आपल्यासाठी थोडा वेळ द्यावा, चार प्रेमाच्या गोष्टी कराव्या, प्रकृतीची चौकशी करावी. ही त्यांची अपेक्षा रास्त नाही असं कोण म्हणेल? आपण जसे आपल्या लहान मुलांचे पालक असतो तसं आपल्या वृध्द आईवडिलांचं पालकत्वही आपल्याकडे असतं. म्हणून जसा आपल्या मुलांसाठी आपल्याला वेळ काढावा लागेल तसा त्यांच्यासाठीही काढावा लागेल तरच आपली मुलं भविष्यात आपल्यासाठी वेळ देतील. याठिकाणी एक प्रश्न उपस्थित होतो की, पालक त्याच्या दोन अवस्थातील अंतर आणि त्यामुळे होणारे संघर्ष आणि वैचारिक दृष्टीकोण. अनेक घरातून असे संघर्ष बघायलाही मिळतात. अशा परिस्थितीत वृध्दांनाही ते घरात अडगळ न ठरता आधारवड ठरावेत म्हणून काय केलं पाहिजे, नव्या पिढीशी (मुलगा आणि नातवंड) कशा प्रकारे जुळवून घेतलं पाहिजे. बदलत्या परिस्थितीशी तडजोड (Adjustment) कशी केली पाहिजे. आपली मतं त्यांच्यावर न लादता नव्या काळाची गरज लक्षात घेऊन समायोजन कसं करायचं याचं शिक्षण घेतलं पाहिजे. पाल्याच्या सुयोग्य वाढीसाठी पालक प्रबोधनाची जशी आज आवश्यकता आहे तशी दोन अवस्थातील पालकांच्या मानसिकतेत बदल घडावा व घरातील सर्व घटकात सुसंवाद व्हावा म्हणून त्याच्याही प्रबोधनाची गरज आहे. याचा अर्थ पालक शिक्षण ही देखील एक निरंतर चालणारी प्रक्रिया आहे हे लक्षात येईल.

वृद्धांची सेवा, रुग्णाची सुश्रुषा याचा पाठ देखील मुलांसमोर घरातील माणसांनीच ठेवला पाहिजे. अनेकदा आपण पालकच आपल्या पाल्याला आजारी माणसाच्या सेवेपासून दूर ठेवतो. मुलांनी आजारी माणसाजवळ जाऊ नये- तेच आजारी पडतील अशी भीती पालकांनीच घेतली असते. अनेकदा एखाद्या आजारी मित्राला वा नातेवाईकांना दवाखान्यात भेटायला जावं लागतं. अशावेळी आपण

आवर्जून आपल्या पाल्याला घरी ठेवतो. वा त्याची कुठंतरी व्यवस्था करतो. खरं तर मुलांना सोबत घेऊन जायला काय हरकत आहे. जिथं कुठं त्याला रुग्णाच्या सेवेची संधी देता येईल ती आपण दिली पाहिजे. फक्त ती देतांना थोडा विवेक बाळगला पाहिजे. आपल्या मुलांचे वाढदिवस आपण साजरे करतो. या निमित्तानं गोड-धोड करून घरी एखादी पार्टी करण्यापेक्षा एखाद्या रुग्णालयात आपल्या पाल्याकरवी रुग्णांना फळं वाटप करणं यामुळं होणारा संस्कार हा दूरगामी स्वरूपाचा असतो. रूग्णाची सेवा, अपंगांविषयी आस्था बाळगावी हे भाषणाचे विषय असू शकत नाही. हे संस्कार त्यांच्यात रुजावे म्हणून आपल्यालाच तसे प्रयत्न व अनुभव द्यावे लागतील. आनंदवनाला, अपंग, दुर्बल मनस्क अशा संस्थांना पालकासोबत भेटी देऊन, जो भाग साधेल तो पुस्तक वाचून वा भाषणातून साधणार नाही. अनेकदा मोठी माणसं एखाद्याच्या व्यंगावर बोट ठेवतात. 'बहिऱ्या, लंगड्या, चकण्या' अशा शब्दांनी त्याचा उपहास करतात, मुलासमोर कोणता आदर्श ठेवायचा? आपण जसं बोलू तशीच मुलं बोलत असतात. आपल्याही घरी एखादा पाल्य अपंग असू शकतो, आपल्याही पाल्यात एखादं व्यंग असू शकते, पाल्याच्या मित्रातही एखादा व्यंग असणारा असू शकतो. त्याच्याशी आपल्या पाल्याचा व्यवहार कसा असावा या दृष्टीनं आचरणातून मार्गदर्शन करणं ही आपलीच जबाबदारी आहे. आपला पाल्य भावी काळात एक चांगला समाजसेवक, करुणावंत समाजसेवक व्हावा असं स्वप्नही दिलं पाहिजे आणि ते प्रत्यक्षात आणण्यासाठी तसे अनुभवही दिले पाहिजे. 'सुसंस्कृत कुटुंब हीच एक मोठी आदर्श शाळा आहे आणि सदाचारी माता-पिता यांच्या तोडीचे चांगले शिक्षक संभवत नाही' असं महात्मा गांधी म्हणतात ते याच अर्थानं.

भारतीय संस्कृतीत वृक्ष, निसर्ग, प्राणी, पक्षी या सर्वांनाच महत्त्वाचं स्थान दिलेलं आहे. सर्व चराचर सृष्टीत एकच परमेश्वर भरलेला आहे असं आपलं तत्त्वज्ञान. त्यामुळंच आपण झाडात, प्राणी, पक्षात परमेश्वर बघतो व त्याची पूजा करतो. पण ही पूजा करतांना अंधश्रद्धा मुलांच्या मनात निर्माण न होता वैज्ञानिक दृष्टीकोन निर्माण होईल असा प्रयत्न करणं हेही पालकांचंच काम आहे. वृक्षसंवर्धन, वृक्षारोपण का करायचं? साप आपले मित्र कसे आहेत? प्राण्याची संख्या घटल्यामुळं समतोल कसा बिघडतो. जंगलतोड झाल्यामुळं प्रदूषणाची समस्या कशी निर्माण झाली याची जाणीव त्यांच्या लहान वयातच करून देणं आवश्यक असतं. त्याच सोबत त्यांना वृक्षारोपण, वृक्ष संवर्धन करण्यासाठी प्रवृत्त करणं तशा संधी उपलब्ध करून देणं हीही आपलीच जबाबदारी आहे. पक्षी निरीक्षणासारखे छंद बालवयातच त्यांच्या ठिकाणी निर्माण होतील असे प्रयत्न असायला पाहिजे. शेवटी आपला आचार एक सुंदर विचार असतो.

आज समाजात सर्वांच्या चिंतेचा विषय आहे तो नैतिक आणि आध्यात्मिक मूल्याची पडझड. लहान मुलांना मूल्यांची परिभाषाही माहिती नसते ते फक्त अनुकरण करीत असतात ते घरातील माणसांचं, त्यांच्या आजूबाजूला असलेल्या व्यक्तींचं. केवळ समाज बिघडलेला आहे अशी ओरड करून त्याचा फारसा उपयोग होत नसतो. समाजाचेच आपणही एक घटक आहोत त्यामुळे मूल्याची प्रतिष्ठा प्रथम आपल्या आणि आपल्या घरापासून सांभाळल्या गेली पाहिजे. आपल्या पाल्याच्या जीवनाला मूल्यांचं अधिष्ठान असावं असं आपल्याला वाटत असेल तर आपला व्यवहार हा मूल्यांना धरून असला पाहिजे. शालेय वातावरण आणि अभ्यासक्रमातून ही मूल्य रुजविण्याचा प्रयत्न होत असला तरी यात शिक्षकाच्या भूमिकेपेक्षा पालकांची भूमिका महत्त्वाची व प्रधान असते.

एकदा पाचव्या वर्गातील मुलाला घरी काही स्वाध्याय दिलेला होता. त्यापैकी एकानं तो करून न आणल्यामुळं त्याला विचारलं. म्हणाला 'वह्या नाहीत' 'ताबडतोब वही घेऊन स्वाध्याय लिहायचा आणि उद्या दाखवायचा मला.' मुलानं नुसती मान हलवली. दुसऱ्या दिवशीही त्यानं स्वाध्याय सोडवला नव्हता. त्यामुळं जरा दाटून चौकशी केली तेव्हा तो रडत रडत सांगायला लागला की, त्याचे बाबा दोन दिवसापासून ऑफिसमध्ये न गेल्यामुळे त्यानं स्वाध्याय लिहिला नव्हता. बाबाचं ऑफिसला जाणं आणि त्याचं स्वाध्याय लेखन यात काय संबंध? मी अधिक रागावल्यामुळं मुलगा सांगू लागला, 'सर माझे बाबा मला वह्या-स्केल ऑफिसमधूनच आणून देतात. ते म्हणाले की उद्या ऑफिसमध्ये गेलो की घेऊन येईन. त्यांनी वह्या आणून देताच पूर्ण करीन सर स्वाध्याय' मुलगा खरं बोलून गेला पण शिक्षक म्हणून मीच अधिक गंभीर झालो. सरकारी कार्यालयातल्या वस्तू स्टेशनरी आपण घरी आणून मुलाला देत असू तर त्याचे मुलाच्या मनावर काय परिणाम होतील याचा पालक म्हणून गंभीरपणे आपण विचार करतो काय? एक साधी घटना म्हणून याचा उल्लेख केला असला तरी अशा घटनांचे अतिशय दूरगामी परिणाम होत असतात. मूल्य शिक्षणाचा, संस्कार रुजविण्याचा विचार जेव्हा आपण करतो तेव्हा वरवर साध्या साध्या वाटणाऱ्या गोष्टी करतानाही कसा विवेक आणि सावधपण बाळगलं पाहिजे हे आपल्या लक्षात येईल.

आपल्या पाल्यात कोणती मूल्ये रुजली पाहिजेत याची यादीच करायची झाली तर ती खूप मोठी होईल. स्त्री-पुरुष समानता, सर्वधर्मसमभाव, विज्ञाननिष्ठा, सामाजिक बांधिलकी, सार्वजनिक स्वच्छता, पर्यावरण संरक्षण अशी किती तरी मूल्ये सांगता येतील. पण त्यातही पालकांनी काही मूल्याच्या संदर्भात अधिक जागरुकपणे प्रयत्न करणं आवश्यक आहे. आज मर्यादित कुटुंबामुळे मुलांना हव्या त्या गोष्टी पालकांकडून मिळत असतात त्यामुळं दुसऱ्याला काही देण्याची,

दुसऱ्यासाठी त्याग करण्याची वृत्ती अभावानं आढळून येते. मलाच सारं काही मिळालं पाहिजे ही प्रवृत्ती वाढीला लागलेली दिसते. त्यामुळं कुटुंबासाठी, समाजासाठी, देशासाठी काही तरी दिलं पाहिजे. थोडा त्याग केला पाहिजे हा भाव किंवा त्याग हे मूल्य मोठ्या प्रमाणात आणि आग्रहपूर्वक रुजवण्याची आज गरज आहे. लोकशाही जीवनपद्धती आपण स्वीकारलेली आहे. लोकशाहीमध्ये दुसऱ्याचं बोलणं ऐकून घेण्याची, इतरांच्या विचाराचं स्वागत करण्याची तयारी असली पाहिजे. त्यासाठी 'सहनशीलता' हा संस्कार वा हे मूल्य देणाऱ्या पिढीमध्ये रुजलं पाहिजे. मी सांगतो तेच बरोबर, इतरांना काही सांगूच द्यायचं नाही आणि एखादा विरोधी विचार कुणी सांगू लागला तर तो उधळून लावायची प्रवृत्ती वाढत आहे. विधीमंडळात आज दिसणारं दृष्य यादृष्टीनं पुरेसं बोलकं आहे. त्यामुळे बालवयापासून मुलांमध्ये सहिष्णुता कशी बानेल याचा प्रयत्न पालक म्हणून आपल्यालाच करायला पाहिजे. याचा अर्थ असा की आपल्या घरातही लोकशाही जीवनपद्धतीचं चित्र मुलांना दिसलं पाहिजे. घरातील स्त्रीचा एखादा विरोधी विचार मुलांनाही काही सांगायचं असेल मग ते आपल्या मनाविरुद्धही असू शकेल पण ऐकून घेण्याची तयारी आपण दाखवतो कां? मुलांच्या मनावर त्याचे निश्चितच परिणाम होत असतात. असं वातावरण ज्या घरात असेल त्या घरातील पाल्यही धीटपणे बोलू लागतात आणि त्यातून परस्परातील संवाद ही अर्थपूर्ण होऊ लागतो.

आपल्या पाल्याच्या जीवनाला मूल्यांचं अधिष्ठान असावं म्हणून बालवयापासून त्यांना विविध अनुभव देणं. तशा प्रकारचे प्रयत्न करणं आवश्यक आहे. यासाठी खरी आवश्यकता आहे ती आपल्या घराला मूल्यांचं अधिष्ठान असण्याची. आज घराचंच अवमूल्यन झालं आहे. आपलं घर जास्तीत जास्त कसं सजवता येईल. अत्याधुनिक वस्तूची रेलचेल घरात कशी होईल. महागडं फर्निचर, त्यावर महागड्या गाद्या, रंगरंगोटी या सर्व बाबींतच आपण सारे गुंतून पडलो आहे. घराची श्रीमंती वाढविण्याच्या हव्यासापोटी आपण अधिकाधिक प्रयत्न करतो आहे पण हे करतांना शाश्वत जीवनमूल्ये आपण पायदळी तुडवत आहोत याचं भान मात्र कुणालाच राहत नाही. आपलं घर नैतिकमूल्याच्या पायावर उभं असेल, तर विशेष प्रयत्न न करताही पाल्यांमध्ये सहजपणे मूल्ये रुजतील पण श्रीमंतीचं प्रदर्शन करण्यासाठी जर आपली घर असतील तर प्रयत्न करूनही पाल्यांवर त्याचा फारसा परिणाम होणार नाही. तेव्हा आपलं घर हे मूल्यांचं घर असावं. मूल्यांच्या पायावर उभं असावं की मौल्यवान असावं, श्रीमंतीचं प्रदर्शन करणारं असावं हे ज्यानं त्यानं ठरवायचं आहे. तुमच्या आमच्या या निर्णयावरच पाल्याची एकूण घडणं ठरणार आहे.



# ८. घेतला वसा टाकणार नाही....

आपण साजरे करीत असलेले सण आणि उत्सव ही आपल्या संस्कृतीची एक महान देण आहे. या सण, उत्सवातून संस्कृती व काही चांगल्या परंपरांचं संवर्धन आणि संक्रमण हे शिक्षणांचं एक महत्त्वाचं उद्दिष्ट असल्यामुळे या उद्दिष्टपूर्तीसाठी शिक्षक आणि पालक या दोघांनाही या सण उत्सवाचा एक माध्यम म्हणून उपयोग करता आला पाहिजे आणि त्यातून मुलांचं व्यक्तिमत्त्व बहुआयामी करता आलं पाहिजे. या संदर्भात आपल्या पाल्यासाठी पालक म्हणून काय करू शकतो?

प्रत्येक शाळेत स्वातंत्र्यदिन, गणराज्यदिन यासारखे राष्ट्रीय उत्सव, अनेक महापुरुषांची जयंती, पुण्यतिथी, शिक्षक दिन, बालक दिन, पर्यावरण दिन अशा प्रकारचे काही महत्त्वाचे दिवस विविध कार्यक्रम घेऊन साजरे केले जातात. या सर्व कार्यक्रमांतून विद्यार्थ्यांच्या मनावर त्या त्या उत्सवाचं महत्त्व बिंबवणं, हा हेतू असतो. यानिमित्तानं महापुरुषांची चरित्र मुलांच्या कानावर पडतात आणि अशा कार्यक्रमातून विद्यार्थ्यांच्या सृजनशीलतेलाही वाव मिळतो. विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण विकासात शाळेतील उत्सवांना अनन्यसाधारण महत्त्व आहे. पण हल्ली शाळेतूनही हे कार्यक्रम कुळाचाराप्रमाणे घेतले जातात. मूळ उद्दिष्ट लक्षात घेऊन त्या कार्यक्रमाचं नियोजन केलेलं आहे असं दिसत नाही. आणि या सर्व कार्यक्रमाकडे बघण्याचा पालकांचा दृष्टिकोनही पाहिजे तेवढा गंभीर आणि सकारात्मक नाही. एकदा एका मित्राकडे बसलो होतो. आमच्या गप्पा चालू असतानाच त्यांचा प्राथमिक शाळेत शिकत असलेला मुलगा घरी आला. आल्या आल्या अतिशय आनंदात नि उत्साहात तो आईला सांगू लागला, 'आई, उद्या गांधी जयंतीनिमित्त शाळेला सुटी आहे.' यावर आईनं काय म्हणावं? 'बरं झालं, उद्या मावशीकडे जायचं होतं. आता लवकर निघता येईल.' आईची प्रतिक्रिया. आईची ही प्रतिक्रिया ऐकून मनात विचार आला ज्या महात्मा गांधींनी देशाच्या स्वातंत्र्यासाठी आपलं सारं जीवन समर्पित केलं त्या म. गांधींना किती लवकर विसरलो आपण ? महापुरुषांच्या, देशभक्त, क्रांतिकारक यांच्या संदर्भात पालक म्हणून आपला असा दृष्टिकोन असेल तर पाल्यावर काय संस्कार होणार! महापुरुषांच्या चारित्र्यातून, त्यांच्या जीवनकार्यातून आपल्या पाल्याला प्रेरणा मिळावी, त्याचं व्यक्तिमत्त्व विशाल व्हावं असं वाटत असेल तर या सण, उत्सवाकडे बघण्याचा आपलाही

दृष्टिकोन बदलला पाहिजे. केवळ शाळेत अशाप्रकारचे उत्सव साजरे करून पाल्याचा विकास होणार नाही तर शाळा आणि घर या दोन्हीही संस्कार केंद्रांत पाल्याच्या घडणीसाठी या सण-उत्सवाचा जाणीवपूर्वक वापर करून घ्यावा लागेल. या दृष्टीनं एका प्रयोगाचा आवर्जून इथं उल्लेख करावासा वाटतो. एका पालक मित्रानं माझ्याकडे तक्रार केली की ते पाल्यासाठी चांगली पुस्तकं विकत घेतात पण तो ती पुस्तक हातीच घेत नाही. त्याला वाचण्याची सवय कशी लावायची हा त्यांच्यासमोर प्रश्न होता. मी त्यांना घरी एक प्रयोग करायला लावला. ५, ६ दिवसांनंतर ज्ञानेश्वर पुण्यतिथी होती ती त्यांनी घरी साजरी करावी असं सूचवलं. त्या दिवशी अध्यक्ष वा वक्ता म्हणून हा त्याचाच पाल्य राहील. घरातच छोटं व्यासपीठ करायचं. ज्ञानेश्वरांचा फोटो, हार, दीप प्रज्वलनासाठी समयी आदी सर्व व्यवस्था करायची. एकानं वक्त्याचा परिचय तर एकानं आभार प्रदर्शन करायचं. घरी एकापेक्षा अधिक मुलं असतील तर या साऱ्या गोष्टी मुलांनीच करायच्या. श्रोते म्हणून आसपासची मुलं आणि जवळचे नातेवाईक बोलावयाचे. मुख्य म्हणजे मुलांना सहज समजेल असं ज्ञानेश्वर चरित्र ज्याच्याकडे वक्त्याची जबाबदारी सोपवली त्याला द्यायचं आणि ते वाचून त्याचं भाषण तयार करायला सांगायचं. मित्रानं हा प्रयोग केला. त्याच्या असं लक्षात आलं, की त्या पाल्याने मोठ्या आवडीनं ते पुस्तक वाचलं. भाषण तयार केलं. मुख्य म्हणजे सर्वांसमोर ७, ८ मिनिटं तो बोलला. या प्रयोगामुळं पालकांनाही आपल्या पाल्यातील वक्तृत्व गुणाचं दर्शन घडलं. एक चांगलं संस्कारक्षम पुस्तक वाचलं गेलं. पालक म्हणून आपण मनात आणलं तर काही ठराविक उत्सव आपल्याला घरात आयोजित करून पाल्याचं व्यक्तिमत्त्व फुलविता येईल. स्वातंत्र्यदिन, गणराज्यदिन या सारखे राष्ट्रीय सण देखील साजरे केले पाहिजेत. या सणांतून त्याचं महत्त्व बिंबवलं पाहिजे. वाचनाचा संस्कार हल्ली लोपत चालला आहे. अनेक महापुरुषांची चरित्रे वाचून त्यातून प्रेरणा घेऊनच नवं नेतृत्व पुढं येत असतं. त्यामुळं आपल्या पाल्यानं चांगली पुस्तकं वाचली पाहिजेत, हा आग्रह पालकांनी धरला पाहिजे. पाल्यासाठी चांगली संस्कारक्षम पुस्तकं विकत घेतली पाहिजे. वाढदिवसाला एखादी वस्तू देण्यापेक्षा पुस्तकांची भेट दिली पाहिजे. प्रत्येक घरात ज्ञानेश्वरी, दासबोध, गीता अशी चिरंतन प्रेरणा देणारी ग्रंथ संपदा असली पाहिजे. आज घरात रंगीत टी.व्ही. पासून वॉशिंग मशिनपर्यंत सर्व गोष्टी दिसतात पण संस्कारक्षम ग्रंथ साहित्य अभावानं दिसतं. 'ते हाताळणं यातून होणारा संस्कार कितीतरी महत्त्वाचा असतो.'

वर्षभरात आपल्या घरात अनेक सण साजरे होत असतात. सण म्हटला की मुलांना आनंद होतो. कारण त्यानिमित्तानं शाळेला सुटी असते व सणाच्या दिवशी गोडधोड खायला मिळतं. अनेक सण आपल्या संस्कृतीची महानता, सर्वसमावेशकता सांगणारे आहेत. त्यामुळं सणाचा संबंध सुटी आणि गोडधोडांशी आहे असा संकेत पाल्यांना मिळू नये. तर प्रत्येक सणामागे असणारी पार्श्वभूमी त्यामागं असणारा कथाभाग, त्याचं महत्त्व व त्यातून संस्कृतीचा परिचय करून देणं हा देखील पाल्याच्या व्यक्तिविकासाच्या प्रक्रियेतील महत्त्वाचा भाग असतो. काही पारंपारिक सणांना नवा वर्तमानकालीन आयाम देऊन नव्या परंपरा निर्माण करणं हेही पालकांचं काम आहे. आपण दीपावली साजरी करतो. दीपावलीचा पहिला दिवस म्हणजे नरकचतुर्दशी. या दिवशी भगवान श्रीकृष्णानी नरकासूराचा वध करून त्याच्या कारागृहातील स्त्रियांची मुक्तता केली अशी पौराणिक कथा आहे. ही कथा तर मुलांना सांगितलीच पाहिजे, पण वर्तमानकाळाशी त्याचा संबंध जोडता येईल का याचा विचारही केला पाहिजे. नरक म्हणजे घाण. या घाणीचा नायनाट करणं म्हणजे नरकासूराचा नाश. मग नरकचतुर्दशीच्या दिवशी घरातील, परिसरातील घाण नष्ट करणं, स्वच्छतेची शिकवण आणि संस्कार देणं हे सहजपणे करता येईल. यादृष्टीनं साने गुरुजींचं 'भारतीय संस्कृती' हे पुस्तक मार्गदर्शक ठरणारं आहे. आज दूरदर्शनवरून दाखविला जाणारा फॅशन शो, व्हॅलेन्टाईन डे, सौंदर्य स्पर्धा अशा प्रकारच्या येत असलेल्या नवनव्या पद्धती हे एक प्रकारचं सांस्कृतिक आक्रमण आहे. सांस्कृतिक आक्रमणापासून भावी पिढीला दूर ठेवायचं असेल तर आपल्या संस्कृतीतील अनेक चांगल्या गोष्टी पाल्यांना सणावाराच्या, सांस्कृतिक उत्सवाच्या निमित्तानं सांगितल्या जाणं आवश्यक आहे. हे सांगताना नव्या आणि जुन्या गोष्टीतील चांगल्याचा मेळ घालण्याचा प्रयत्न केला पाहिजे. जबाबदार पालकच हे करू शकतात पण त्यासाठी त्यांना शिक्षकांच्या भूमिका समर्थपणे, निभवाव्या लागतील म्हणूनच पाल्य होणं सोपं असतं पण पालक बनणं कठीण असतं.

लहान मुलांनाच नव्हे तर सर्वांनाच कथा ऐकायला आवडतात. कारण संस्कारांच प्रभावी माध्यम म्हणूनच कथा वाङ्मयाकडे पाहिलं जातं. महापुरुषाची, क्रांतिकारकांची चरित्रे वाचताना बालपणी त्यांनी ऐकलेल्या कथांचा त्यांच्यावर किती प्रभाव आणि परिणाम झाला होता, त्यातून त्यांना कार्यासाठी कशी स्फूर्ती मिळाली हे सहज लक्षात येतं. जिजाबाईंनी बालशिवाजीच्या मनात हिंदवी स्वराज्याची प्रेरणा, अन्याय-अत्याचाराविरुद्ध लढण्याची वृत्ती निर्माण केली ती रामायण, महाभारत पुराणातील कथा सांगून हा इतिहास आहे. ४०, ५० वर्षांपूर्वी प्रत्येक कुटुंबात आजी नावाची एक शिक्षण संस्था अस्तित्वात होती. या संस्थेभोवती रात्रीच्या वेळी सारी नातवंड गोळा व्हायची आणि कथा, गोष्ट सांगण्याचा हट्ट धरायची. उन्हाळ्याच्या दिवसात तर मोकळ्या अंगणात चांदण्या मोजत आणि आजीच्या तोंडून कथा ऐकतच लहान मुलं झोपी जायची. रामायण,

महाभारत त्याचप्रमाणं आटपाट नगराच्या कथा, परी-राक्षसाच्या कथा. अशा किती तरी कथा- यात अद्भूत कथा असायच्या, साहसकथा असायच्या आणि मूल्य रुजवणाऱ्या कथाही असायच्या. आज दुर्दैवानं आजी ही संस्था लोप पावत चालली आहे आणि आई-वडीलांना मुलांना गोष्ट सांगण्यासाठी वेळही नाही. मग मुलं संध्याकाळच्या वेळी दूरदर्शनला चिकटलेली दिसतात त्यात त्यांना केवळ दोष देण्यात अर्थ नसतो. कथा-गोष्टींतून मुलांच्या संवेदनशीलतेला आवाहन करता येतं, त्यांचं भावविश्व समृध्द करता येतं त्यातूनच त्यांच्या भावात्मक विकासाचा पायाही घातला जातो. आज कॉन्व्हेन्टमध्येच शिकणाऱ्या नव्हे तर मराठी संस्कृतीत वाढणाऱ्या १५ वर्षाच्या मुलांनाही श्रावणबाळाची, नचिकेत, प्रल्हादाची, चक्रव्यूह भेदणाऱ्या अभिमन्यूची गोष्ट माहिती असल्याचे दिसत नाही. दधिचींनी केलेला त्याग, भागिरथानं गंगा भूमंडळी आणण्यासाठी केलेले प्रयत्न हे संदर्भ पाठ्यपुस्तकातून अनेक ठिकाणी आलेले असतात पण मुलं मात्र अनभिज्ञ असतात. कारण त्यांच्या कानावरून या कथा कधी गेलेल्या नसतात, कुणी सांगितलेल्या नसतात. आणि स्वतःहून वाचन करण्याचा त्यांचा प्रयत्नही बालवयात झालेला नसतो. एक कारण पालकांना वेळ नसतो हे जसं आहे तसं मुलांना कोणत्या आणि कशा कथा सांगाव्यात याचीच माहिती त्यांना नसते मग आपले पाल्य जर संवेदनशून्य झालेत तर त्यात त्यांचा काय अपराध? म्हणून आज पालक म्हणून आपल्यावर जबाबदारी येते की, आपल्या पाल्याचं भावविश्व समृध्द करण्यासाठी, त्यांच्या भावनिक विकासासाठी आपल्याजवळ चांगल्या कथांचा संग्रह असला पाहिजे आणि चांगले संस्कार बालवयातच रुजविण्यासाठी कथा वाङ्मयाचा आवर्जून वापर केला पाहिजे. त्यासाठी वेळ काढला पाहिजे. वेळ नाही असे सांगून मोकळं होता येणार नाही. कथा सांगतानाही ती अतिशय प्रभावी व परिणामकारकपणे सांगितल्या गेली पाहिजे. कथाकथन हेही एक तंत्र आहे. आपल्या पाल्यासाठी हे तंत्रही आत्मसात करावं लागेल. मुलांचा वयोगट लक्षात घेऊन त्यांना कोणत्या कथा सांगायच्या त्याचाही विचार पालकांना करावा लागेल. अशा सर्व दालनांतून आपल्या पाल्यांना फिरवून आणायचं असेल तर आपल्यालाही प्रथम ही दालनं धुंडाळावी लागतील. दूरदर्शनवरही अनेक पौराणिक, ऐतिहासिक कथावर मालिका दाखविल्या जातात, अनेक महापुरुषांच्या, क्रांतिकारकांच्या जीवनावर देखील मालिका प्रसारित होत असतात. या मालिका मुलांना आवर्जून दाखविल्या पाहिजेत. बघण्याचा आग्रह धरला पाहिजे. दूरदर्शन हे जर शिक्षणाचं एक प्रभावी माध्यम मानलं जातं आणि घराघरात ते उपलब्धही आहे तर त्याचा वापर पालकांनीही घरात करून घेतला पाहिजे. सामान्यपणे दूरदर्शनवरील संस्कारक्षम कार्यक्रम मुलांनी बघावेत, असा आपला आग्रह नसतो. आग्रह असतो तो फक्त एकाच गोष्टीचा - त्यांनी सतत अभ्यास केला पाहिजे हा आणि एवढाच.

संगीत हे सुद्धा एक संस्काराचं माध्यम आहे. घरी मूल जन्माला आलं की प्रत्येक आईला कंठ फुटत असतो. मुलांना थापडताना, झोपवताना, खेळवताना आई गाणं म्हणत असते. यासाठी गाता आलं पाहिजे, गोड गळा असला पाहिजे, संगीताची जाण असली पाहिजे याची मुळीच गरज नसते. आपल्या बाळाच्या जीवनाला एक सुंदर स्वर लाभावा, सुंदर ताल मिळावा आणि त्याचं जीवन आनंदमय व्हावं हीच तिची इच्छा असते. मुलांनाही ठेका, ताल याची आवड असते. पण आज अनेक घरातून चित्र असं दिसतं की आई मुलाला झोपवताना कुठलेतरी सिनेमा गीत किंवा भावगीत म्हणत असते. मुलांच्या कानावर सिनेसंगीतच पडत असेल तर तेच संस्कार घेऊन तो पुढील वाटचाल करेल. त्यामुळं आपल्या पाल्याच्या घडणीसाठी विशेष करून आईनं कोणती गाणी मुलांच्या कानावर पडावीत याचा विचार करूनच ती गाणी म्हटली पाहिजे आणि शिकवलीही पाहिजेत. शिकवली पाहिजेत हा शब्दप्रयोग जाणीवपूर्वक वापरला आहे. मुला-मुलींना तो बोलायला लागल्यानंतर आपण अनेक गाणी शिकवत असतो. या गाण्यातूनही मुलामध्ये काही चुकीच्या धारणा तयार होऊ शकतात. आपल्याकडे लोकगीतांचा खजिना भरपूर आहे. घराघरांतून ही लोकगीतं म्हटलीही जातात. काही गीतातून सासू, दीर, नणंद या कशा वाईट असतात पती तेवढाच कसा चांगला अशी वर्णन येतात आणि या धारणा घेऊन मुली त्या त्या पात्राकडे भावी आयुष्यात बघत असतात. काही गीतांतून उदा.- 'सोनार, शिंपी, कुळकर्णी, आप्पा त्याची संगत नको रे बाप्पा' अशा प्रकारे काही समाजाविषयी गैरसमज निर्माण होऊ शकतो. असे संकेत व धारणेमुळं समाजस्वास्थ्य बिघडण्याला हातभार लावण्याचा दोष आपल्याकडे येऊ शकतो. म्हणून लहान मुलांना कोणती बालगीतं शिकवायसाठी निवडायची, कोणती गीत म्हणायची याचा विचार पालकांनाच करायचा असतो. शेवटी मुलाची घडण तो कोणत्या वातावरणात वाढतो, संवदेनशील वयात काय बघतो, ऐकतो यावरच होत असते. आजकाल अनेक घरातून सिनेगीतांच्या भेंड्या किंवा अंताक्षरी हा खेळ होत असतो. मुलासोबत आई-वडिलही त्यात सहभागी होत असतात. या खेळात लहान लहान मुलंही 'तू चिज बडी है मस्त मस्त' अशी गीतं म्हणतात. आई-वडिलांना त्याचं काहीही वाटत नाही. उलट ते त्याचं कौतुकच करताना दिसतात. लहान मुलांच्या तोंडी जे शब्दप्रयोग शोभून दिसणार नाही अशी गीतं मुलं गातात. आई-वडिलांना अभिमान वाटतो. कुणी पाहुणा आला तर आईच मुलाला सांगते, 'काकाला नाचून दाखव बरं?' मग मुलगाही अंग विक्षेप करून एखाद सिनेगीत म्हणून दाखवतो. यात मुलाचा दोष नसतो आपण त्यांना काय देतो, शिकवतो यावर अनेक गोष्टी अवलंबून असतात. यासाठी मुलापेक्षाही आईनं

बालगीते पाठ केली पाहिजेत. किमान माहिती करून घेतली पाहिजे. म्हणूनच आई होणं सोपं असतं पालक होणं त्यातही जबाबदार पालक होणं अवघड असतं.

यापूर्वीच्या प्रकरणात मुलांच्या सृजनशीलतेचा उल्लेख केलेला आहे. प्रत्येकाला परमेश्वरानं बुद्धीची जशी देणगी दिली आहे तशी कमी-जास्त प्रमाणात सृजनशीलतेची देणगी दिली आहे. शास्त्रीय भाषेत बोलायचं झाल्यास प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणी बुद्धी आणि सृजनशीलता ह्या दोन्ही मानसिक शक्ती विद्यमान असतात आणि शिक्षणातून या दोन्ही मानसिक शक्तींचा विकास व्हावा ही अपेक्षा असते. परंतु आज शिक्षक आणि पालक या दोघांचाही भर बुद्धिच्या विकासावरच आहे. परिणामतः ही सृजनशीलता दुर्लक्षित झाली आहे. उद्याचं जग हे सृजनशील व्यक्तींचं जग असणार आहे. त्यामुळे उद्याच्या आव्हानांना समर्थपणे तोंड देण्यासाठी सृजनशील व्यक्तिमत्त्व घडणं ही काळाची गरज आहे. दहा वर्षाखालील पाल्य ही अतिशय धडपडी, दुसऱ्या शब्दात अधिक सृजनशील असतात. वाफेला कोंडून ठेवल्यास ती जशी दुसऱ्या बाजूनं विध्वंसक रूपात बाहेर पडते त्याचप्रमाणे सृजनशीलतेला, धडपडीला अवरोध निर्माण करण्याचा, दडपण्याचा प्रयत्न केल्यास ती धडपडही विध्वंसक रूप धारण करू शकते. ही गोष्ट लक्षात घेऊन पालकांनी आपल्या पाल्याच्या सृजनशीलतेकडे, तिच्या विकासाकडे आवर्जून लक्ष पुरविले पाहिजे. आणि मुख्यतः त्यांना सृजनशीलतेच्या आविष्काराला संधी उपलब्ध करून दिल्या पाहिजेत. आईचा किंवा बाबांचा वाढदिवस साजरा करण्याची संधी आणि स्वातंत्र्य मुलांना देणं. एखाद्या घरगुती समस्येचं उत्तरही त्याला शोधायला सांगणं, आलेल्या माणसाचं स्वागत करण्याची, त्यांच्याशी बोलण्याची संधी देणं, बहिणीच्या वाढदिवसाला तिच्यावर एखादी कविता करायला सांगणं, घरी काही वस्तू तयार करण्यासाठी साहित्य पुरवणं आणि ती तयार करायला सांगणं अशा कितीतरी संधी आपण त्यांना देऊ शकतो. दीपावलीमध्ये त्यांना किल्ले तयार करणे, रक्षाबंधनाला स्वतःच राखी तयार करणे, वाढदिवस, नववर्ष अशा प्रसंगी ग्रिटींग्ज कार्ड तयार करणे, घराची सजावट, घरातील वस्तूंची मांडणी अशी अनेक कामं देऊन त्याच्या सृजनशीलतेच्या आविष्काराला वाव देता येईल. मात्र एक गोष्ट पालकांनी आवर्जून लक्षात ठेवली पाहिजे की सृजनशील व्यक्ती आपल्या कल्पनेनं इतरांपेक्षा काही वेगळं करून दाखविण्याचा प्रयत्न करीत असते. अशावेळी त्याचा उपहास न करता स्वागतशील दृष्टिकोन बाळगला पाहिजे. मुलांच्या वेगळ्या उत्तरांचंही न रागावता स्वागत केलं पाहिजे. त्यासाठी मनाची विशालता बाळगली पाहिजे. आपली मुलं खूप काही करू शकतात यावर विश्वासही ठेवला पाहिजे. दुसरी आणि महत्त्वाची गोष्ट अशी की ज्ञानाला जर मूल्यांचं अधिष्ठान नसेल तर ते विकृत होऊ शकते. त्याचप्रमाणे सृजनशीलतेला विवेकाची जोड नसेल तर तीही विध्वंसक रूप धारण करू शकते. त्यामुळं या सृजनशीलतेला आणि ज्ञानाला मूल्यांची बैठक कशी मिळेल, आपला पाल्य त्यानी प्राप्त केलेल्या ज्ञानाचा वापर समाजकल्याणासाठी कसा करेल, सृजनशीलता समाज विकासासाठी कशी राबवेल याचा विचार केला पाहिजे. त्यासाठीच संस्काराची गरज आहे. आणि ही जबाबदारी पालकांना सांभाळावी लागेल.

आज ग्लोबलायझेशनमुळे साऱ्या जगालाच एका मोठ्या खेड्याचं रूप प्राप्त झालं आहे. त्यामुळं अनेक समस्या आणि आव्हानं जगापुढं निर्माण झाली आहे. या समस्या दूर करण्यासाठी देशादेशात जसं सामंजस्य आवश्यक आहे तसं व्यक्ती-व्यक्तीतही असणं गरजेचं आहे. म्हणून विश्व नागरिकत्त्वाची कल्पना समोर आली आहे. आपल्या देशाचा विचार करतानाच विश्वावर त्याचे काय परिणाम होतील हाही विचार करावा लागणार आहे. त्यामुळं नव्या पिढीत विश्वात्मक भाव रुजवणं हीही उद्याची नव्हे आजची गरज आहे. आपली संस्कृती ही त्यादृष्टीनं अत्यंत उदार दृष्टिकोन ठेवणारी आहे. ज्ञानेश्वरांनी पसायदान मागताना - 'आता विश्वात्मके देवे' असा विश्वात्मक परमेश्वराचा उल्लेख केला आहे. तर सर्व संतांनी - 'विष्णूमय जग वैष्णवाचा धर्म। भेदाभेद भ्रम अमंगळ।' अशीच शिकवण दिली आहे. विनोबांनी देखील 'जय जगत' असाच नारा दिला आहे. त्यामुळे या संतचरित्रातून हा विश्वात्मक भाव पाल्याच्या मनात रुजविण्याच्या दृष्टीनं निश्चितच प्रयत्न करता येईल. आपल्या संस्कृतीतील अनेक प्रतिकं, कथामागे असणारे संकेत, आपण साजरे करीत असलेले सणवार अनेक महापुरुषांची चरित्रे, पारंपरिक गीत या सर्वांचा उपयोग ही नवी मूल्यं रुजविण्यासाठी केला पाहिजे. यातून संस्कृती संवर्धन-संक्रमणासोबत 'माणूस घडणीचं' कार्य करण्याचं एक सात्विक पण आत्मिक समाधान आपल्याला मिळू शकेल.

मला लहानपणी माझी आजी खूप कथा सांगायची या कथेत पौष महिन्यातील रविवारच्या कथा मला मनापासून आवडायच्या. मात्र या कथेचा शेवट ठरलेला असायचा. उतणार नाही, मातणार नाही, घेतला वसा टाकणार नाही. आपल्या मुलांच्या घडणीसाठी, त्याच्या सर्वांगीण विकासासाठी संस्कृती संक्रमणाचा व संवर्धनाचा वसा आपण घेतला पाहिजे. टी.व्ही. माध्यमातून, अनेक परदेशीय कंपन्यांमुळं जीवनाकडे बघण्याच्या चुकीच्या कल्पनेमुळं, आणि सुखाच्या कल्पनेतही बदल घडून येत असल्यामुळे या संस्कृतीवर आघात करणाऱ्या प्रवाहात वाहून न जाता आपण घेतलेला वसा टाकणार नाही असा संकल्प केला पाहिजे. शुद्ध संकल्पाची फळं ही अमृतफळच असतात हे वेगळं सांगायची गरज नाही.



# ▬ शाळेला पूरक शिक्षण ▬

पालक बंधूनो,

शाळेत शिकवलं जातं तेच शिकवू नका. ते पक्के होईल असे अनुभव द्या!

* मुलांना बाहेर नेऊन किंवा गच्चीवरुन सूर्योदय, सूर्यास्त दाखवा. दक्षिणायन, उत्तरायण सांगा.
* रात्री आकाश दर्शन घडवा. ग्रह, नक्षत्रे, तारे दाखवा. फरक सांगा.
* पाल्याला पोष्टात घेऊन जा. कार्ड, लिफाफा, अंतरदेशीय पत्रे विकत घ्यायला लावा. मनिऑर्डर करायला सांगा.
* बाजारात, मंडईत न्या. फळं, भाजी निवडणे, भाव करणे, विकत घेणे, वजन नीट बघणे हे अनुभव देता येईल.
* किराणा दुकानातून आणायच्या मालाची यादी, भाव, हिशेब करायला शिकवा.
* घरातील इलेक्ट्रीक व इलेक्ट्रॉनिक उपकरण हाताळायला शिकवा.
* बागेत न्या. प्राणीसंग्रहालयांना भेटी द्या. पानाफुलांचा, झाडांचा, प्राणी, पक्षी यांचा परिचय करून द्या.
* रेल्वे, बसस्थानक, विमानतळावर न्या. आरक्षण कसे करायचे सांगा.
* आपल्या दृष्टीसमोर बल्ब लावणे, फ्यूज बसवणे, सिलिंडर लावणे, गाडीचा प्लग साफ करणे ही कामे करून घेता येईल.
* वाहनांचा परिचय, सिग्नल्स, रस्ता कुठे आणि कसा ओलांडायचा हे सहज समजावून सांगता येईल.
* मुलांनी बघावा असा चित्रपट असेल, सर्कस असेल तर जरुर दाखवा.
* वृक्षारोपण, राष्ट्रीय उत्सव इ. कार्यक्रमात सहभाग देण्यास प्रवृत्त करा.

**''अनुभव हा मोठा विचित्र शिक्षक आहे. तो प्रथम परीक्षा घेतो व नंतर शिकवतो.''**
**शाब्दिक ज्ञानाला अनुभवाची जोड द्या. अनुभवसमृद्धी हेच खरं शिक्षण. आपल्या पाल्याला अनुभवाने श्रीमंत होऊ द्या!**

# १. संवाद - पाल्याला समजून घेण्यासाठी

स्वेट मार्डेनचं पुस्तक वाचताना त्यातील एका गोष्टीनं माझं लक्ष वेधून घेतलं. गोष्ट तशी स्वतंत्र नव्हती. दाखला म्हणून लेखकानं त्या घटनेचा उल्लेख केला होता. घटना अतिशय साधी पण तितकीच बोलकी व विचार करायला प्रवृत्त करणारी होती. एका अतिशय महागड्या हॉटेलमध्ये मळकट कपडे घातलेला, केस अस्ताव्यस्त असलेला, खूप श्रम केल्यामुळं थकल्यासारखा वाटणाऱ्या एका १२/१३ वर्षाच्या मुलानं प्रवेश केला. त्याला बघून स्वागत कक्षातील तरुणीला वाटलं, की हा मुलगा बहुधा एखादं काम मागण्यासाठी आलेला असावा म्हणून त्या तरुणानं काही बोलण्याच्या आत 'आमच्याकडे काहीच काम नाही' असे म्हणून तरुणीने त्याला हटकले. त्या तरुणीचं बोलणं ऐकून तो तरुण एकदम भडकला. म्हणाला, 'मॅडम तुमच्या हॉटेलमध्ये लोक काम मागायला येतात की जेवायला? मी काही खायला आलो आहे.' मुलाचं उत्तर ऐकून ती तरुणी सर्दच झाली पण लगेच थोड्या चेष्टेच्या स्वरात म्हणाली, 'हे हॉटेल अतिशय श्रीमंत लोकांसाठी आहे. भरपूर पैसा असेल खिशात त्यांनाच आत यायचं असतं.' ''मॅडम, ग्राहकांचं स्वागत करण्याची हीच पद्धत आहे का आपल्या हॉटेलची?'' मुलाच्या या उत्तरानं ती तरुणी वरमली. शेवटी तो मुलगा हॉटेलातील एका कोपऱ्यातल्या टेबलाजवळ जाऊन बसला. वेटर येताच त्यानं त्याला आईस्क्रीम आणायला सांगितलं, 'कोणतं आणू? ८० डॉलर्सचं चालेलं? वेटर मुलानं खिशात हात घातला. पैसे मोजले आणि म्हणाला, 'यापेक्षा कमी किमतीचं असेल ना? '७० डॉलर्सचं आणू का मग? वेटर. मुलानं पुन्हा एकदा खिशातील पैशाची चाळवाचाळव केली आणि त्यापेक्षा कमी किमतीचं आहे का याची चौकशी केली. पैसे मोजत आणि भाव करत आईस्क्रीम मागणारं गिऱ्हाईक वेटरही पहिल्यांदाच बघत होता. शेवटी मुलानं ६० डॉलर्स किंमत असलेलं आईस्क्रीम मागवलं. वेटरनं ते आणून देताच ते आधाशासारखं त्यानं संपवलं. वेटर बिल घ्यायला आला तेव्हा त्याला, दिसलं की मुलानं बिलाचे साठ डॉलर्स तर दिले होतेच पण सोबत वीस डॉलर्सची वेटरसाठी टीपही ठेवली होती. ते बघून सारेच वेटर स्तंभित झाले. वास्तविक मुलाजवळ ८० डॉलर्स होते व तेवढ्या पैशाचं किमान ७० डॉलर्सचं आईस्क्रीम तो खाऊ शकला असता, पण त्यानं प्रथम विचार केला तो टीप द्यायचा. वेटर मनाशी म्हणाला, 'आपण आलेल्या

मुलाला ओळखू शकलो नाही त्याला हसण्यात आपली फार मोठी चूक झाली. मुलगा खरोखरच महान होता. आपण सारे लहान झालो.' हा मुलगा इंग्लंडमध्ये फार मोठा माणूस म्हणून पुढे आला. ही घटना यासाठीच दिली की त्या वेटरसारखी, स्वागत कक्षातील तरुणीसारखी आपली पालकांची अवस्था आहे. आपण देखील आपल्या पाल्याला खऱ्या अर्थानं ओळखलं, समजून घेतलं आहे का?

मित्रहो, आतापर्यंत आपल्या पाल्याच्या सर्वांगीण विकासासाठी, तो एक माणूस म्हणून उभा राहण्यासाठी शालेय अभ्यासक्रमासोबतच पूरक शिक्षण कोणतं द्यायचं? संस्कारासाठी कोणते उपक्रम, प्रयोग करायचे? पालक म्हणून आपल्या वर्तनात कोणतं आणि कसं परिवर्तन करायचं? या संदर्भात सविस्तर चर्चा केली आहे. पण मुद्दा असा की, आपल्या पाल्याला आपण समजून घेतलं नसेल, तर या साऱ्या गोष्टी निरर्थक ठरतील. म्हणून आवश्यकता आहे ती त्याला समजून घेण्याची. आता आपल्या पाल्याला समजून घ्यायचं म्हणजे नेमकं काय करायचं? प्रथम त्याला समजून घेण्यासाठी आपली मानसिकता तयार केली पाहिजे. ही स्वीकारणं आवश्यक आहे. ती पुढीलप्रमाणे-

**१. बौद्धिक वयात वाढ -**

आपला पाल्य आपल्यापेक्षा किमान पंचेवीस वर्षानं लहान आहे आणि ही अशी Generation gap नेहमीच असणार आहे. पण आपला पाल्य हा २५ वर्षानं लहान असला तरी या पावशतकात घडून आलेल्या सर्व क्षेत्रातील बदलाचा त्याच्यावर झालेला परिणाम आणि त्यामुळं त्याच्या बौद्धिक क्षमतेत झालेली वाढ आपण अनेकदा गृहीत धरत नाही. त्यामुळं त्याला समजून घेण्यात अनेक अडचणी निर्माण होतात. २५ वर्षापूर्वी आपण पाल्य म्हणून ज्या कौटुंबिक वातावरणात वाढलो असेल, आपल्या पालकांनी आपल्याला ज्या शैक्षणिक सुविधा उपलब्ध करून दिल्या असतील त्यापेक्षा आज किती तरी वेगळया वातावरणात आपला पाल्य वाढतो आहे. अनेक सुविधा आपण त्यात उपलब्ध करून दिल्या आहेत. मुख्य म्हणजे तो घराचा केंद्रबिंदू असल्यामुळं त्याच्याकडे आपण विशेष लक्ष आणि स्वातंत्र्यही देतो आहे. माझ्या बालपणी १०/20 रुपयांची एखादी नवीन वस्तू घरात आली तर तिला हातही लावण्याची आम्हाला परवानगी नसे. मात्र आजचा लहान मुलगा देखील रिमोट कन्ट्रोलचे बटन दाबून दूरदर्शनवरील अनेक चॅनल बघत असतो. अनेकदा तर घरातील वृध्द माणसं आपल्या लहान मुलानाचं दूरदर्शन, डेक लावून मागत असतात. अनेक गोष्टी आणि त्याचबरोबर स्वातंत्र्य जसं त्यांना मिळालं आहे तसा भौतिक प्रगतीचाही परिणाम त्यांच्यावर असल्यामुळे ती अधिक चौकस, बहुश्रुत झाली आहे. त्यांचं बौद्धिक वयही वाढले आहे. त्यामुळं मुलांना समजून घ्यायचं असलं तर पालक म्हणून पहिलं काम केलं पाहिजे, की आपला पाल्य वयानं आपणापेक्षा लहान असला, तरी अधिक चौकस अधिक बहुश्रुत आहे यावर विश्वास ठेवायला पाहिजे.

**२. प्रसारमाध्यमाचा परिणाम -**

माहिती तंत्रज्ञानाचा विस्फोट हे तर नव्या शतकाचं वैशिष्ट्य आहे. आज आकाशवाणी, दूरदर्शन ही माध्यमही मागे पडत चालली असून इंटरनेट, ई-मेल, संगणक यासारख्या माध्यमांशी मुलं मैत्री करू लागली आहेत. या सर्व साधनांमुळं जगतातील अद्ययावत ज्ञान आपल्या घरात येऊन पोहोचलं आहे. टी.व्ही. मुळं मुलं बिघडली असा आरडा-ओरड करतानाच टी.व्ही. सारख्या माध्यमानी मुलाच्या ज्ञानात खूप मोठी भर टाकली आहे हे विसरून कसं चालेल? त्यामुळं आजची मुलं आपल्यापेक्षा अधिक बुद्धिमान आहे यावर विश्वास ठेवला पाहिजे. माझी मुलं मला ईमेल करतात. मला मात्र ते जमत नाही कारण त्यांचा या माध्यमाशी येणारे संबंध आणि त्यांच्या भावी आयुष्याच्या दृष्टीनं या माध्यमाची उपयुक्तता त्याला अधिक वाटते. जी मला फारसी वाटली नाही आणि माझ्या बालपणी या सर्व साधनांची माहितीही मला नव्हती कारण ती साधनचं उपलब्ध नव्हती.

प्रसारमाध्यमामुळं मुलांच्या ज्ञानात जशी भर पडली आहे तसा काही प्रमाणात दृष्टिकोनही बदलला आहे. आज शालेय अभ्यासक्रमातून विज्ञाननिष्ठा, वैज्ञानिक दृष्टिकोन अशी काही मूल्ये (जी २५ वर्षापूर्वी नव्हती) प्रगतीमुळं लहान मुलं देखील एखाद्या गोष्टीचा पारंपरिक पद्धतीपेक्षा वेगळा विचार करताना दिसतात. त्यांचे प्रश्न अनेकदा पालकांनाही अडचणीत टाकणारे, निरुत्तर करणारे असतात. त्यामुळं आपण सांगू त्या सर्वच गोष्टी जशाच्या तशा ते स्वीकारतील असं नाही. आपण सांगितलेल्या एखाद्या गोष्टीला विरोध होण्याची शक्यता असते. या विरोधी सूरांनाही अनेकदा संवाद सुलभ होण्यासाठी गृहीत धरलं पाहिजे. त्यासाठी आपली मनं विस्तारली पाहिजे. मी सांगेन तेच त्यानं केलं पाहिजे, मी ज्या पद्धतीनं विचार करतो त्या पद्धतीनंच त्यानं केलं पाहिजे, असा अहंकारी आग्रह आपण धरणार असू तर पालक आणि पाल्य यांच्यात कधीच प्रभावी संवाद होणार नाही आणि पर्यायाने पाल्याला समजूनही घेता येणार नाही.

**३. संधी देण्याची तयारी -**

आपला पाल्य अनेकदा अमकी एखादी गोष्ट करू का म्हणून विचारतो. अशावेळी आपण त्याला 'तू लहान आहेस' असं सांगून ते करण्यापासून परावृत्त करतो. आपल्या मुलात खूप काही क्षमता असतात, अनेक कलागुण असतात. त्याच्या आविष्काराची संधी जर त्याला मिळाली नाही, आपण जर ती दिली नाही

तर आपला पाल्य आपल्याला समजून घेता येणार नाही. इटली देशात एण्टोनियो नावाचा एक मुलगा होता. शिक्षणात त्याचं फारसं लक्ष नव्हतं. घरी अठराविश्व दारिद्र्य, तो काही करायला लागला, हे करू कां, ते करू कां असं काही विचारायला लागला की वडील रागवायचे. चार पैसे कमावं म्हणायचे. शेवटी या मुलाला एका घरी वडलांनी नोकरी लावून दिली. त्या माणसाकडे तो भांडी घासायचा. वेळ मिळाला की दगडफोड्याकडे मूर्तीकाम करून रोजी कमवायचा. एके दिवशी त्याच्या मालकानी घरी भोजन समारंभ आयोजित केला होता. या समारंभात शहरातील अनेक व्यापारी, कलाकार सहभागी झाले होते. त्यांच्याकडे असणाऱ्या खानसाम्यानं (आचारी) टेबलावर ठेवण्यासाठी एक सुंदर केक तयार केला. तो टेबलावर ठेवता ठेवता त्या केकचा एक तुकडा तुटून खाली पडला. ते बघून मालक फारच अस्वस्थ झाले कारण, पाहुणे यायची वेळ झाली होती. भांडी घासणारा एण्टोनियो तिथंच घुटमळत होता. त्यानं मालकास चिंता करू नका सर्व व्यवस्थित होईल, असा विश्वास दिला. त्या भांडी घासणाऱ्या एण्टोनियोनं काय केलं? लोण्याचा एक गोळा घेतला आणि त्याला वाघाच्या तोंडाचा सुंदर आकार देऊन तो केकला जोडला. एवढ्यात पाहुणे आलेत आणि तो केक बघून आश्चर्य करू लागले. एकानं मालकाला विचारलं हे वाघाचं तोंड कुठल्या कलाकारानं तयार केला आहे? 'भांडी घासणाऱ्या मुलानं' मालकाचं उत्तर. त्यानंतर त्या मालकानं त्या मुलाला कलेचं उच्च शिक्षण दिलं आणि तो जगातील एक मोठा कलाकार म्हणून पुढे आला, पुढे इटलीतील जगप्रसिद्ध व्हीनसची मूर्ती याच कलाकारानं म्हणजे एण्टोनियो कानोवानं घडवली होती. 'मालकानं त्यावेळी केकला वाघाचं तोंड लावण्याची संधी जर मला दिली नसती तर मी जगप्रसिद्ध कलाकार होऊ शकलो नसतो' असं एण्टोनियो म्हणतो. आपल्या पाल्यातही असा एखादा एण्टोनियो लपलेला असू शकतो. म्हणून आपल्या पाल्यात खूप काही कलागुण असू शकतात. आपल्याला ज्या गोष्टी जमू शकल्या नाही त्या तो करू शकतो असा विश्वास बाळगून अधिकाधिक संधी त्याला उपलब्ध करून दिल्या पाहिजेत. पण त्या देतानाही आपल्या आवडीपेक्षा त्याच्या आवडीनिवडीला अधिक महत्त्व दिलं पाहिजे तर त्याला समजून घेणं सोपं होईल.

**संवाद कौशल्य (Communication Skill) -**

पाल्याला समजून घेण्यासाठी आवश्यक आहे ते संवाद कौशल्य. संवाद म्हणजे एकमेकानं एकमेकाशी मोकळं बोलणं, मनापासून बोलणं, परस्परांची सुख-दुःख समजावून घेणं, परस्परांच्या भावनांशी समरस होणं आणि स्नेहपूर्ण वातावरण निर्माण करणं. घरात असा संवाद नसेल तर घर मुकी होऊ लागतात आणि पाल्याशी होणाऱ्या संवादात अडथळे निर्माण होत असल्यास तीही हळूहळू मुकी बनू लागतात. पॉल लिगन्सनी संवादाची व्याख्या केली ती अशी-

"Communication is the process by which two or more People exchange facts, ideas, feeling, impressions and like in a manna that the receiver gains a clear understanding of the meaning, intent and use of the message.

बालक आणि पालक यांच्यातील संवादाचं, संभाषणाचं एकमेव माध्यम म्हणजे भाषा. त्यामुळं आपल्या पाल्याशी अतिशय चांगला संवाद साधण्यासाठी संवादाची संकल्पना, संवादशास्त्रातील तंत्र आणि भाषिक कौशल्य पालकाला आत्मसात करणं ही आजची गरज आहे. पुढे काही तंत्र आणि कौशल्य दिलेले आहे ती लक्षात घेऊन आपण पाल्याशी अधिक चांगला संवाद करू शकू आणि तो पाल्य जाणून घेऊ शकू.

**१) पारंपारिक कल्पनांचा त्याग करा-**

आपला पाल्य आपल्याशी काही बोलत असतो. त्याला आपल्याला काही सांगायचं असतं. आपणही त्याच्याशी संभाषण करीत असतो. अशा वेळी मुलांनी वडिलाशी अशाच पद्धतीनं बोलायचं असतं आणि वडिलांना देखील मुलांशी एका विशिष्ट पद्धतीनचं संभाषण केलं पाहिजे, अशी पालकांची धारणा असते. याचाच अर्थ असा की, पारंपरिक संभाषण पद्धती आणि शिस्तीच्या चुकीच्या कल्पना याचा पालकांवर फार मोठा प्रभाव असतो. हा प्रभाव आणि ह्या चुकीच्या धारणा प्रथमतः दूर झाल्या पाहिजेत. दुसरी गोष्ट पाल्याच्या मनात वडिलांविषयीची एक चुकीची प्रतिमा अनेकदा तयार झाली असते किंवा ती तयार केली जाते. त्यामुळं साधारणतः सर्वच घरातून आईपेक्षा वडिलांची भीती मुलांना अधिक वाटत असते. वडील घरी येताच अनेक घरात मुलं एकदम शांत होतात, मस्ती करणे, खेळणे, ओरडणे सारं काही क्षणात थांबून जातं. आई देखील मुलाला धाक दाखवताना, 'बाबा घरी येऊ दे. म्हणजे सांगते त्यांना तुझे उपद्व्याप' अशी तंबी देत असते. त्यामुळं वडील अतिशय कठोर. शिक्षा करणारे तर आई न रागावणारी, शिक्षा न करणारी. आपल्या साऱ्या बऱ्यावाईट गोष्टी खपवून घेणारी अशा प्रतिमा मुलाच्या मनात घर करून बसतात. ह्या गोष्टी देखील पूर्वापार चालत आल्यासारख्या वाटतात. सुलभ व अर्थपूर्ण संवादासाठी ह्या प्रतिमाही बदलल्या गेल्या पाहिजे. पाल्याशी बोलताना अनेकदा पालकांचा 'स्व' देखील आडवा येतो. आपण म्हणू तेच पाल्यानी केलं पाहिजे आणि आपण ठरवू त्याच पद्धतीनं त्याच्या समस्या सुटल्या पाहिजे अशा न्यूनगंडानं जर आपण पालक पच्छाडलेले असू तर मोकळ्या

मनानं मुलंही त्यांच्या समस्या मांडणार नाही. डॉ. थामस गार्डन यांनी प्रभावी संभाषणाचं (Effective Communication) जे तंत्र विकसित केलं आहे त्यात या पारंपरिक कल्पना प्रभावी संभाषणासाठी कशा घातक ठरतात, ते सांगितलेलं आहे.

**२) आस्थावान श्रोते व्हा -**

आपला पाल्य जेव्हा आपल्याशी संवाद करीत असतो तेव्हा त्याला काही समस्या असते, काही सांगायचं असतं. आपल्या भावना पालकांपर्यंत पोचविण्याची त्याची धडपड असते. अशावेळी पाल्य वक्ता आणि आपण श्रोता अशी भूमिका असणं आवश्यक आहे. पण श्रोत्याची भूमिकाही आस्थापूर्वक निभावणं गरजेचे असते. कारण आपलं बोलणं बाबा ऐकून घेत आहेत. एका अर्थानं ते आपल्याला समजून घेत आहे असं त्याला वाटलं तरच तो मोकळ्या मनानं बोलू, सांगू लागेल. पण याचा अर्थ असा नाही, की श्रोत्यानं फक्त गप्प बसायचं. तो जे काय बोलत असेल ते ऐकत असतांना त्याला उत्तेजनात्मक प्रतिसाद दिला गेला पाहिजे. दूरध्वनीवर दुसऱ्याचं बोलणं ऐकत असतांना आपण 'बरं, हं, पुढं, असं आश्चर्य वाटतं बा!' असा प्रतिसाद देऊन त्याला मन मोकळं करण्यास उत्तेजन देत असतो. या संभाषणात श्रोता दिसत नसतो. पण समोरासमोर जेव्हा संभाषण होतं तेव्हा शाब्दिक प्रतिसादासोबत आपल्या चेहऱ्यावरील हावभावही त्याला उत्तेजन देणारे असायला हवेत. पाल्याचं संपूर्ण बोलणं ऐकून घेऊनच मगच त्यावर आपली प्रतिक्रिया व्यक्त केली गेली पाहिजे. पुष्कळदा असं होतं की आपण पाल्याचं संपूर्ण बोलणं ऐकून घेण्यापूर्वीचं काही सांगण्याचा, सल्ला देण्याचा किंवा समज देण्याचा प्रयत्न करतो. त्यामुळं संवादात अडथळा येतो व पुढे काही सांगायचं असूनही मुलगा बोलायचं थांबतो. म्हणूनच आस्थावान श्रोता होण्यासाठी संयम आवश्यक असतो हे साधलं तर संवाद, संभाषण अधिक अर्थपूर्ण ठरत. स्नेहार्द्र ठरतं.

**३) प्रतिष्ठेचा बागुलबुवा करू नका -**

अनेक पालकांना आपल्या पाल्याच्या विकासापेक्षा स्वतःच्या प्रतिष्ठेचाच प्रश्न महत्त्वाचा वाटतो. त्यामुळं आपल्यास प्रतिष्ठेला साजेसचं आपल्या मुलानं वागावं अशी त्यांची अपेक्षा असते. मुलं स्वाभाविक प्रवृत्तीनं काही कृती करीत असतात. वागत, बोलत असतात. त्यांना प्रतिष्ठा शब्दाचा अर्थही कळत नसतो. पण मुलाच्या या स्वाभाविक वृत्तीशी प्रतिष्ठेचा प्रश्न निगडित करून पालक त्यांच्याशी जेव्हा संभाषण करतात. बोलतात तेव्हा मुलावर एक मानसिक दडपण येत असतं आणि या दडपणामुळं मुलं आईबाबांशी बोलतांना पोटातलं न बोलता ओठातलं बोलू लागतात. त्यातूनच खोटं बोलण्याची सवयही वाढीस लागते आणि यातूनच दोघांमधील संवाद खंडित होतो. उरते ती फक्त निरर्थक शब्दांची कसरत. मुलानं अभ्यास केला पण तो नापास झाला. त्याच्या नापास होण्यामुळं आपली प्रतिष्ठाच धुळीला मिळाली असा गैरसमज करून जर आपण त्याला नको त्या शब्दात बोलू लागलो तर मुलंच बोलेनाशी होतात. घरी अनेकदा पाहुणे येतात. पाहुण्यापैकी कुणीतरी मुलाच्या हातात जातना पैसे ठेवतात. मुलं ती घेतात. त्यांच्या मनात कुठला भाव नसतो. उलट काकांनी आपल्याला बिस्कीटचा पुडा घ्यायला पैसे दिलेत याचा आनंद असतो. पण त्यांनी पैसे किंवा एखादी वस्तू घेतली की आपल्यालाच कमीपणा आला असा ग्रह करून आपण त्याला दाटत असतो. 'भिकारड्यासारखा हात पसरायला लाज नाही वाटली? पुन्हा घेताना दिसला तर बघ' अशा शब्दांनी त्याचा समाचार घेतो. परिणाम असा होतो, की तुम्ही समोर असलात तर ती कृती करणार नाही पण तुमच्या दृष्टीआड ती करेल. एखादं वेळी, आई मुलाला घेऊन मैत्रिणीकडे जाते. त्या मैत्रिणीपेक्षा तिला किंवा तिच्या पतीला समाजात प्रतिष्ठेचं स्थान असेल. आर्थिकदृष्ट्याही ती अधिक संपन्न असेल. मैत्रिणीने तिच्यासाठी काही खायला (तिच्या ऐपतीप्रमाणे) केलं असेल. मुलाला तो पदार्थ आवडला आणि तो त्यानं दोनदा मागून घेतला. यात मुलाचं काही चुकलं कां? ती त्याची स्वाभाविक वृत्ती आहे. पण आईला त्याची ती स्वाभाविक कृती कमीपणा आणणारी वाटते आणि मग घरी येताच, 'घरी तुला खायला मिळत नाही कां? आधाश्यासारखा तीन तीनदा पदार्थ मागून खातांना लाज वाटायला पाहिजे तुला' अशा शब्दांनी त्याची निर्भत्सना केली जाते. मुलाला आईच्या ह्या बोलण्याचा अर्थच कळेनासा होतो. आपली चूक कोणती हेही त्याला कळलेलं नसतं. उलट, किती चवदार झालेला होता. तसा आपल्या ही घरी कर. पण आईचं बोलणं ऐकून, संताप बघून आईशी संभाषण करण्याची इच्छाच मुलाची संपून जाते. म्हणून समजून घ्यायचं असेल तर प्रत्येक वेळी आपल्या प्रतिष्ठेचा बागुलबुवा उभा करू नये. मुलाच्या निर्भय विकासात अनेकदा ही प्रतिष्ठाही अडसर ठरत असते.

**४) संवादासाठी - भाषा कौशल्य -**

संवादानं स्नेह वाढतो. माणसं जोडली जातात. एकमेकांच्या सुख-दुःखात सहभागी होता येतं. संवादानं माणसं कळतात. समजून घेता येतात. असं संवादाचं महत्त्व आहे. संवादात जर काही उणिवा (Communication Gaps) निर्माण झाल्या तर गैरसमज वाढतो. माणसं दुरावतात. आपण या ठिकाणी विचार करतो आहे तो आपल्यात आणि आपल्या पाल्यात होणाऱ्या संवादाचा, संभाषणाचा. हा विचार करण्यामागं आपली भूमिका स्पष्ट आहे ती ही की आपला पाल्य आपल्याला नीट

कळावा त्यांच्यातलं आणि आपल्यातलं अंतर न वाढता त्याला विकासाच्या वाटेनं जाण्यासाठी सहकार्य करणं आता हा संवाद भाषेच्या माध्यमातून होत असल्यानं पाल्याशी बोलताना भाषिक कौशल्य जर आपल्याजवळ नसेल तर अनेकदा संवाद खंडित होऊ शकतो. प्रथम सत्र परीक्षेची गुणपत्रिका घेऊन मुलगा घरी आला. त्याला सर्व विषयात ७५ पेक्षा अधिक गुण होते पण इतिहास या विषयात केवळ ४० गुण मिळाले. ती गुणपत्रिका वडिलांना दाखवताना मुलगा म्हणाला, 'बाबा, मला इतिहास हा विषय जमतच नाही हो. काही लक्षातच राहत नाही.' 'बाकी गोष्टी लक्षात राहतात. अभ्यासाच्या कशा राहतील? दिवसभर हुंदडत जा. अभ्यास करायला नको,' वडिलांची प्रतिक्रिया त्यावर अशी असेल तर पुढं मुलगा प्रामाणिकपणे वडिलाजवळ आपली तक्रार सांगणारच नाही. या उलट, 'इतिहास हा विषय तसा कठीणच आहे. पण तुला जमेल असा माझा विश्वास आहे' असा दिलासा आणि आत्मविश्वास निर्माण करणारी भाषा वापरली तर मुलगा अधिक मोकळा होऊ शकेल. एखाद्या वेळी मुलाचा अपराध नसतानाही त्याला आई अथवा वडिलांकडून शिक्षा केली जाते. शाळेतही असा एखादा प्रसंग घडू शकतो. मुलांना हे कुणाजवळ तरी सांगावसं वाटतं. मग मुलगा आईजवळ येऊन सांगू लागतो. 'आई आज माझ्या बाईनं मला उगीच काही कारण नसताना मारलं.' पुढे आणखी काही तिला सांगायचं असतं पण अर्धवट ऐकून, 'तू काही तरी खोड्या केल्याशिवाय त्या कशा मारतील. मारणार नाही तर काय पूजा करणार?' अशा प्रकारची प्रतिक्रिया व्यक्त केली तर मुलाला आपल्या आईनं अविश्वास व्यक्त केला म्हणून अधिक दुःख होईल. अशा वेळी एक तर मुलाचं पूर्ण संभाषण ऐकून घेणं आवश्यक असतं आणि आपण त्याचं दुःख समजून घेतलं आहे. अशा सहानुभूतीपूर्ण भाषेत त्याला कळणं महत्त्वाचं आहे. मुलांना अनेकदा रागवावं लागतं. समजावून सांगायचं असतं, त्याच्या चुका त्याला दाखवायच्या असतात. त्याला सुंदर वळण द्यायचं असतं यासाठी मुलांच्या पातळीवर येऊन, त्याला समजेल पण त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा नीट आदरही राखला जाईल अशा भाषेत त्याच्याशी संभाषण करता येण्याचं कौशल्य आत्मसात करता आलं पाहिजे. अकबराच्या दरबारात एकदा एक जोतिषी आला. राजानं त्याला आपलं भविष्य विचारलं. तेव्हा जोतिषी म्हणाला, 'महाराज, तुमचे सर्व नातेवाईक तुमच्या समोर मृत्यू पावतील.' भविष्य ऐकून राजा संतापला आणि त्यानं त्याला तुरुंगात टाकलं. दुसऱ्या दिवशी, दुसरा जोतिषी आला. त्यालाही राजानं भविष्य विचारलं तो म्हणाला, महाराज, तुमच्या सर्व नातेवाईकांपेक्षा तुम्हाला आयुष्य अधिक आहे. भविष्य ऐकून राजा खूष झाला आणि त्याला बक्षीस दिलं. वास्तविक पाहता दोघांनीही एकच भविष्यवाणी केली होती. दोघांच्याही वाक्यातील आशय एकच होता पण दुसऱ्यानं भाषिक कौशल्याचं प्रदर्शन केलं होतं जे पहिल्याला जमलं नाही. आपल्यालाही अशा कला आपल्या पाल्याच्या विकासासाठी, स्नेहपूर्ण संवाद होण्यासाठी अवगत केली पाहिजे. आपल्यालाही अशा कला आपल्या पाल्याच्या विकासासाठी, स्नेहपूर्ण संवाद होण्यासाठी अवगत केली पाहिजे.

**५) मनाचं प्रांजळपण -**

आपण जिथं कुठं काम करीत असतो तिथं अनेक घटना अशा काही घडत असतात, की त्याचा ताण आपल्या मनावर येत असतो. उद्योग करणाऱ्या व्यक्तीलाच अशी एखादी आर्थिक हानी सोसावी लागते, की त्यामुळं त्याच्या मनाचं संतुलन बिघडतं. कधी असे काही प्रश्न आणि समस्या आपल्यापुढे असतात की त्यामुळं मन अस्वस्थ होतं. अनेकदा घरी येताना हे ताणतणाव आपण सोबत घेऊन येत असतो. घरी येताच मुलाला आपल्याला काही तरी सांगायची घाई झालेली असते. तो सांगू लागताच आपण एकदम चिडतो, भडकतो. त्याच्यावर रागावतो. बाबा आपल्यावर कां रागावले? आपलं काय चुकलं? हे समजून घेण्याची क्षमता मुलाची नसते. त्यामुळं त्याला जे सांगायचं असतं ते राहून जातं आणि आपल्याविषयी उगाच गैरसमज त्याच्या मनात निर्माण होतो. गैरसमज हा तर संवादातील सर्वात मोठा अडसर ठरतो. अशा घटनाची पुनरावृत्ती होत असेल तर पालक घरी येताच मुलगा स्वतःला कुठंतरी लपवण्याचा, त्यांच्यापासून दूर राहण्याचा प्रयत्न करतो. अशावेळी पालकानी मनाचा प्रांजळपणा व्यक्त करायला हवा. आपली कुठंतरी चूक झाली हे लक्षात घेऊन मुलांना विश्वासात घेऊन त्याची योग्य जाणीव करून द्यायला हवी. बालक-पालक यातील गैरसमज वाढणार नाही याची काळजी पालकानाचं घ्यायला हवी. आपल्या मनावरील ताणतणावाचा परिणाम मुलाच्या विकासावरच होतो असं नाही तर सारं घरचं विस्कळित होत असतं. घरातला संवाद संपून केवळ वादच ऐकायला येऊ लागतो. जपानी व्यक्तीबद्दल असं सांगतात, की ती व्यक्ती घरा बाहेर पडताना अद्ययावत पोषाख, करीत असली सर्व क्षेत्रात त्यांनी पाश्चात्याकडून अद्ययावत ज्ञान, तंत्रज्ञान संस्कृती स्वीकारली असली तरी घरात प्रवेश करताना चपला सोबत या साऱ्या गोष्टी तो बाहेर काढून ठेवतो आणि जपानी संस्कृती घेऊनच आत शिरतो. मला वाटतं आपल्याला देखील असेही ताणतणाव, इतरा विषयीचा राग, द्वेष दाराबाहेर ठेवून घरात प्रसन्न, प्रांजळ मनानी प्रवेश करता आला पाहिजे. 'मन करा रे प्रसन्न। सर्व सिध्दिचे कारण' असं तुकोबा सांगतात. ते यासाठीच. असं मन प्रसन्न करायला, आरशासारखं स्वच्छ ठेवायला एक साधना लागते. सांगण्यासारखं, लिहिण्यासारखं ते सोपं नाही याची जाणीव असूनही त्या दिशेनं जाण्याचा विचार आणणं गरजेचं

आहे. आपल्या घराचं देवघर करायचं की सुधाकर घर करायचं हे शेवटी आपल्याच हाती आहे. परस्परातील स्नेहपूर्व संवादामुळं देवघरातील प्रसन्नता घरभर अनुभवता येईल. वाद-विसंवाद असेल तर परस्परावरील अविश्वासामुळं सुधारगृहात कोंबलेल्या व्यक्तीसारखी आपली अवस्था होईल. मुलांच्या विकासासाठी, त्याला समजून घेण्यासाठी जो मनःसंवाद आवश्यक आहे तो आपल्याला अधिक सुलभपणे अधिक स्नेहपूर्ण करता यावा या दृष्टीनं ही चर्चा केली.

पण केवळ मुलाशी संवाद करून त्याचा सर्वांगीण विकास होईल, असं मानण्याचं कारण नाही. ज्या शाळेच्या आणि शिक्षकाच्या स्वाधीन आपण आपल्या पाल्याला केलेलं आहे त्या शाळा आणि शिक्षकांशीही आपला संवाद होणं, कोणत्याही प्रकारचा पूर्वग्रह न ठेवता, आवश्यक आहे. या दृष्टीनं शाळा आणि शिक्षकाशी कसा संवाद व्हायला हवा याची चर्चाही तितकीच महत्त्वाची आहे. पुढील प्रकरणात त्यावर विचार करू या!



# १०. संवाद - शाळेशी, शिक्षकांशी

एखाद्या बँकेमध्ये आपण मुदत ठेवींमध्ये रक्कम गुंतवतो. कारण त्यावर व्याज अधिक मिळत असतं. काही मुदतीनंतर आपली ठेव दाम दुप्पट होऊन मिळत असते. अशा ठेवी ठेवण्यामागे भविष्याचाही विचार असतो. १० वर्षांनंतर आपण निवृत्त होणार तेव्हा ही दाम दुपटीनं मिळणारी ठेव आपलं म्हातारपण सुखात व्यतीत करायला मदत करेल असं आपल्याला वाटतं. कुणाला मुलीच्या विवाहाची चिंता असते. कुणाला मुलाच्या शिक्षणाची काळजी असते आणि त्या त्या वेळी हा ठराविक मुदतीनंतर मिळणारा पैसा माणसाला खूप मदत देऊन जातो. किती मुदतीसाठी आपण आपली ठेव ठेवली आहे याची आपल्याला माहिती असते, त्याचं प्रमाणपत्रही आपल्याजवळ असतं. पण मुदतीपूर्वी कितीदा तरी आपण ही प्रमाणपत्र बघत असतो आणि बघता बघता अनेक स्वप्नांचे मनोरे उभे करीत असतो. पैसा, प्रमाणपत्र या तर भौतिक गोष्टी आहेत तरी देखील आपण किती जपतो, किती सावध आणि सतर्क असतो! परंतु आपली एक जीवंत ठेव, चैतन्य ठेव म्हणजे आपली मुलं एका 'शाळा' नावाच्या संस्थेला ठेव म्हणून दिली असते. दहा वर्षांनंतर ती दामदुप्पट होऊन आपल्याला परत मिळावी अशी अपेक्षा असते. आपल्या मुलात ज्या क्षमता, जे सुप्तगुण असतात त्यांचा पूर्ण विकास दुसऱ्या शब्दात सर्वांगीण विकास व्हावा ही इच्छा असते. परंतु दहा वर्ष एका शाळेत शिकत असलेला, शाळा नावाच्या संस्थेच्या स्वाधीन असलेला आपला पाल्य शालेय शिक्षण पूर्ण होताच आपल्या आणि समाजाच्या अपेक्षेप्रमाणं घडलेला दिसतो कां? 'हो' उत्तर देण्याचं धाडस कुणीही करणार नाही. मग केवळ परीक्षार्थी होण्यासाठी आपण ही ठेव शाळेच्या स्वाधीन केली असते कां? याचंही उत्तर होकारार्थी असं येणार नाही. आपण शाळेकडे सोपविलेल्या आपल्या पाल्यात अपेक्षित परिवर्तन दिसून येत नसेल, त्यांचा सर्वांगीण विकास घडून येत नसेल तर याला जबाबदार कोण? केवळ शाळा, शिक्षक? शाळा आणि शिक्षकाकडे बोट दाखवून आपल्याला मोकळं होता येणार नाही. कारण आजच्या एकूण शिक्षण पद्धतीमध्ये पालकांचाही सहभाग तितकाच महत्त्वपूर्ण आहे. शाळा आणि घर म्हणजेच पालक आणि शिक्षक यांच्या संवाद आणि सहकार्याशिवाय पाल्याचा सर्वांगीण विकास अशक्यच असतो. याचा अर्थ बँकेत ठेवलेल्या ठेवींविषयी आपण जेवढं सावध नि सतर्क असतो त्यापेक्षाही अधिक जागरूकता, सावधानता आपल्या

पाल्याच्या विकासाची हमी घेणाऱ्या शाळेविषयी बाळगली पाहिजे. पालकांनी एक गोष्ट जाणीवपूर्वक लक्षात ठेवली पाहिजे, की आपली मुलं ही केवळ आपली ठेव नाही. ती देशाचं भविष्य आहे. देशाची, समाजाची ती ठेव आहे.

पालक शाळेत आणि पालक सभेत पालकांना मी आवर्जून एक प्रश्न विचारत असतो. 'तुमचा पाल्य ज्या शाळेत शिकतो त्या शाळेच्या मुख्याध्यापकांचं, आणि पाल्याला शिकविणाऱ्या शिक्षकाचं पूर्ण नाव सांगा.' अनेक पालकांना ही नावं माहिती नसतात. त्यांचा परिचय नसतो. ज्यांच्याकडे आपण आपली मुलं सोपवली आहे. त्यांची नावही माहिती असू नयेत? याला जागरुकता, सावधानता म्हणायचं कां? काही पालक मुलांना शाळेत घालायच्या वेळी आणि वार्षिक परीक्षेच्या निकालाच्या दिवशी फार तर शाळेत जातांना दिसतात. बस एवढाच शाळेशी त्यांचा संबंध. रस्त्यानी जातांना किंवा एखाद्या सार्वजनिक समारंभात आपल्या पाल्याचे शिक्षक, मुख्याध्यापक भेटले तरी आपण त्यांच्याकडे वा ते आपल्याकडे बघून ना हसतात ना बोलतात. कारण एकमेकांशी परिचयच नसतो. काही पालक स्वतःला जागरूक पालक समजतात. ते सांगतात की मुलांच्या शाळेत किमान एक महिन्यातून एकदा तरी ते जातात. मुलाच्या अभ्यासाच्या संदर्भात चौकशी करतात. मुलाला शिक्षा झाली असेल, मुलानी काही तक्रार केली असेल तर लगेच ते शिक्षक व मुख्याध्यापकांना भेटतील. एवढंच काय तर परीक्षेत मुलाला एवढेच गुण का मिळाले याबद्दल शिक्षकांशी वादविवादही करतात. ह्या आणि अशा गोष्टी केल्या, वारंवार मुलांच्या चौकशीसाठी शाळेत चकरा केल्या म्हणजे जागृत पालक म्हणायचं कां? माझा अनुभव असा आहे की अनेक शाळात असे जागृत पालक गेले की शिक्षक-मुख्याध्यापकाच्या कपाळावर आठ्या पडलेल्या दिसतात. का पडाव्यात? एका पालक शाळेत उपस्थित असलेल्या एका पालकाचा अनुभव यापेक्षा जरा वेगळा वाटला म्हणून तोही उधृत करावासा वाटतो. हे पालक सरकारी अधिकारी होते. त्यांचा पाल्य गाडीतून शाहेत यायचा. ते कधी कुठल्या कार्यक्रमाला शाळेत गेलेले नव्हते. एकदा त्यांच्या पाल्यानी घरी येऊन त्याच्याजवळ तक्रार केली, की रोज वर्गातला एक मुलगा त्याचा डबा त्याच्या अपरोक्ष उघडून खातो. पालकांनी तक्रार ऐकून त्याला सूचना केली, की ही तक्रार त्यानं वर्गशिक्षकाजवळ करावी. चार दिवसानंतर परत मुलानं वडिलांना सांगितलं की शिक्षकाना सांगूनही शिक्षकांनी त्या मुलाला शिक्षा मात्र केली नाही. मग मात्र हे पालक शाळेत गेले आणि शिक्षकांनी त्या डबा खाणाऱ्या मुलाला शिक्षा का केली नाही. याबद्दल वाद घालायला लागले. शिक्षक काही सांगायचा प्रयत्न करीत होते पण पालक ऐकायलाच तयार नाही. शेवटी एक गोष्ट पालकांनी मान्य केली, की ते शाळेत गेल्यामुळं मुलाचा डबा खाणं बंद झालं. त्याचा प्रश्न सुटला. हा अनुभव सांगितल्यानंतर पालक शाळेतील गटचर्चेत यावर चर्चा झाली. त्यांच्या मुलाचा डबा चोरून खाणारा मुलगा कोण होता? तो रोज चोरून डबा का खात असावा? शिक्षकांनी त्याला शिक्षा का केली नसावी? कदाचित तो मुलगा उपाशी तर शाळेत येत नसावा? वादविवाद केल्यानं त्या मुलाचं डबा खाणं बंद झालं की शिक्षकांनी त्या मुलाला समजून घेऊन समजावून सांगितलं असेल, त्याची काही व्यवस्था केली असेल म्हणून तो प्रश्न सुटला? आपण फक्त आपल्याच मुलाचा विचार करतो थोडं मन मोठं करून त्याच्या वर्गातील इतर विद्यार्थ्यांचाही विचार करायला लागलो तर यासारखे प्रश्न सुटणार नाहीत कां? चर्चा करणारे पालक जरा विचारी होते. त्यांना कदाचित आपली चूक कळली असावी. कारण पालकशाळेनंतर त्यांनी जो संकल्प लिहून दिला त्यात - मुलासोबत थोडा अधिक डबा द्यायचा आणि वर्गात ज्यानं डबा आणला नसेल त्याला मुलांनी आपल्या डब्यात सहभागी करून घेण्याची प्रेरणा द्यायची. संकल्प छान होता. तो त्यांनी पूर्णही केला असेल. पण एवढं केलं म्हणून ते जागृत पालक ठरतात काय? एकदा जागरूक पालकत्वाची संकल्पनाच थोडी तपासून बघायला पाहिजे. म्हणजे आपल्या पाल्याच्या विकासासाठी पालक, जागरूक पालक म्हणून शाळेला काय योगदान देता येईल याचा विचार करता येईल.

**शालेय कार्यक्रमात उपस्थिती -**

शाळेला पालकाकडून योगदान, सहकार्य हवं असतं ते मुख्यतः उपस्थितीच्या रूपात. स्नेहसंमेलन, शारीरिक शिक्षण दिन, पारितोषिक वितरण समारंभ अशा प्रकारचे काही कार्यक्रम प्रत्येक शाळेत होत असतात. अशा कार्यक्रमांतून विद्यार्थ्यांच्या अनेक कलागुणांचं प्रदर्शनही बघायला मिळत असतं. अशा कार्यक्रमांची निमंत्रणं पालकांना पाठविलेली असतात. मुलंही आपल्या पालकांना उपस्थित राहण्याचा आग्रह करीत असतात. शाळेच्या मुख्याध्यापक व शिक्षकांनाही मोठ्या संख्येनं पालक यावेत असं मनापासून वाटत असतं. ज्या मुलांचा या कार्यक्रमात सहभाग असतो त्यांनाही आपल्या आई-बाबांनी आपला कार्यक्रम बघावा असं वाटत असतं. आपल्या उपस्थितीमुळे मुलांचा उत्साह वाढतो आणि शिक्षकांनाही एक मानसिक समाधान मिळतं. अनेक शाळेत संमेलनाचा अध्यक्ष म्हणून मला जाण्याची संधी मिळते. त्यावेळी आवर्जून जाणवते ती पालकांची अनुपस्थिती. तेव्हा ज्या ज्या वेळी शाळेकडून अशा प्रकारच्या कार्यक्रमाचं निमंत्रण येईल त्या त्या वेळी पालकांनी सवड काढून उपस्थित राहण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

आज शाळाशाळांतून शिक्षक-पालक संघाची स्थापना झालेली आहे. विद्यार्थ्यांची गुणवत्ता वाढविण्याच्या दृष्टीनं त्याच सोबत शालेय विकासाच्या संदर्भात

मुख्याध्यापकांच्या काही योजना असतात. या योजनांची माहिती पालकापर्यंत पोहचावी, या योजनेत पालकांनाही सहभागी करून घ्यावं, त्यांच्याही काही सूचना असतात त्याचीही दखल घ्यावी म्हणून शिक्षक पालक संघाद्वारे पालक मेळावे किंवा पालक सभांचं आयोजन केलं जात असतं. पण या सभांना पालकांची उपस्थिती दखल घ्यावी अशी कधीच नसते. हा सर्वच शाळांचा अनुभव आहे. शाळेनं ठरविलेल्या योजना या आपल्या मुलाच्या विकासासाठी, त्याच्या गुणवत्ता वाढीसाठी आहेत तेव्हा आपल्याला या सभांना गेलंच पाहिजे या आस्थेनं पालकांनी उपस्थित राहायला पाहिजे. कारण अनेक योजना पालकांच्या सहकार्याशिवाय पूर्णत्वास जाणंच शक्य नसतं. म्हणून शालेय कार्यक्रमातील पालक म्हणून आपली उपस्थिती अत्यंत महत्त्वाची बाब आहे.

**संवाद - शिक्षक - मुख्याध्यापकांशी -**

सर्वसामान्यपणे आपण पालक शाळेत जातो ते आपल्या पाल्याची चौकशी करण्यासाठी. ही चौकशी पाल्याच्या अभ्यासक्रम, त्याची परीक्षेच्या दृष्टीनं तयारी, त्याची शाळेतील उपस्थिती, त्याचं शाळेतील वर्तन या संदर्भातील असते. आपण शाळेत भेटतो तो त्याच्या वर्गशिक्षकाला किंवा मुख्याध्यापकाना. या चौकशीसाठी जाणं आणि शिक्षक मुख्याध्यापकांची भेट घेणं हे पालक म्हणून आपलं कर्तव्यचं असतं. शाळेला अशा भेटी वर्षभरातून फार तर दोनदा होत असतील. अशा भेटीनं शिक्षक-पालक संवाद तर घडून आला पण अशा संवादानं अर्थपूर्ण शिक्षणं आणि जागरूक पालक या दोन्ही गोष्टी संभवत नाही. आजचं शिक्षण आशयघन होण्यासाठी आणि एक जागरूक पालक म्हणून खऱ्या अर्थानं आपल्याला समाधान मिळण्यासाठी काही गोष्टी जाणीवपूर्वक कराव्या लागतील. अर्थात या साऱ्या गोष्टी आपण आपल्या पाल्यासाठीच करणार असतो.

आपल्या पाल्याच्या चौकशीसाठी केवळ शाळेत न जाता आपल्या घरी एखादा मोठा उत्सव असेल, शुभकार्य असेल, मुलाचा वाढदिवस असेल तर इतर आप्तमित्राप्रमाणं आपल्या पाल्याच्या शिक्षक-मुख्याध्यापकांना निमंत्रण द्यायला आवर्जून शाळेत जा. घरी होणाऱ्या हळदी-कुंकू किंवा चैत्र गौरीच्या कार्यक्रमाचं निमंत्रण द्यायला आई जर आपल्या पाल्याच्या बाईंना शाळेत भेटायला गेली तर बाईंनाही विशेष आनंद होईल. या निमित्तानं शिक्षक-पालक यांच्यातील संबंध अधिक आत्मियतेचे होतील आणि या स्नेहार्द संबंधाचा परिणाम पाल्याच्या विकासाला पोषक असाच होईल. पण सामान्यपणे आपण आपल्या घरात होणाऱ्या कार्यक्रमाचं निमंत्रण फक्त पाल्याच्या शिक्षक-मुख्याध्यापक यांना द्यायला विसरतो. मला वाटतं हे काम इतकं अवघड नाही आणि कमी महत्त्वाचंही नाही. सहज करता येण्यासारखं आहे.

आपल्या पाल्याला शिकविणाऱ्या शिक्षकाला किंवा मुख्याध्यापकांना आदर्श शिक्षक किंवा असाच एखादा पुरस्कार मिळाल्याचं अथवा एखादं अभिनंदनीय कार्य केल्याचं आपल्याला वृत्तपत्रातून वाचायला मिळालं किंवा पाल्याकडून कळलं असेल तर त्या शिक्षक, मुख्याध्यापकांचं अभिनंदन करायला आपण आठवण ठेवून गेलं पाहिजे आपण जाऊ शकत नसलो तर दूरध्वनी करता येईल. एखादं पत्र लिहिता येईल. आपल्या अभिनंदन व कौतुकामुळं शिक्षकांना जो आनंद होईल तो शब्दांतीत असेल. त्याचप्रमाणे एखादी दुःखद घटना घडल्याचं समजलं असेल तर सांत्वन करायलाही गेलं पाहिजे. यासाठीही दूरध्वनी, पत्र ही माध्यम वापरता येतील. आपण आपल्या आप्त मित्रांकडे जातोच की नाही. एखाद वेळी यात औपचारिकपणा दिसेल. वाटेल पण हे करणं आवश्यक आहे. आपल्या अशा वागण्यामुळं दुहेरी लाभ होत असतात. एक तर आपल्या मुलांना यातून चांगले संकेत मिळतात आणि शिक्षक-पालक यांच्यातील भावबंधही दृढ होतात. आणि या भावबंधाचे परिणाम स्वाभाविकपणे पाल्यावरही होतात.

आपला पाल्य ज्या शाळेत शिकतो त्या शाळेचा लौकिक वाढविणाऱ्या वार्ता अनेकदा आपल्या कानावर येत असतात. त्या पाल्याच्या माध्यमातून असू शकतात किंवा वृत्तपत्राच्या, एस.एस.सी. परीक्षेचा निकाल शतप्रतिशत लागला असेल, गुणवत्ता यादीत सर्वाधिक विद्यार्थी असतील, एखाद्या खेळात वा स्पर्धेत शाळेला सर्वोत्कृष्ट म्हणून पारितोषिक मिळालं असेल, राज्य वा राष्ट्रीय स्तरावर विज्ञान प्रदर्शनी सारख्या कार्यक्रमामुळं शाळेचा गौरव करण्यात आला असेल, शाळेत एखादा नावीन्यपूर्ण कार्यक्रमाचं आयोजन करण्यात आलं असेल. अशावेळी पालकांनी शाळेत जाऊन मुख्याध्यापकाचं अभिनंदन करायला पाहिजे. जागृत पालकाचा हाही एक निकष असतो. पण हे अभावानं घडतं. अशा विविध संधीमुळचं आपला शाळेशी संवाद वाढू शकतो.

**व्यावसायिक ज्ञानाचा लाभ -**

आपण शाळेला आपल्या व्यावसायिक अनुभवाचा व ज्ञानाचा लाभ देणं हेही एक मोठं योगदान असतं. नवं शतक हे माहिती तंत्रज्ञानाच्या विस्फोटाचं शतक आहे. त्यामुळं अधिकाधिक क्षेत्रातील अधिकाधिक माहिती, ज्ञान असणं हे आवश्यक राहणार आहे. अनेक पालकांना मी विचारतो की, त्यांनी आपल्या पाल्यांना त्यांचं कार्यालय दाखविलेलं आहे काय? हा प्रश्न विचारण्यामागं हेतू इतकाच की त्या क्षेत्रातील माहिती त्यांनी आपल्या पाल्याला करून दिली आहे का? पुष्कळदा असं लक्षात येतं की पोस्टात काम करणाऱ्या पालकांच्या पाल्याला कार्ड, लिफाफा याचे दर माहिती नसतात, मनीऑर्डर फॉर्म कसा भरावा हे कळत नसतं. आपण आकाशवाणी, दूरदर्शन, दूरध्वनी, दूध डेअरीसारख्या

कार्यालयात काम करीत असू तर आपल्या मुलांना या केंद्रावर चालणारं कामकाज यंत्रसामुग्री यांची माहिती अवश्य करून दिली पाहिजे. आपल्या पाल्याबरोबर शाळेतील त्याच्या इतर वर्गमित्रांनाही या ज्ञानाचा लाभ व्हावा म्हणून आपण स्वतःच शाळेच्या मुख्याध्यापकांना, शिक्षकांना भेटून, भेटीचा एखादा कार्यक्रम आयोजित करू शकतो. आपण रेल्वे, एस.टी. किंवा एखाद्या खासगी बस सेवा कंपनीत काम करीत असलो तर शाळेच्या मुलांच्या सहलीच्या संदर्भात आपण मदत करू शकतो मग ती आरक्षणाशी संबंधित असेल अथवा एस.टी. किंवा खासगी बस उपलब्ध करून देण्याशी संबंधित असेल. कारण या सहलीत आपलाही पाल्य सहभागी झालेला असतो. आपण एखाद्या प्रोजेक्टवर काम करीत असू. उदा. एखादं मोठं धरण असेल, राष्ट्रीय उद्यान निर्मिती, सहकारी साखर कारखाना असेल, पुरातत्व विभागाद्वारे चालणारं उत्खनन असो. हे प्रकल्प विद्यार्थी व शिक्षकांनी आवर्जून बघावेत असं आपल्याला वाटत असेल तर शाळेच्या मुख्याध्यापकांना भेटून विद्यार्थी व शिक्षकांनी त्या प्रकल्पाना भेटीचं निमंत्रण देता येईल व आवश्यक त्या सुविधाही पुरविण्याचा प्रयत्न करता येईल. विद्यार्थी आणि शिक्षक यांच्या ज्ञानात भर पडावी यादृष्टीनं आपलं हे सहकार्य महत्त्वपूर्ण ठरू शकतं. अनेकदा आपल्या पाल्याचे शिक्षक अथवा शाळेचे मुख्याध्यापक आजारी असल्याचं किंवा एखाद्या रुग्णालयात भरती असल्याचं आपल्याला कळलं आणि आपण व्यवसायानं डॉक्टर असू तर त्या शिक्षकांना, मुख्याध्यापकांना भेटून योग्य ते मार्गदर्शन, वैद्यकीय सेवा देता आल्यास त्यांना केवढं तरी समाधान मिळेल. शिक्षक हे आपल्या पाल्याच्या भविष्याचे निर्माते असतात. ते लवकर बरे होऊन शाळेत आल्यास आपल्याच पाल्याचा लाभ होणार असतो. आपलं अशाप्रकारचं वर्तन पाल्यासाठी अर्थपूर्ण शिक्षण ठरू शकतं.

अनेक पालक चांगले कलावंत असतात. अनेकांनी नाटकांचं, चित्रपटाचं दिग्दर्शन केलेलं असेल. अनेक पालक नाटक, चित्रपट, दूरदर्शनवरील मालिकांतून भूमिका करत असतील या आपल्या कला गुणांचा उपयोग आपल्या पाल्यांना आणि पाल्याच्या शाळेलाही करून देता येईल. शाळेतील विद्यार्थ्यांचा एखादा नाट्यप्रयोग बसवून देणं, दिग्दर्शन देणं असं सहकार्य सहज देता येईल किंवा हेही शक्य होत नसलं तर आपण जर आपलाच एखादा कार्यक्रम शाळेला देऊ शकलो तरी शाळेला त्याचा निश्चित उपयोग होईल. आपण कवी, साहित्यिक, कथाकार, कथाकथनकार असू, साहित्य क्षेत्रात आपला इतर साहित्यिकांशी दाट परिचय असेल तर या परिचयाचा लाभही शाळेला मिळू शकतो. पाठ्यपुस्तकात अनेक नामवंत कवी साहित्यिकांचे पाठ असतात. विद्यार्थी त्यांचा अभ्यास करीत असतात. पण या साहित्यिकांना बघण्याची, ऐकण्याची संधी मात्र त्यांना मिळालेली नसते. एखादवेळी हे साहित्यिक आपल्या गावात येतात त्यावेळी त्यांना आणि मुख्याध्यापकांना भेटून विद्यार्थ्यांच्या भेटीला त्यांना आणता येईल. अशाप्रकारच्या कार्यक्रमामुळं शाळेचा लौकिकही वाढतो.

काही पालकांचं राजकारण हेच क्षेत्र असतं. काही आमदार, खासदार पदावर निवडून आलेले असतात. तर काही राज्य वा केंद्रात मंत्री म्हणून कार्य करीत असतात. त्यांची मुलं ज्या शाळेत शिकत असतील त्या शाळेला किमान एखाद वेळी भेट दिली पाहिजे. शाळेच्या काही अडचणी असतील तर त्या सोडवायला हातभारही लावला पाहिजे. ज्या शाळेत आपला पाल्य शिकतो ती शाळा कदाचित आपल्या विचारधारेच्या व्यक्तीच्या हाती नसेलही तरी देखील सारे मतभेद दूर सारून सर्व विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक विकासाला आपला हातभार लागावा या एकमेव हेतूनं वेळ काढून भेट देता आली पाहिजे. आपल्या केवळ भेटीमुळं शाळेचे अनेक रेंगाळणारे प्रश्न सहज सुटू शकतात. आपण केवळ आपल्याच पाल्याचे पालक आहोत ही भूमिका बाजूला ठेवून आपला पाल्य ज्या शाळेत शिकतो त्या शाळेचंचं पालकत्व आपल्याकडे आहे अशा विशाल भूमिकेतून अशा पालकांनी त्या शाळेकडे बघायला हवं. आपण कोणत्या क्षेत्रात काम करतो, कोणत्या पदावर आपण आहोत हे महत्त्वाचं नाही तर आपल्या ज्ञानाचा, अनुभवाचा, व्यवसायाचा आणि लोकसंग्रहाचा लाभ शाळेला कसा देता येईल हा भाग महत्त्वाचा आहे. यादृष्टीनं एका उदाहरणाचा उल्लेख केल्यास अनाठायी होणार नाही. पालक शाळेत उपस्थित असलेल्या एका पालकानं विचारलं, की ते शाळेला काय योगदान देऊ शकतात. ते एका चष्म्याचे दुकानदार आहेत. चर्चेत त्यांना अनेक गोष्टी सुचवल्या पण त्यांनी स्वतःच्या कल्पनेनं एक योजना राबविली अभिनंदनीय अशीच ती योजना होती. काय असेल योजना? त्यांनी पाल्याच्या शाळेत जाऊन मुख्याध्यापकांची भेट घेतली व त्यांना ती योजना समजावून सांगितली. योजना अशी होती, की त्यांचा पाल्य ज्या वर्गात शिकतो त्या वर्गातील सर्व विद्यार्थ्यांची तज्ज्ञ डॉक्टरकडून नेत्र तपासणी करायची आणि ज्या विद्यार्थ्यांना चष्मा लागत असेल त्यांना ते निःशुल्क चष्मे पुरवतील. शिक्षक, मुख्याध्यापकांना ही योजना आवडली आणि त्यांनी पूर्ण सहकार्य देऊ केलं. पालकांनी दोन तज्ज्ञ डॉक्टरांना बोलावून त्याच्या पाल्याच्या वर्गातील ६७ विद्यार्थ्यांचे डोळ्यांची तपासणी केली. त्यात चार विद्यार्थ्यांना चष्म्याची गरज असल्याचे लक्षात आलं. पालकांनी त्यांना मुख्याध्यापकांच्या हस्ते चष्मे वाटप केले. पालक अशा विद्यार्थी कल्याणाच्या योजना शाळेला सुचवू शकतात आणि शिक्षक मुख्याध्यापकांच्या सहकार्याने राबवू शकतात, यशस्वी करू शकतात.

अनेकदा पाल्याच्या शाळेत काही प्रश्न, समस्या निर्माण झाल्याचं

ऐकायला मिळतात. कधी मुख्याध्यापक शिक्षक, कधी शिक्षक आणि संचालक यांच्यातील मतभेदामुळं, संघर्षामुळं शाळेतील अध्यापन कार्य थांबलं आहे किंवा त्याकडे दुर्लक्ष झालेलं आहे. कधी शिक्षकांचे पगार न झाल्यामुळं ते संपावर गेलेले आहे. एखादा पाल्य एका विशिष्ट शिक्षकाची वारंवार घरी तक्रार करतो आहेत. प्रश्नांचं स्वरूप वेगवेगळं असू शकतं. पण या सर्वांचा परिणाम विद्यार्थ्यांवर होत असतो आणि शाळेच्या लौकिकावरही होत असतो. शाळेत निर्माण झालेल्या या समस्यांशी आपला काय संबंध असं म्हणून तिकडे दुर्लक्ष करणं हे जागरूक पालकाना शोभणारी बाब नाही, कारण शैक्षणिक परिवारामध्ये मुख्याध्यापक, शिक्षक, पालक आणि विद्यार्थी या सर्वांचाच अंतर्भाव असतो. तेव्हा आपण ज्या शैक्षणिक परिवाराचे घटक आहो. त्या परिवारात काही समस्या निर्माण झाल्या असतील त्या सामोपचारानं सोडवणं, त्यासाठी पुढाकार घेणं हे एक जबाबदार पालक म्हणून आपलं कर्तव्य आहे. पण हा पुढाकार घेताना आपली भूमिका ही स्नेहपूर्ण आणि शैक्षणिक तळमळीची आहे याचा अनुभव परिवारातील सर्वांना आला पाहिजे. तरच या पुढाकाराला अर्थ राहील. केवळ शाळेविषयीच्या तक्रारी ऐकून संघर्ष करण्याची, वादविवाद करण्याची भूमिका असली तर त्यातून काही साध्य होण्यापेक्षा आणखी वेगळे प्रश्न निर्माण होतील. पालक म्हणून आपली भूमिका सहकार्याचीच असली पाहिजे. मात्र शाळेत अशैक्षणिक गोष्टी चालत असतील, विद्यार्थ्यांवर चांगले संस्कार होण्याऐवजी शालेय वातावरणामुळे बेशिस्त वाढताना दिसत असली तर प्रसंगी संघर्षाची भूमिका घेऊन त्या अशैक्षणिक गोष्टी बंद कशा होतील हा प्रयत्न करायला पाहिजे. आपल्या शाळेचा पालक वर्ग जागरूक आहे, शाळेच्या सर्व चांगल्या गोष्टींना आणि योजनांना मनापासून सहकार्य करणारा आहे याची जाणीव व अनुभव शाळा संचालक, शिक्षक, मुख्याध्यापक यांना आल्यास आजच्या शाळा अधिक चांगल्या शाळा होऊ शकतील. जागृत पालक हे शाळेवर नैतिक अंकुश ठेवण्याचं काम करू शकतात आणि सक्रीय सहकार्यानं शाळेचा लौकिक आणि दर्जा उंचावण्यासाठी मदत करू शकतात ही गोष्ट आपण लक्षात घेतली पाहिजे. आणि या संदर्भात आपण खरोखरच एक जागरूक पालक आहोत काय? याचा शोधही घेतला पाहिजे. शेवटी एकच गोष्ट महत्त्वाची आहे, की शाळेला अशा प्रकारचं योगदान, सहकार्य देण्यासाठी आपल्या मानसिकतेसोबत आपला आणि शाळेच्या शिक्षक, मुख्याध्यापकांशी संवाद आणि संपर्क झाला पाहिजे. हा संवाद जेवढा अर्थपूर्ण तेवढं शिक्षणही अर्थपूर्ण होईल, शिक्षण संस्थाही खऱ्या अर्थानं शैक्षणिक संस्था होतील आणि या शाळांतून बाहेर पडणारी आपली चैतन्य ठेव दामदुपटीनं म्हणजे सर्वांगीण विकास होऊन आपल्याला परत मिळेल.



# ११. गरज - एका शुभसंकल्पाची

आतापर्यंत पालकांच्या अवस्था आणि आपल्या पाल्याच्या सर्वांगीण विकासासाठी पालक म्हणून काय काय करता येईल या संदर्भात पुरेशी चर्चा केली आहे. अर्थात ही चर्चा ६ ते १४ या वयोगटातील पाल्य केंद्रस्थानी ठेवूनच केलेली आहे. कारण पाल्याचा हा वयोगट अतिशय संवेदनशील, सर्वदृष्टीनं पालकावर अवलंबून असणारा आणि आपल्या वर्तनाकडे बघून अनुकरण करीत शिकणारा असा असतो. म्हणून पाल्यांच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीनं प्रयत्न करायचा असतो तो याच कालखंडात. त्यामुळं पालक म्हणून आपल्या वागण्या- बोलण्यावरही अनेक प्रकारची बंधनं येऊ शकतात. पालकांचं वर्तन, त्यांचे आपसांत असणारे संबंध, त्यांच्यात चालणारा, होणारा संवाद यावरून तीन प्रकारचे पालक दिसतात. एक प्रकार दिसतो तो अत्यंत रागीट, लहान-सहान गोष्टींवरून घरात संतापणारे पालक. अशाप्रकारचे पालक पाल्याच्या लहानशा चुकांवरून त्यांच्यावर रागवत असतात. त्याला शिक्षाही करीत असतात. कधी कधी आपल्या पाल्याची चूक आहे किंवा नाही हे जाणून घ्यायचा प्रयत्नही करीत नाही. पाल्य काही सांगू लागला तर ऐकून न घेता त्याला शिक्षा करणे, मारणे एवढंच काम करीत असतात. अशा पालकाचा घरात इतका धाक असतो की तो घरात येताच एकदम शांतता पसरते. जणू काही कुणी हुकूमशहा घरात आलेला आहे. मुलं, पत्नी इतकंच काय पण त्याचे आई-वडील घरात असतील तेही घाबरत असतात. प्रेमळ भाषेत त्यांचा पाल्याशी कधी संवादच होताना दिसत नाही. मुलांनाही त्यांच्यासमोर बोलण्याची हिंमत होत नसते. एखाद्यावेळी एखाद्या प्रकरणात आपण निर्दोष आहोत हे सांगायलाही पाल्याला भीती वाटत असल्यानं तो बोलू शकत नाही आणि तो बोलत नसल्यामुळं तो दोषी असलाच पाहिजे, असा आग्रह करून असे पालक आणखी त्यावर जुलूम करीत असतात. अशा पालकांच्या पाल्यांचा सर्वांगीण विकास तर दूरच राहील उलट अनेक विकृती त्यांच्यामध्ये निर्माण होतात. अनेकदा पालकांसंबंधीचा संताप तो बाहेर काढताना दिसतो. मुलं मोठी झाली की पालकाच्या या रागीट स्वभावाचा बदला (Revenge) घेण्याची वृत्ती निर्माण झालेली दिसते.

दुसरा पालकांचा प्रकार म्हणजे बेफिकीर किंवा निष्काळजी पालक, अशा पालकांना आपल्या पाल्याच्या भविष्याची फार काळजी असल्याचं त्यांच्या वागण्यातून दिसत नाही. मुलं आपल्या परीनं वाढताहेत, वागताहेत असं एकूण

चित्र अशा पालकांच्या घरी दिसतं. या पालकांचा मुलांना फारसा धाक नसतो आणि मुलांशी अपेक्षित संवादही नसतो. आपला पाल्य काय करतो? कुणाच्या संगतीत असतो? दिलेल्या पैशाचा योग्य विनियोग करतो वा नाही? शाळेतील त्याची प्रगती कशी आहे. या सर्व गोष्टीत पालकाचं मुळीच लक्ष नसतं. विद्यार्थ्यांची एखादी गंभीर तक्रारही ते हसण्यावारी नेतात. आपल्या स्वतःच्या कामात ते इतके व्यस्त असतात, की मुलांची काही सुख-दुःख असतात, त्यांच्या काही मागण्या असतात याची त्यांना जाणीवच नसते आणि असली तरी त्याकडे बघायला त्यांना वेळ नसतो. भरपूर पैसा मिळविणारे, पैसा हेच सर्वस्व मानणारे आणि पैशानेच सारं काही प्राप्त करू शकतो अशा धारणेनं जगणारे पालक पाल्यालाही खर्चासाठी वाजवीपेक्षा जास्त पैसा देत असतात आणि मुलंही हवा तसा आणि नको त्या गोष्टीवर खर्च करतात. यातून मुलांना अनेक वाईट सवयी लागतात. एखाद्या वेळी अशा मुलांना पैसा मिळाला नाही तर चोऱ्या करायलाही ही मुलं प्रवृत्त होतात. विशेषतः राजकारणात पूर्ण वेळ गुंतून पडलेल्या किंवा अधिक पैसा मिळावा म्हणून वाजवीपेक्षा जास्त गुंतून पडलेल्या पालकांच्या पाल्याचे प्रश्न अनेकदा गुंतागुंतीचे झालेले दिसतात. स्वतःच्या पाल्याविषयी अशा बेफिकीर व निष्काळजी वृत्तीनं वागणाऱ्या पालकांना त्याच्या थकल्या आणि विश्रांतीच्या काळात फार मोठी किंमत मोजावी लागते. अशी उदाहरणं आज शेकडोंनी बघायला मिळतात. शिवाय ही मुलं मोठी झाल्यानंतर थकल्या पालकाकडेही बेफिकीरपणे बघतात.

पालकांचा एक तिसरा वर्ग असतो. हा वर्ग म्हणजे आपल्या पाल्याचे अतिलाड करणारा लाडावू पालक. या पालकांना प्रेम आणि लाड यांच्यातील सीमारेषा समजलेल्या नसतात. असे पालक प्रेमाच्या नावाखाली पाल्याचे नको ते लाड आणि हट्ट पूर्ण करतात. त्यामुळं पाल्य जिद्दी, हट्टी बनत जातात. त्यांच्या ठिकाणी संकुचित वृत्ती निर्माण होते. आपल्याजवळील थोडं इतरांनाही दिलं पाहिजे अशी सवय लागण्याऐवजी आपल्या एकट्यालाच सारं मिळालं पाहिजे अशी स्वार्थमूलक भावना त्याच्या ठिकाणी निर्माण होऊ लागते. अनेकदा पाल्य समस्याग्रस्त होण्यास पालकच जबाबदार असतात. Problem Parents produce problem pupils असं म्हणतात ते अनेक अर्थानं खरं आहे. आपल्या घरात आपले वृद्ध आई-वडील असतात. एकत्र कुटुंब असेल तर इतरही मुलं असतात. सर्वांनाच तुमचं प्रेम हवं असतं. पण लाडावू वृत्तीचे पालक घरातल्या वडीलधारी व इतर माणसांना अडगळीत टाकून फक्त आपल्याच पाल्यावर प्रेमाचा वर्षाव करीत असतात. ते पालक विसरत असतात, की जेव्हा ही मुलं पालक होतील तेव्हा आपल्यालाही अडगळीत टाकतील. पालकांचे हे तीन प्रकार यासाठी सांगितले. आपल्या या रागीट, बेफिकीर व लाडावू वृत्तीनं हे पालक स्वतःच्या भावी आयुष्यातील, वृद्धापकाळातील निरामय आनंद, समाधान संपवून टाकतात. म्हणून ६ ते १४ या वयोगटातील आपल्या पाल्यांना प्रेम जरूर द्या पण न्याय द्या, न्यायानं वागवा. प्रेम, शिस्त आणि परिश्रम या सूत्राला धरून त्यांच्या वाढीस मदत करा. ती मुलं तुमची राहतील.

वर सांगितलेल्या पालक प्रकारात आपण येत नसलो आणि प्रेम, शिस्त, श्रम या त्रिसूत्रीनं मुलांच्या वाढीसाठी मदत करीत असलो तरी माणूस घडविणाऱ्या शिक्षणासाठी आपल्याला आपल्या पाल्यासमोर वर्तनाचा आदर्श ठेवायलाच हवा. अनेकदा आपण सामाजिक, वैचारिक प्रदूषणाबद्दल घरात पोटतिडकीनं बोलत असतो. समाजात भ्रष्टाचार वाढला, मूल्यं ढासळत चालली म्हणून अस्वस्थही होताना दिसतो. पण व्यक्तिगत जीवनात मात्र आपण मूल्यांचं पोषण करताना दिसत नाही. एखादं काम करवून घेण्यासाठी, मग बदलीचं असो वा प्रमोशनचं असो, लाच दिल्याचं आपण सांगतो. एखाद्या संस्थेत प्रवेशासाठी, पाल्याची पात्रता नसतानाही भरमसाठ देणगी देऊन पाल्याला प्रवेश मिळवून देतो. आपल्या एकूण प्राप्तीत न बसणाऱ्या वस्तू आपण खरेदी करतो तेव्हा आपलं हे वागणं मुलं बारकाईनं टिपत असतात. त्यामुळं आपण कितीही मूल्याविषयी त्यांना सांगितलं तरी त्याचा फारसा परिणाम होणार नाही. आपल्या पाल्यांना आपले आई-बाबा तत्त्वनिष्ठ आहेत. मूल्यावर केवळ श्रध्दाच ठेवणारे नाहीत तर जीवनमूल्ये जगणारे आहेत याचा अनुभव येईल तेव्हा त्याचा परिणाम त्यांच्याही जीवनात बघायला मिळेल. आपण एकट्यानं कितीही मूल्यं जपली तरी आजचा समाज, आजचं सामाजिक जीवन बदलणार नाही. आकाशच फाटले असेल तर मी एकटा त्याला ठिगळ लावू शकेन का? असा एक प्रश्न अनेकांच्या मनात येऊ शकतो. पण शेवटी एक एक व्यक्ती, एक एक घर मिळूनच समाज तयार होत असतो. त्यामुळं ही सामुदायिक जबाबदारी आहे. म्हणून व्यक्ती-व्यक्तीत होणारा बदल हाच सामाजिक परिवर्तनाचा आधार आहे. हे सामाजिक परिवर्तन आपल्या पाल्यापासून, घरापासून व्हावं अशी मानसिकता प्रत्येक पालकाची तयार झाली पाहिजे. मी माझ्या पाल्यात काही शाश्वत जीवनमूल्ये रुजविण्यासाठी, तो अद्ययावत ज्ञानानं श्रीमंत होण्यासाठी, त्याच्या सृजनशीलतेचा विकास होण्यासाठी, त्याच्या जीवनाला एक नैतिक, अध्यात्मिक अधिष्ठान देण्यासाठी, त्याच्या ठिकाणी डोळस श्रद्धा आणि विज्ञाननिष्ठा निर्माण व्हावी म्हणून आम्ही आई-वडील, पालक काय करू शकतो याचा विचार करून तशा प्रकारचं आचरण ठेवण्याचा प्रयत्न केला पाहिजे. शेवटी कुटुंब हीच समाजजीवनाची पाठशाळा आहे. या पाठशाळेची संस्कार देण्याची क्षमता जर ढासळली तर समाजधारणेलाच धक्का बसेल आणि अपेक्षित सामाजिक परिवर्तन हे मृगजळ ठरेल. म्हणूनच आपल्या पाल्यासाठी येणाऱ्या काळाची आव्हानं लक्षात घेऊन काही संकल्प करायला पाहिजे आणि या संकल्पपूर्तीसाठी प्रयत्नशील झालं पाहिजे. यासाठीच पुढील एक संकल्प दिलेला

आहे.

**पालकांनी करावयाचा संकल्प -**

* आम्ही आमच्या पाल्यांना समजून घेऊ.
* आम्ही आमच्या वर्तनाचा आदर्श पाल्यांपुढे ठेवू.
* आम्ही आमच्या इच्छा-आकांक्षा, स्वप्नं त्यांच्यावर न लादता त्यांना चांगली स्वप्नं बघायला प्रेरणा देऊ.
* पाल्याला काही शिकविण्यापेक्षा तो स्वतःहून शिकेल, असं वातावरण निर्माण करू.
* त्यांच्या ठिकाणी अंधश्रद्धा निर्माण होणार नाही याची काळजी घेऊ आणि विज्ञाननिष्ठा निर्माण करण्याच्या दृष्टीनं प्रयत्नशील राहू.
* आम्ही पाल्यासमोर शिक्षकांविषयी अनादर प्रगट करणार नाही किंवा टीकाही करणार नाही.
* मुला-मुलीत भेदभाव न करता त्यांना समान संधी उपलब्ध करून देऊ.
* पाल्याला अनाठायी खर्च करायला पैसे देणार नाही.
* आम्ही प्रेम करू पण फाजील लाड करणार नाही.
* आम्ही एक जागरूक, समंजस पालक बनण्याचा प्रयत्न करू.
* आम्ही प्रयत्नपूर्वक आमच्या पाल्यात परमेश्‍वराविषयी श्रध्दाभाव, सत्कार्याविषयी आस्था, आदर्शाची आवड, श्रमाविषयी निष्ठा, अन्यायाविरुद्ध संताप आणि सर्वांविषयी प्रेमभाव निर्माण करू.
* आमच्या या संकल्पपूर्तीसाठी परमेश्‍वर आमच्या प्रयत्नाला मदत करेल, असा आमचा विश्‍वास आहे.

**'सर्वेऽपि सुखिनः सन्तु, सर्वे सन्तु निरामयः**
**सर्वे भद्राणि पश्यन्तु माकश्चिद दुःखमाप्नुयात ।'**

मित्रहो, हे सारं करायला अवघड आहे पण आवर्जून करायला हवं आहे. यात आपला स्वार्थ आहे, आपल्या पाल्यासाठीच आपण हे करतो आहे. 'The most precious gift any parent can leave behind for their children is not millions of dollars or a luxurious home, but a clean mind' हे लक्षात असू द्या. तुम्ही आपल्या पाल्याला कोणता वारसा द्यायचा, सुसंस्काराचा की भौतिक गोष्टींचा ते तुम्हालाच ठरवायचं आहे.



# त्यालाही सवय लावा



मुलांना घेण्याची सवय लावायची तशी
देण्याचीही सवय लावायला हवी.
ज्या मुलाला आईनं कधी आपलं डोकं चेपायला
सांगितलं नाही, पाय चेपायला सांगितलं नाही
त्याला मोठेपणी बायको आजारी पडली की
तिच्यासाठी काही करावं लागतं हे सुचणारच नाही.
आई फक्त आपलं करण्यासाठीच असते
असं मुलांना वाटतं.
तिनं तिच्या गरजा कधी
सांगितलेल्याच नसतात.

**– शोभा भागवत**





# रतनलाल सी. बाफना
## फाऊन्डेशन ट्रस्ट



प्रामाणिकपणा व विश्वसनियता ह्या दोन गुणांमुळे संपूर्ण देशात सुवर्ण, हिरे, चांदी यांच्या आभुषणांसाठी आर. सी. बाफना ज्वेलर्स यांचे 'सुवर्णतीर्थ' सुप्रसिध्द आहे.

**मा. रतनलाल सी. बाफनाजींचे सामाजिक बांधीलकी जोपासणारे कार्य :**

**१) शालेय साहित्य वाटप :**

प्राथमिक शाळांमध्ये स्वत: जाऊन तेथील गरीब व गरजू विद्यार्थ्यांना पुस्तके, वह्या, पाट्या, तसेच काही विद्यार्थ्यांना कपडे, दप्तर इत्यादी साहित्याचे वाटप २१५० गावांमध्ये केले. १००० शाळांमध्ये स्वत: भाषणे देवून मार्गदर्शनपर पुस्तकांचे सुध्दा वाटप बाफणाजींनी निस्वार्थी बुध्दिने केले.

**२) जलमंदिर :**

जळगाव शहरामध्ये तीन जलमंदिराची उभारणी करून, लोकांना स्वच्छ व थंड पाणी उपलब्ध करून दिले व संपूर्ण महाराष्ट्र एक पायंडा घालून दिला.

**३) झुणका भाकर :**

या महागाईच्या काळात सर्वसामान्य व्यक्तिला केवळ चार रूपयांमध्ये भोजनाची व्यवस्था श्री. केशव स्मृती प्रतिष्ठान यांच्या सहकार्याने उपलब्ध करून दिली व जवळपास ५००० लोक याचा रोज फायदा घेवून उदरनिर्वाह करतात.

**४) शारीरिक अपंगांवर मात करण्याची आशा :**

समाजातील अपंगांना एक मदत म्हणून तीन चाकी सायकलींचे वितरण करून त्यांना एक आशेचा किरण दाखविला. २७०३ सायकली भेट म्हणून दिल्यात.

**५) रुग्णसेवा :**

गरजवंत रूग्णांना औषधी, दवाखाना, काही आवश्यक साधन सामुग्री देण्याचे महान कार्य बाफनाजी नेहमी करतात. तसेच मोतीबिंदूच्या शिबिरांचे आयोजन करून हजारो नेत्रहिनांना दृष्टी देण्याचे कार्य सुध्दा सुरू आहे.

**६) नेत्र चिकित्सालय व नेत्रपेढी :**

बाफनाजींचे भाऊ श्री मांगीलालजी बाफना यांच्या स्मृती प्रित्यर्थ व नेत्रदानाला प्रोत्साहन देण्यासाठी मांगीलालजी बाफणा नेत्र चिकित्सालय व नेत्रपेढी ३ मार्च १९९९ रोजी स्थापित केली.

**७) शाकाहार अभियान :**

ज्या कार्यामुळे मनुष्य जन्माला सार्थकता प्राप्त होऊ शकते असे महान कार्य म्हणजे शाकाहार अभियान. बाफनाजींनी या कार्यासाठी आयुष्य समर्पित केले. या कार्यासाठी त्यांनी दहासुत्री कार्यक्रम आराखडा तयार करून शाकाहार सदाचार परिषदेची स्थापना केली. संपूर्ण महाराष्ट्रात शाकाहाराची एक मोठी चळवळ निर्माण करून लाखो लोकांना प्रभावित केले, मासांहार सोडायला प्रवृत्त केले. आतापर्यंत ९०० ठिकाणी मार्गदर्शनपर व्याख्याने त्यांनी दिली. त्यांचं असं मत आहे, ''जनावरांना खाणे हे माणसाचं काम नाही, नैसर्गिक दृष्टीने, वैज्ञानिक दृष्टीने, नैतिक दृष्टीने, मांसाहार हा मानवाचा आहार नाही.''

**८) गो सेवा अनुसंधान केंद्राची स्थापना :**

बाफनाजींचे अत्यंत महत्त्वाचे कार्य म्हणजे गो रक्षा ! त्यांनी गोसावर अनुसंधान केंद्राची स्थापना केली. या केंद्रामध्ये ३३०० गायी आहेत. देशातील ५ कोटी गाईंचे प्राणांची संरक्षण कसे करण्यात येईल यासाठी या केंद्राची स्थापना करण्यात आली आहे. या ठिकाणी गाईचे दुध व मल-मुत्रापासून अनेक दूर्धर आजारांच्या निर्मूलनासाठी औषधी तयार केली जाते. तसेच गाईच्या गोमुत्रापासून व शेणापासून पेस्टीसाईडस, खते, तसेच औषधीची निर्मिती करण्याचे कार्य सुरू आहे.

मा. बाफनाजींचे दीपस्तंभच्या अनेक उपक्रमांना मन:पूर्वक सहकार्य व योगदान लाभले आहे. त्यांचे व त्यांच्या परीवाराचे शतश: आभार.



# पालक व शिक्षक यांनी वाचलीच पाहिजे अशी पुस्तके

| क्र. | पुस्तकाचे नाव | लेखक | प्रकाशन |
|---|---|---|---|
| १) | मुलांशी बोलतांना | रेणू दांडेकर | सह्याद्री |
| २) | छोटीसी बात | राजीव तांबे | मैत्रेय |
| ३) | पत्रसंस्कार | संजय मालपाणी | |
| ४) | असे घडवा मुलांचे व्यक्तिमत्त्व | डॉ. रमा मराठे | मेहता पब्लिशिंग हाऊस |
| ५) | सुजाण पालकत्त्व | मीना टाकळकर | मेहता पब्लिशिंग हाऊस |
| ६) | आपली मुलं अर्थात हितगुज पालकांशी | डॉ. विजया वाड | मनोविकास |
| ७) | तुम्ही अन् तुमची मुलं | सी. नॉर्थकोट पार्किन्सन | मेहता पब्लिशिंग हाऊस |
| ८) | पालक मित्र | यजुर्वेद्र महाजन | दीपस्तंभ |
| ९) | करिअर मित्र | यजुर्वेद्र, सविता भोळे | दीपस्तंभ |
| १०) | अभ्यास मित्र | यजुर्वेद्र, महेश गोरडे | दीपस्तंभ |
| ११) | विवेकी पालकत्त्व | डॉ. अंजली जोशी | शब्द |
| १२) | आई बाबा ऐका ना | डॉ. हेम जी. गिनॉट अनुवाद-भालचंद्र साठे | मनोविकास |
| १३) | आपल्या मुलांच्या यशस्वितेचा कानमंत्र | अनुवाद-प्रशांत तळणीकर अनंत पै | |
| १४) | पाल्य व्यक्तिमत्त्वाचा कानमंत्र | संजीव परळीकर | मेहता पब्लिशिंग हाऊस |
| १५) | आमचा बाप अन् आम्ही | डॉ. नरेंद्र जाधव | ग्रंथाली |
| १६) | शामची आई | सानेगुरुजी | पुणे विद्यार्थी गृह |
| १७) | आई समजून घेतांना | उत्तम कांबळे | लोक वाङ्मय गृह |
| १८) | हृदय संवाद | डॉ. अविनाश सावजी | आपण पब्लिकेशन |
| १९) | प्रकाश वाटा | डॉ. प्रकाश आमटे | |
| २०) | मुसाफीर | अच्युत गोडबोले | मनोविकास |
| २१) | महाश्वेता | सुधा मूर्ती | मेहता |
| २२) | आयुष्याचे धडेगिरवतांना | सुधा मूर्ती | मेहता |
| २३) | सामान्यातील असामान्य | सुधा मूर्ती | मेहता |
| २४) | अस्तित्व | सुधा मूर्ती | मेहता |
| २५) | वाईज अॅण्ड अदरवाइज | सुधा मूर्ती | मेहता |
| २६) | पुण्यभूमी भारत | सुधा मूर्ती | मेहता |
| २७) | श्रध्दा अंधश्रध्दा | डॉ. नरेंद्र दाभोलकर | राजहंस |
| २८) | तिमिरातूनी तेजाकडे | डॉ. नरेंद्र दाभोलकर | राजहंस |
| २९) | समजूतदार पालकत्त्व | गोपिका कपूर अनुवाद-डॉ. अरूण भांडे | राजहंस |
| ३०) | यांनी घडवलं सहस्त्रक | सुहास कुळकर्णी, मिलींद चंपानेरकर | राजहंस |
| ३१) | शर्यत शिक्षणाची | व्ही. रघुनाथन | राजहंस |
| ३२) | बाबा आमटे | भ.ग. बापट | राजहंस |
| ३३) | मनश्री | सुमेघ वडावाला | राजहंस |
| ३४) | मार्क इंग्लिश | डॉ. संदी श्रोयी | राजहंस |
| ३५) | बदलते विश्व | कुमार केतकर | राजहंस |
| ३६) | सांगतेय ऐका | हंसा वाडकर | राजहंस |
| ३७) | एका दिशेचा शोध | संदीप वासेलकर | राजहंस |
| ३८) | चला राजकारणात | दिपक पटवे | राजहंस |
| ३९) | त्रिकालवेध | कुमार केतकर | राजहंस |
| ४०) | महानायक | विश्वास पाटील | राजहंस |
| ४१) | माझा साक्षात्कारी हृदयरोग | डॉ. अभय बंग | राजहंस |
| ४२) | मुक्काम : आर्मी पोस्ट ऑफिस | वैदेही देशपांडे | राजहंस |
| ४३) | कामाची किमया | ग.ना. सप्रे | राजहंस |
| ४४) | सुखी माणसाचा सदरा | करूणा गोखले | राजहंस |
| ४५) | स्त्री विरूध्द पुरूष | शिवराज गोर्ले | राजहंस |
| ४६) | हा तेल नावाचा इतिहास | गिरीश कुबेर | राजहंस |
| ४७) | मुंबईचा अन्नदाता | शोभा बोंद्रे | राजहंस |
| ४८) | उठा जागे व्हा! | संदीपकुमार साळुंखे | राजहंस |
| ४९) | आधुनिक एकलव्य | डॉ. सुरेश नाडकर्णी | ग्रंथाली |
| ५०) | आगळी माती वेगळी माणसं | स्मिता भागवत | |
| ५१) | जगायचंय प्रत्येक सेकंद | मंगला केवळे | |
| ५२) | यशस्वी जीवनाची योजना | एच.ए. भावे | |
| ५३) | तारांगण | सुरेश द्वादशीवार | साधना |
| ५४) | थैमान चंगळवादाचे | अच्युत गोडबोले | साधना |
| ५५) | झपाटलेपण ते जाणतेपण | | साधना |
| ५६) | आपण सारेच अर्जुन | व.पु. काळे | साधना |
| ५७) | चाणक्य | बी. डी. खेर | मेहता पब्लिकेशन |
| ५८) | परत मायभूमीकडे | डॉ. संग्राम पाटील | समकालीन |
| ५९) | ताई मी कलेक्टर व्हयनू | राजेश पाटील | मनोविकास |
| ६०) | धडपडणाऱ्या तरूणाईसाठी | संदीपकुमार साळुंखे | राजहंस |
| ६१) | बेलभंडारा | डॉ. सागर देशपांडे | सह्याद्री |
| ६२) | भारतीय सण आणि उत्सव | प्रा. मधु जाधव | मनोविकास |

| क्र. | पुस्तकाचे नाव | लेखक | प्रकाशन |
|---|---|---|---|
| ६३) | अरे संस्कार संस्कार | डॉ. स्नेहलता देशमुख | मनोविकास |
| ६४) | अफलातून गोष्टी | रेणु गावस्कर | अनुश्री |
| ६५) | ऑडीट मनाचे | सुषमा भोसले | अनुश्री |
| ६६) | बोलु की नको? | शकुंतला फडणीस | अनुश्री |
| ६७) | मला तुमची गोष्ट सांगायचीय | पु. ग. वैद्य | अनुश्री |
| ६८) | मन मोकळं | अंजली पेंडसे | अनुश्री |
| ६९) | नो – प्रॉब्लेम | अंजली पेंडसे | अनुश्री |
| ७०) | सजग पालकत्त्व | चंदन दाते | अनुश्री |
| ७१) | तंत्रयुगातील उमलती मने | डॉ. स्नेहलता देशमुख | अनुश्री |
| ७२) | वाट तुडवतांना | उत्तम कांबळे | मनोविकास |
| ७३) | माझा देश माझी माणसं | डॉ. सुरूची पांडे | मनोविकास |
| ७४) | मानसिक ताण – तणाव कसा रोखाल? | डॉ. राजेंद्र बर्वे | मनोविकास |
| ७५) | विसंवादातून... सुसंवादाकडे | डॉ. राजेंद्र बर्वे | मनोविकास |
| ७६) | कार्य संस्कृती | अनिल शिदोरे | मनोविकास |
| ७७) | कधीतरी हे बोलायलाच हवे | डॉ. अमोल अन्नदाते | मनोविकास |
| ७८) | ग्रामीण आरोग्याची उज्वल पहाट | डॉ. रवींद्रनाथ टोणगांवकर | दीपस्तंभ |

## मासिके

| क्र. | मासिके | संपादन | प्रकाशन |
|---|---|---|---|
| १) | छात्रप्रबोधन | महेंद्र सेठीया | ज्ञानप्रबोधिनी |
| २) | जडणघडण | डॉ. सागर देशपांडे | सह्याद्री |
| ३) | पालकनीती | निलीमा सहस्त्रबुध्दे | |
| ४) | अभिनित | गिरीश कुलकर्णी | |
| ५) | शैक्षणिक संदर्भ | निलीमा सहस्त्रबुध्दे | |
| ६) | अनुभव | | युनिक फिचर्स |
| ७) | साधना | | साधना |

वरील सर्व पुस्तके

**दीपस्तंभ वाचन संस्कार व प्रबोधन संस्था**

(४२, हौसिंग सोसा., सहयोग क्रिटीकल केअर हॉस्पिटल जवळ, जळगाव. फोन : ०२५७–२२४२२९९) येथे शाळा, वाचनालये व इतर सर्व वाचकांसाठी सवलतीच्या दरात उपलब्ध असतील.




**डॉ. बाबा नंदनपवार**

एम.ए., एम.एड., पीएच. डी.

**संस्कृत साहित्यविशारद**

४० वर्ष शिक्षक म्हणून सेवा

**संपादक** – शिक्षण समीक्षा

**कुलगुरु** – जवाहर गुरुकुल – आनंद शाळा

**संचालक** – कै. म. ल. मानकर शै.वि.व.सेवा.प्र.

**सचिव** – श्री. शास्त्री शिक्षण संस्था


**माजी सदस्य –** माजी सिनेट सदस्य– नागपूर विद्यापीठ
शासनाच्या विविध समित्यांवर कार्य

**पुरस्कार**–आदर्श शिक्षक–राज्य पुरस्कार १९९२, आचार्य कुळ, मामा क्षीरसागर पुरस्कार–१९९५, रामभाऊ म्हाळगी प्रबोधिनी पुरस्कार–२००४, जीवनव्रती पुरस्कार–२००३, ना.गोपाळकृष्ण गोखले महाराष्ट्र भूषण पुरस्कार–२००४, उत्कृष्ट शिक्षक लेखक पुरस्कार, धर्मभास्कर रामचंद्रपंत जोशी ट्रस्ट, मुंबई.

**संशोधन कार्य –** सांस्कृतिक पर्यावरणाचा सृजनशिलतेवर होणारा परिणाम (नागपूर विद्यापीठ), भाषिक सृजनशिलतेचा विकास (नागपूर विद्यीपाठ), किशोर मासिकाचे समीक्षणात्मक संशोधन (पा.पु. मंडळ–पुणे), बँक अधिकारी व कारकुन यांच्या निवडीसाठी सर्जनशील कसोट्या (आय.बी.पी.एस–मुंबई)

**शैक्षणिक प्रयोग –**
* दर्जेदार मराठी लेखन क्षमतेच्या विकासाची दिशा–१० प्रकल्प
* समाजिक अभिसरण प्रकल्प–८
* व्याकरणावरील खेळ– हसत खेळत शिका
* पत्रद्वारा संस्कार

**काही आगळे – वेगळे प्रयोग** आईबाबांची शाळा, शिक्षकांची शाळा, मुख्याध्यापकांची शाळा, आधारवडांची शाळा, रविवारची आनंद शाळा

**लेखन –** गाभा घटक परिचय, विद्यार्थी विकास, मुलांना घर द्या एक घर, आपण एक विश्वस्त, एक नवं घर बांधू या!, व्यक्तिमत्त्व विकास

**याशिवाय –**
* विविध वृत्तपत्रे व मासिकातून कथा, कविता, पुस्तक समीक्षणे आणि शैक्षणिक लेख प्रसिद्ध
* आकाशवाणी–१९६२ ते १९९७ पर्यंत विविध विषयावरील भाषणे प्रसारित.
* महाराष्ट्रात सर्वदूर विविध विषयावर व्याख्याने व कथाकथन कार्यक्रम.
* चांगल्या शाळा व शैक्षणिक संस्था यांनी भेटी देण्यासाठी विविध राज्याचा प्रवास.

# संस्कारक्षम आनंदी घर

लेखक

डॉ. बाबा नंदनपवार

एम.ए.एम.एड., पी.एच.डी.



घर असावे घरासारखे
नकोत नुसत्या भिंती
तिथे असावा प्रेम जिव्हाळा
नकोत नुसती नाती
त्या शब्दांना अर्थ असावा
नकोत नुसती वाणी
त्या अर्थाला अर्थ असावा
नकोत नुसती नाती
सूर जुळावे परस्परांचे
नकोत नुसती गाणी
अश्रूतुनही प्रीत झरावी
नकोच नुसते पाणी
त्या घरट्यातुन पिलू उडावे
दिव्य होऊनी शक्ती
आकांक्षांचे पंख असावे
उंबरठ्यावर भक्ती.


दीपस्तंभ
प्रकाशन